सोविएत साहित्यामधील अभिजात कादंबरीकार मास्किम गोर्की (१८६८-१९३६) ह्यांच्या आत्मचरित्रात्मक कादंबरी-त्रयीतील 'बालपण' आणि 'दाही दिशा' नंतरची 'माझी विद्यापीठे' ही शेवटची कादंबरी.

अलेक्सेई पेश्कोवच्या — भावी लेखक मास्किम गोर्की यांच्या — जीवनातील पुढील घडामोडी प्रस्तुत कादंबरीतून वाचकाला माहीत होतात.

...विद्यापीठात विद्यार्थी म्हणून दाखल होण्याच्या आशेने वयाच्या १६ व्या वर्षी तो कझानला आला. पण झारकालीन वोल्गा प्रदेशातील ह्या मोठ्या आणि गजबजलेल्या शहरात त्याला खडतर कामे करावी लागली. विद्यार्थी जीवनाऐवजी झोपडपट्टीतील जीवन जगावे लागले. कझानमधील क्रांतिकारक प्रवृत्तीच्या बुद्धिजीवी लोकांची पहिली ओळख ह्या भावी लेखकाला येथेच घडली. आपल्या लोकांच्या "जीवनात बदल घडविण्या"ची, त्यांच्या सुखासाठी लढा देण्याची इच्छा येथेच त्याच्या मनात निर्माण झाली व प्रबळ बनली.

तर अशा रीतीने विद्यापीठात अभ्यास करण्यासाठी मी कझानला जायला निघालो. विद्यापीठात शिकायचे एवढे एकच उद्दिष्ट मी मनाशी बाळगले होते.

विद्यापीठात शिकायचा विचार माझ्या डोक्यात भरविला होता एका जिम्नाशियममधील विद्यार्थ्याने. निकोलाय येवरेईनोव त्याचे नांव. फार छान, खूप देखणा तरुण होता. एखाद्या बाईप्रमाणे त्याचे डोळे स्निग्ध होते. मी ज्या घरात रहात होतो त्याच घरात तो पोटमाळ्या-वरील खोलीत रहात होता. माझ्या खाकोटीला सतत पुस्तक असलेले त्याने पाहिले होते. त्यामुळे माझी ओळख करून घेण्याची त्याला इच्छा झाली होती. आणि ओळखीनंतर लौकरच त्याने माझ्या मनात सतत एकच विचार भरवायला सुरुवात केली की, माझ्यापाशी "शिकण्याचा विलक्षण गुण" होता.

"शास्त्राची प्रगती करण्यासाठी निसर्गानं तुला निर्माण केलंय," आपल्या शब्दांना वजन देण्यासाठी आपल्या लांब केसांना डौलदारपणे मागे झटका देत तो म्हणाला होता.

एखादा लठ्ठ उंदीरसुद्धा शास्त्राच्या प्रगतीला हातभार लावू शकतो हे मात्र त्यावेळी मला अद्याप माहीत नव्हते. केवळ माझ्यासारख्या मुलांचीच विद्यापीठांना कमतरता भासत होती असे येवरेईनोवने अगदी छातीवर हात ठेवून सांगितले होते. अर्थात लोमोनोसोवची* आठवण करून देऊन त्याने माझ्यापुढे एक तेजस्वी उदाहरण ठेवले. येवरेईनोवने माझ्यापुढे प्रस्ताव मांडला होता: कझानमध्ये मी त्याच्याबरोबर रहायचे आणि सबंध शरद ऋतू व हिवाळाभर जिम्नाशियमचा अभ्यास करायचा. मग मी "काही थोड्या" परीक्षा द्यायच्या. हो, तो असेच म्हणाला होता—"काही थोड्या!" विद्यापीठ मला शिष्यवृत्ती देईल आणि पाच–एक वर्षांमध्ये मी "पंडित" होईन. सारे काही अगदी सरळ

---

*लोमोनोसोव — १८ व्या शतकातील प्रख्यात रशियन शास्त्रज्ञ.

सोपे होते. याचे कारण येवरेईनोवचे वय एकोणीस होते आणि त्याचे काळीज दयाळू होते.

आपल्या परीक्षा उत्तीर्ण करून तो निघून गेला. त्यानंतर सुमारे दोन आठवड्यांनी मी निघालो.

निरोपाच्या वेळी आजी मला म्हणाली :

"लोकांशी वाद घालू नको. तुला नेहमी वाद घालायची सवय आहे. तू फार हट्टी होत चालला आहेस आणि तुझ्या अपेक्षाही खूप वाढताहेत. हा तुझ्या आजोबांचा वारसा तुला मिळतोय. पण तुझ्या आजोबांची काय दशा झाली? एवढी वर्षं जगून आता अखेरीस कुठंच थारा नाही! बिच्चारा म्हातारा! एक लक्षात ठेव: लोकांचा न्यायनिवाडा देव करीत नाही. तो सैतानाचा करमणुकीचा खेळ आहे. अच्छा, ये आता..."

आपल्या काळसर, गुबगुबीत गालांवरचे काही विरळ अश्रू तिने पुसले आणि ती म्हणाली :

"आपली पुन्हा भेट होणार नाही. तू असा अस्वस्थ आत्मा! तू लांब लांब जात राहणार आणि मी लौकरच मरीन!"

अलिकडच्या काळात मी माझ्या लाडक्या आजीपासून दुरावलो होतो. तिला क्वचितच भेटत होतो. पण आता एवढा जिवलग स्नेही मला पुन्हा कधी भेटणार नाही, जणू माझेच एक अंग असलेली ही व्यक्ती मला पुन्हा कधी भेटणार नाही याची अचानक जाणीव होताच मनाला विलक्षण वेदना झाली.

बोटीच्या मागील टोकाशी उभे राहून मी किनाऱ्याकडे नजर टाकली. धक्क्याच्या कडेशी ती उभी होती. एका हाताने क्रूसाची चिन्हे करीत होती व दुसऱ्या हाताने आपल्या जुन्यापुराण्या शालीच्या एका टोकाने आपला चेहरा पुशीत होती. माणुसकीच्या प्रेमाने सतत तेवणाऱ्या काळ्या, तेजस्वी डोळ्यांना कोरडे करीत होती.

तर मी त्या निम-तातार शहरात दाखल झालो. एका छोट्या टेकाडावरील एकाकी उभ्या असलेल्या एकमजली लहानशा घरामधील दाटीत माझी भर पडली. एका निरुंद, दारिद्र्याने गांजलेल्या रस्त्याच्या टोकाशी ते घर उभे होते. घराच्या एका बाजूला उजाड मोकळी जागा होती. तेथे दाट लव्हाळी उगवली होती. एके काळी तेथे मोठी आग लागली होती. कडू दवणा, तांबडा चुका यांचे रान माजले होते.

त्याभोवती झुडुपांची गर्दी दाटली होती व त्यातून दूरवर एका पडक्या विटकरी इमारतीचे अवशेष अंधुक दिसत. त्या पडक्या इमारतीखाली एक तळघर होते. भटकी कुत्री त्या तळघरात रहात आणि मरून जात. ते तळघर मला फार चांगले आठवते: माझ्या विद्यापीठांपैकी ते एक विद्यापीठ होते.

येवरेईनोव कुटुंब—आई आणि दोन मुले—अपुऱ्या पेन्शनीवर दिवस काढीत होते. त्या घरात अगदी पहिल्या दिवसांपासून माझ्या नजरेला करुण दृश्य पडत होते: ती शुष्क, छोट्या चणीची विधवा मंडईतून दमून भागून यायची आणि स्वयंपाकघरातील टेबलावर आपली तुटपुंजी खरेदी ठेवून कपाळाला हात लावून विषण्ण नजरेने पहात बसायची. कमी प्रतीच्या मांसाच्या त्या चार तुकड्यांमधून तीन दणदाकट मुलांना भरपूर खाऊ कसे घालायचे, ही तिच्यापुढे मोठी समस्या असायची. स्वतःचा तर ती विचारच करीत नसे.

ती अगदी कमी बोलत असे. अगदी अखेरची ताकद संपुष्टात आलेल्या ओझ्याच्या घोड्याच्या डोळ्यात जो बापुडवाणा आणि हताश हट्टवादी भाव दिसतो, तसा भाव तिच्या राखाडी डोळ्यांमध्ये दिसायचा. चढावर गाडी ओढताना त्या गरीब घोड्याला जाणीव आहे की, वर टोकापर्यंत तो कधीच पोहोचणार नाही. तरीही तो ओझे ओढत राहतो!

मला येऊन तीन-चार दिवस उलटले होते. सकाळच्या वेळी स्वयंपाकघरात बसून मी तिला भाजी निवडायला मदत करीत होतो. तिचे मुलगे अजून झोपलेले होते. शांतपणे थकल्या आवाजात तिने मला विचारले:

"शहरात तू कशासाठी आलायस?"

"अभ्यास करायला. विद्यापीठात!"

तिच्या भुवया सावकाश उंचावल्या, फिकट कपाळावर चुण्या पडल्या. तिच्या हातून चाकू निसटला व बोट कापले. जखम चोखीत ती खुर्चीत मटकन बसली. पण दुसऱ्याच क्षणी ताडकन उठून तिखट सुरात उद्गारली: "स्स ऽऽ! जळ्ळं मेलं!"

रुमालाने आपले बोट बांधून ती कौतुकाने म्हणाली: "तू बटाटे छान सोलतोस!"

मला वाटते मी खरेच बटाटे चांगले सोलले होते. नदीवरच्या बोटीवर मी केलेल्या कामाबाबत तिला सांगितले. तिने विचारले:

"विद्यापीठात प्रवेश घ्यायला ती पुरेशी तयारी आहे असं वाटतं तुला?"

त्याकाळी मला विनोदाची फारशी जाण नव्हती. तिचा प्रश्न मी अगदी गंभीर मानला आणि विद्यामंदिराची दारे माझ्यापुढे खुली होण्यासाठी मी कोणकोणत्या टप्प्यांनी जाणार होतो याची तिला साग्र माहिती दिली.

ती निःश्वास टाकून म्हणाली: "अरे निकोलाय! निकोलाय! काय केलंस रे बाबा तू!"

नेमक्या त्याच क्षणाला निकोलाय स्वयंपाकघरात तोंड धुवायला आला. त्याचा चेहरा झोपाळू होता, केस विस्कटलेले होते आणि नेहमीप्रमाणे तो आनंदी होता.

"आई, पिल्मेनी* कर छानपैकी," तो म्हणाला.

"होय, करीन," आई म्हणाली.

पाककलेतील माझ्या पांडित्याचे प्रदर्शन करायची मला घाई झाली होती. पिल्मेनी बनविण्यासाठी ते मटण चांगले नव्हते आणि पुरेसेही नव्हते असा मी शेरा मारला.

त्याक्षणी वार्वारा इवानोवना एकदम चिडली. मला उद्देशून चार शब्द ती रागारागाने बोलली. माझे कान शरमेने तापून लाल झाले. हातातील गाजरे धुता धुता वार्वारा इवानोवनाने त्यांना एकदम फेकून दिले व स्वयंपाकघरातून ती ताडदिशी निघून गेली. निकोलायने मला डोळा घालून समजावले:

"आज ती जरा वेगळ्या मनःस्थितीत आहे."

बाकड्यावर आरामात बसून त्याने मला माहिती दिली की, सर्वसाधारणपणे पुरुषांपेक्षा बायका जास्त घाबरट असतात. स्वित्झर्लंडमधील एका प्रसिद्ध शास्त्रज्ञाने म्हणे ही बायकी स्वभावाची घडण निर्विवाद सिद्ध केली होती. जॉन स्टुअर्ट मिल नांवाच्या एका इंग्रजानेही या विषयावर आपली मते मांडली होती म्हणे!

मला शिकविण्याचा उद्योग निकोलायला खूप आवडत असे. या ना त्या आवश्यक गोष्टीविषयीचे ज्ञान–ज्याच्याविना आयुष्य नक्कीच अशक्य ठरले असते–माझ्या मेंदूत भरण्याची एकही संधी तो वाया

---

*एक रशियन खाद्यपदार्थ–अनु.

दवडीत नसे. मीही त्याचे शब्द अधीरपणे ऐकत असे. थोड्या काळा-नंतर फुको, द ला रोशफुको आणि द ला रोशजॅकेलीन माझ्या मनात मिसळून एकच रूप धारण करीत. आणि मग लावोयझियेने दूमोरियेचा शिरच्छेद केला का त्याउलट घडले याची आठवण ठेवणे कठीण होऊन बसे. माझ्यातून "कुणीतरी" घडविण्याचा त्या प्रेमळ तरुणाने चंग बांधला होता. तसे त्याने ठाम आश्वासनही दिले होते. पण त्याच्या-पाशी तेवढा वेळ नव्हता आणि माझ्या शिक्षणाला पद्धतशीर मार्गदर्शन करण्यास योग्य वातावरण उपलब्ध नव्हते. तरुणसुलभ अहंगंडाने आणि अविचारीपणाने त्याला आंधळे केले होते. हाता-तोंडांची गाठ घालताना त्याच्या आईला किती सायास पडत होते याकडे त्याचे लक्षच जात नव्हते. त्याच्या भावाच्या तर त्याहूनही लक्षात येत नव्हते. त्याचा भाऊ म्हणजे एक मंद, अबोल शाळकरी मुलगा होता. पण स्वयंपाक-घरातील रसायनशास्त्राच्या आणि अर्थशास्त्राच्या गुंतागुंतीच्या जादूच्या खेळात मला केव्हाची बरीच गती होती. त्या बाईची दररोज होणारी कसरत मला स्पष्ट दिसत होती. आपल्या मुलांच्या भुकांना फसविण्या-साठी आणि एका अनाकर्षक व अडाणी सवयींच्या अनोळखी तरुण मुलाला खाऊ घालण्यासाठी रोज तिला यातायात करावी लागत होती. अर्थातच त्या घरात पावाचा प्रत्येक तुकडा गिळताना मला खूप जड जात होते. माझ्या सदसद्विवेकबुद्धीला टोचणी लागत होती. मी कामाचा शोध सुरू केला. भल्या सकाळीच मी घरातून बाहेर पडायचा आणि जेवणाची वेळ टळून गेली याची खात्री होईपर्यंत बाहेरच रहायचा. जेव्हा हवा वाईट असे तेव्हा त्या पडक्या इमारतीमधील तळघरात मी आसरा घेत असे. मेलेल्या कुत्र्या-मांजराच्या मध्यभागी बसून, त्यांच्या मलमूत्राचे घाण वास सहन करीत, कोसळणाऱ्या पावसाचे व विव्हळणाऱ्या वाऱ्याचे आवाज ऐकत असे. विद्यापीठ हे माझे एक पोकळ स्वप्न होते याची लौकरच मला जाणीव झाली. त्यापेक्षा मी पर्शियाला पळून गेलो असतो तर फार बरे झाले असते. त्याआधी मी किती किती मनोराज्ये रचली होती. स्वतःला मी पांढऱ्याशुभ्र दाढी-वाल्या जादूगाराच्या स्वरूपात पाहिले होते. सफरचंदाच्या आकाराचे दाणे असलेला गहू आणि राय पिकविण्याच्या कला मला अवगत होत्या. एकेक पूड वजनाचा एकेक बटाटा मी निर्माण करीत होतो. ह्या पृथ्वीवर केवळ मलाच नव्हे तर इतरांनाही खूप खूप अवघड असलेल्या

आयुष्यात आणखी अशा अनेक हितकारक गोष्टी मी दिवास्वप्नांमध्ये करीत होतो.

अत्यंत विलक्षण धाडसांविषयी आणि अद्भुत कृत्यांविषयी स्वप्ने पाहण्याचा मला छंद जडला होता. आयुष्याच्या कठीण काळात ह्या छंदाची मला फार मदत होत होती. असे कठीण दिवस खूप असल्याने स्वप्नरंजनाच्या कलेत मी चांगलाच पारंगत बनलो. बाहेरच्या मदतीची मला अपेक्षा नव्हती. कोणत्याही यशाची आणि योगायोगाची मी आशा धरली नव्हती. पण हळूहळू माझ्यात एक हट्टी निग्रह तयार होत होता. आयुष्य जेवढे जास्त अवघड होई, तेवढी अधिक सामर्थ्याची, अधिक शहाणपणाची भावना माझ्या मनात तयार होई. माणूस आपल्या भोव-तालच्या गोष्टींना जो प्रतिकार करतो त्यातून त्याची घडण होते, हे मी लहान वयातच शिकलो.

उपासमार टाळण्यासाठी मी वोल्गा नदीवरील धक्क्यांवर जात असे. तेथे पंधरा-वीस कोपेक मी सहज मिळवीत असे. गोदीकामगार, भटके, चोर इत्यादींच्या संगतीत तेथे मला निखाऱ्यात खुपसलेल्या लोखंडी सळईसारखे भासत असे. कारण प्रत्येक दिवस तीव्र आणि भाजते अनुभव मनावर उमटवून जात होता. त्या आवर्तमान जगामध्ये माणसांच्या जाणीवा राकट बनत होत्या, त्यांची लालसा उघडीनागडी आणि प्रकट दिसत होती. त्या लोकांचा जीवनाविरुद्धचा कडवटपणा मला आकर्षित करीत होता. पृथ्वीवरील प्रत्येक गोष्टीविषयीचा त्यांचा उपरोधिक विरोध आणि स्वतःविषयीची त्यांची बेफिकीरी मला खूप आकर्षित करीत होती. मी स्वतः जे काही अनुभवले होते त्यामुळे ह्या माणसांकडे मी खेचला जात होतो. त्यांच्या दाहक जगात पूर्ण बुडी मारायची इच्छा होत होती. ब्रेट हार्ट यांच्या गोष्टी आणि असंख्य सस्त्या कादंबऱ्या वाचून ह्या जगाविषयीचे आकर्षण मला अधिकच वाटू लागले.

बाश्कीन नांवाचा एक धंदेवाईक चोर तेथे होता. पूर्वी तो सरळ साधा शाळकरी विद्यार्थी होता. आता त्याला क्षयाची बाधा झाली होती. अनेकदा त्याला पाशवी मार बसायचा. त्याने मला चतुर भाषेत ताकीद दिली:

"एखाद्या अंगचोर पोरीसारखं लाजायला काय होतंय तुला? अब्रू जाईल अशी भीती वाटते? पोरीपाशी गमावण्यासारखी फक्त

अब्रूच असते. पण तुझ्या नशिबी मात्र जोखड! बैल प्रामाणिक आहे. पण गवत खाऊन तो आपलं पोट भरू शकतो!"

बाश्कीन लहान चणीचा होता. त्याचे केस लाल होते. एखाद्या नटासारखा तुळतुळीत दाढी घोटून तो फिरायचा. त्याच्या लवचिक, सफाईदार हालचाली पाहताना मांजरीच्या पिलाची आठवण व्हायची. माझ्याबद्दल त्याच्या मनात आपुलकी निर्माण झाली होती. चार शहाणपणाच्या गोष्टी मला शिकवाव्या, माझे रक्षण करावे, अशी त्याची वृत्ती बनली होती. मला यशाचा आणि सुखाचा लाभ व्हावा अशी त्याची मनोमन इच्छा असल्याचे मला जाणवत असे. तो अतिशय बुद्धिमान होता. त्याने अनेक चांगली पुस्तके वाचली होती. 'द काऊंट ऑफ मॉन्टे क्रिस्टो' त्याचे सर्वांत आवडते पुस्तक होते.

"त्या पुस्तकात आत्मा आहे, हेतूही आहे" तो म्हणायचा.

त्याला बायकांची आवड होती. बायकांविषयी खूप उत्तेजित होऊन तो बोलत असे. त्यावेळी तो मिटक्या मारायचा. त्याच्या रोगजर्जर शरीराला झटके द्यायचा. त्याचे हे झटके बघायला किळसवाणे वाटत. पण त्याचे बोलणे मात्र मी उत्सुकतेने ऐकत असे. त्यातील सौंदर्य मला जाणवत असे.

"अहाहा, बायका!" तो उद्गारायचा. त्याचे खप्पड गाल लाल व्हायचे, त्याचे काळे डोळे उत्साहाने चमकू लागायचे. "बाईसाठी मी काय वाट्टेल ते करीन! सैतानाप्रमाणं बाईलासुद्धा कशातही पाप वाटत नाही. प्रेमात रहावं—त्याहून चांगली गोष्ट अजून शोधण्यात आलेली नाही!"

उत्तम कथनाची हातोटी त्याच्यापाशी होती. फसलेल्या प्रेमाच्या अथवा एकतर्फी प्रेमाच्या दु:खाची छोटी छोटी गाणी तो वेश्यांसाठी अगदी सहजपणे रचून देत असे. वोल्गावरील सर्व शहरांमधून ही गाणी गायली जात. इतर गाण्यांबरोबर ह्या एका खूप प्रचलित गाण्याचा तो रचनाकार होता:

पोरगी असेल जर साधी-सपाट,  
अन् अंगावर तिच्या नुस्ता गोणपाट,  
अहो लगीन तिच्याशी करणार कोण?  
हिंमत असली धरणार कोण?

त्रूसोव माझा हितचिंतक होता. पण तो लबाड माणूस होता. अत्यंत सुरेख दिसणारा हा माणूस अक्कडबाज पोषाख करीत असे. एखाद्या संगीत वादकाप्रमाणे त्याच्या हाताची बोटे नाजूक होती. अॅडमिराल्टी विभागात त्याचे एक छोटेसे दुकान होते. "घड्याळ दुरुस्ती" अशी जरी त्या दुकानावर पाटी असली तरी प्रत्यक्षात मात्र चोरीच्या वस्तू विकण्याचा त्रूसोवचा धंदा होता.

"चोरांच्या करामती शिकण्यात गुंतू नकोस माक्सीमिच," आपली पांढुरकी होत चाललेली दाढी ऐटबाजपणे कुरवाळीत व आपले धीट आणि धूर्त डोळे किलकिले करीत तो मला म्हणायचा. "तो तुझा रस्ता नव्हे हे मला दिसतंय. तू फारच भल्या प्रकारचा आहेस."

"भल्या प्रकारचा म्हणजे काय म्हणायचंय तुम्हाला?"

"ज्यांना कधीही हेवा वाटत नाही. फक्त माहिती करून घ्यायचं कुतूहल असतं!"

माझ्याविषयीचे ते वर्णन खरे नव्हते. मला अनेकदा अनेक गोष्टींचा हेवा वाटत असे. उदाहरणार्थ बाश्कीनच्या बोलण्याच्या शैलीचा मला हेवा वाटायचा. त्याची विशिष्ट काव्यमय बोलण्याची धाटणी, त्याची अनपेक्षित अलंकार आणि म्हणी उच्चारण्याची ढब, वगैरे. त्याच्या एका प्रेम-साहसाच्या कथेचा आरंभ मला आठवतो:

"एका गढूळ रात्री झाडाच्या ढोलीत बसलेल्या घुबडाप्रमाणं स्वीयाझस्क नांवाच्या भिकार गावातल्या पथिकाश्रमात मी अंगाची मुटकुळी करून पडलो होतो. शरदाचा मोसम — ऑक्टोबर महिना. आळसलेला पाऊस झिमझिमत होता. आणि एखाद्या ताताराशी कुणीतरी वाईट वागलं म्हणजे तो जसा विव्हळतो तसा वारा आवाज काढीत होता — अखंड अू ऽऽऽ अू ऽऽ अू...

"...आणि ती आली... हलक्या पावलांनी. गुलाबी कांतीची. सूर्योदयावेळी दिसणाऱ्या ढगासारखी. तिच्या डोळ्यात खोटा पवित्र भाव. 'माझ्या लाडक्या प्रेमा', ती म्हणाली, तेव्हा तिच्या आवाजात खरेपणा होता. 'मी तुझ्याबरोबर पाप केलं नाही.' ती खोटं बोलतेय हे मला माहीत होतं. तरीही मी तिच्यावर विश्वास ठेवला. माझ्या मनाला तिच्या खोटेपणाची खात्री होती. पण ती खोटी होती असं मानायला माझं काळीज तयार नव्हतं."

तो अर्धवट डोळे मिटून बोलायचा, शरीराला तालबद्ध झोके द्यायचा.

आपल्या छातीला हृदयापाशी स्पर्श करण्यासाठी त्याचा हात वारंवार हलकेच वर उचलला जायचा.

त्याचा आवाज बद्द आणि कोरडा होता. पण त्याचे शब्द स्पष्ट असत. जणू बुलबुल पक्ष्याच्या स्वरांचे कंपन त्यांच्यातून जाणवे.

त्रूसोवचाही मला हेवा वाटायचा. सैबेरिया, खीवा, बुखारा यांविषयीच्या अफाट गोष्टी हा माणूस सांगत असे. त्याचे बोलणे गंमतीचे असे, पण तरीही त्यात धर्मोपदेशकाचा विलक्षण कडवटपणा भरलेला असायचा. एक दिवस झार तिसऱ्या अलेक्सांदरविषयी तो म्हणाला:

"हा झार आपल्या उद्योगात फार तरबेज आहे."

एखाद्या कादंबरीच्या अखेरी अनपेक्षितपणे उदात्त मनाच्या नायकांमध्ये रूपांतर घडणाऱ्या "खलपुरुषां"पैकी त्रूसोव हा एक खलपुरुष असावा, असे मला त्याच्याविषयी वाटत असे.

एखाद्या कोंदट रात्री ही मंडळी छोटचा कझान्का नदीपलिकडच्या किनाऱ्यावरील कुरणात जमा होत. तिथे झुडुपात बसून दारू पीत, खात आणि आपल्या भानगडींविषयी बोलत. आयुष्यातील गुंतागुंती, मानवी नात्यांमधील घोटाळे, हे त्यांच्या चर्चेचे मुख्य विषय असत. त्यातही प्रामुख्याने ते बायकांविषयी बोलत. त्या बोलण्यात दुष्टावा असायचा किंवा कारुण्य असायचे, भावनांचा हेलावून टाकणारा आवेग असायचा. एखाद्या अंधाऱ्या जागेत डोकावून पाहताच भयानक आणि अज्ञात गोष्टी लटकताना दिसाव्यात तसे त्यांचे बोलणे ऐकताना अनेकदा भासायचे. मी त्या लोकांबरोबर त्या ठिकाणी निस्तेज ताऱ्यांनी भरलेल्या काळोख्या आकाशाखाली अशा दोन-तीन रात्री घालविल्या होत्या. वाळुंजीच्या झुडुपांचे दाट रान माजलेल्या एका कोंदट ऊबदार खळग्यात अंग टाकून आम्ही पडलो होतो. वोल्गा नदी जवळच असल्याने दमटपणा जाणवत होता. अंधारात वोल्गावरील बोटींचे दिवे सोनेरी कोळ्यांप्रमाणे चारी दिशांनी सरपटताना दिसत होते. उंच टेकाडाच्या किनारपट्टीवर काळोखात आगीची विखुरलेली ढेकळे आणि तिच्या बारीक रेषा दिसत होत्या. ऊस्लोन नामक धनवान खेड्यामधील घरांच्या आणि पथिकाश्रमांच्या त्या खिडक्या होत्या. आगबोटीच्या चाकांचे पंखे पाण्यावर मंदपणे आपटत होते. जवळून जाणाऱ्या पडावांच्या रांगेवरील खलाशी ओरडत होते. त्यांच्या घोगऱ्या आरोळ्या लांडग्यांच्या आरोळ्यांप्रमाणे भासत होत्या. कोठेतरी ऐरणीवर घणाचे घाव पडलेले

ऐकू येत होते. पाण्यावरून एक शोकगीत तरंगत येत होते—कुणाचातरी पोळणारा आत्मा वेदनेला वाट करून देत होता. त्या गाण्याने अंतः-करणावर कारुण्याची राख शिंपडली होती.

आणि माझ्या सोबत्यांची मंद आवाजातील कुजबूज ऐकताना तर आणखीच उदास वाटत होते. जीवनाविषयी चिंतन करीत प्रत्येकजण आपल्या काळजातील व्यथा बोलत होता. दुसऱ्यांचे बोलणे कुणी ऐकतच नव्हता. वाळुंजीच्या झुडुपांच्या सावलीत ते बसले होते किंवा पहुडले होते. अधूनमधून धूम्रपान करीत होते आणि मुळीच आधाशीपणा न करता वोदकाचे अगर बीयरचे घुटके घेत होते. त्याच तंद्रीत आपल्या आठवणींच्या अंधुक रस्त्यांवरून वाहवत जात होते.

"तर माझ्या आयुष्यात असं घडलं होतं," कुणीतरी म्हणायचा. रात्रीचा अंधार त्याला पृथ्वीवर दाबून धरतोय असे त्याच्या अचानक बोलण्यामुळे वाटायचे.

आणि त्याची कहाणी सांगून संपली म्हणजे इतरजण संमतीदर्शक कुजबुजायचे :

"होय, अशा गोष्टी घडतात खऱ्या! काय वाट्टेल ते घडू शकतं!"

"घडलं," "घडतं" "असं घडायचं" हे शब्द माझ्या कानांवर इतक्या वेळा पडले की, त्या रात्री ही माणसे त्यांच्या आयुष्यातील अखेरच्या घटका मोजत आहेत असा मला भास झाला. सर्व काही घडून गेले होते. आणखी घडायचे काही उरले नव्हते!

ही भावना माझ्या विचारांना बाश्कीन आणि त्रूसोवपासून दूर न्यायची. तरीही त्यांचे मला आकर्षण वाटायचे. आणि मी जे काही अनुभवले होते त्याच्या तर्कशास्त्रानुसार मी त्यांचा मार्ग पत्करणे स्वाभाविक ठरले असते. अधिक वरच्या गोष्टी प्राप्त करण्याच्या, शिक्षण घेण्याच्या माझ्या फुललेल्या आकांक्षा मला त्यांचाच मार्ग अनु-सरायला भाग पाडत होत्या. उपासमार, कडवटपणा, निराशा यांनी काठोकाठ भरलेल्या घटकांच्या वेळी मला केवळ "मालमत्तेच्या पवित्र संस्थे"विरुद्ध चीड येई असे नव्हे, तर कोणताही गुन्हा करण्यास मी पूर्ण समर्थ होतो असे जाणवे. फक्त माझ्या यौवनसुलभ भावनाप्रधान वृत्तीपायी मी त्या अटळ मार्गापासून दूर राहिलो. मानवतेवर प्रेम करणाऱ्या ब्रेट हार्टची पुस्तके मी वाचली होती. आणखी काही सवंग कादंबऱ्याही वाचल्या होत्या. पण त्याशिवाय अनेक गंभीर पुस्तकेही

मी एव्हाना वाचली होती. त्या पुस्तकांनी माझ्या मनात इतर गोष्टीं-विषयी आकांक्षा निर्माण केल्या होत्या. त्या गोष्टींची माझ्या नजरेसमोर केवळ अंधुक कल्पना होती. पण माझ्या भोवतालच्या वातावरणापेक्षा त्या मला अधिक आकर्षित करीत होत्या.

त्याच सुमारास माझ्या काही नव्या ओळखी होत होत्या. मनावर नवे संस्कार होत होते. येवरेईनोव कुटुंबाच्या घराशेजारच्या मोकळ्या जागेत गरोदकी* खेळण्यासाठी जिम्नाशियमचे विद्यार्थी अनेकदा एकत्र येत. त्यांच्यापैकी गूरी प्लेतन्योव नांवाच्या विद्यार्थ्याकडे मी खूप ओढला गेलो होतो. काळसर वर्णाच्या ह्या तरुणाचे जपानी लोकांप्रमाणे निळसर काळे केस होते, त्याच्या तोंडावर अनेक बारीक काळे ठिपके भरलेले होते. जणू काही बंदुकीची दारू त्याच्या कातडीवर चोळली आहे असे वाटायचे. तो स्वभावाने खूप गंमत्या होता, खेळात प्रवीण होता, संभाषणात चतुर होता. त्याच्यात अनेक गुण वास करीत होते. बहुतेक रशियनांप्रमाणे तो निसर्गदत्त देणगीवर जगत होता. आपल्या गुणांची वाढ करण्यासाठी अगर त्यांना एकवटण्यासाठी काहीही प्रयत्न करीत नव्हता. संगीताची त्याला आवड होती आणि जाणही होती. गूस्ली, बलालैका**, ॲकॉर्डियन ही वाद्ये तो सुरेख वाजवीत असे. तरीही, अधिक वरच्या दर्जाच्या आणि अधिक अवघड वाद्यांवर प्रभुत्व मिळविण्याचा त्याने मुळीच प्रयत्न केला नव्हता. तो गरीब होता आणि त्याचा पोषाख अगदी वाईट असे. पण त्याचा फाटका, चुरगळलेला सदरा, ठिगळे लावलेली विजार आणि तळापर्यंत टाचा झिजलेले बूट त्याच्या एकूण बेफिकीर स्वभावाशी, त्याच्या जोरदार हावभावांशी, त्याच्या चपळ हालचालींशी आणि पिळदार आकृतीशी अगदी पूर्ण मिळते जुळते होते.

प्रदीर्घ आणि पीडादायी आजारामधून नुकत्याच बऱ्या झालेल्या एखाद्या माणसासारखा तो वागायचा. अथवा जणू कालच सुटका झालेल्या कैद्यासारखा. जीवनापासून मिळणारी प्रत्येक गोष्ट त्याला नवी आणि प्रसन्न भासायची. प्रत्येक गोष्ट त्याला आनंदी धुमाकूळ घालायला उद्युक्त करायची. गुणगुणणाऱ्या भ्रमराप्रमाणे तो सर्वत्र बागडायचा.

---

* गरोदकी – रशियन खेळ.

** गूस्ली, बलालैका – रशियन तंतूवाद्ये.

मी किती कठीण आणि अनिश्चित आयुष्य जगत होतो हे त्याला समजले तेव्हा त्याने मला सुचविले की, मी त्याच्यापाशी रहायला जावे आणि खेड्यात मास्तर बनण्यासाठी अभ्यास करावा. अशा रीतीने मी त्या विचित्र, आनंदी "मारूसोवका" गलिच्छ वस्तीत दाखल झालो. कझानमधील विद्यार्थ्यांच्या अनेक पिढ्यांना ही वस्ती कदाचित परिचयाची असेल. अनेक अर्धपोटी विद्यार्थ्यांनी, वेश्यांनी आणि अवनतीला पोहोचलेल्या मानवी जीवांनी – हे जीव जणू आपला काळ संपून गेला तरी जगत होते असे वाटे – रीब्नोऱ्यादस्काया रस्त्यावरील एक मोठी, मोडकळीला आलेली इमारत सर्व तऱ्हांनी त्या इमारतीच्या मालकांपासून काबीज केली होती. पोटमाळ्यावरील खोलीच्या जिन्या-खालच्या हॉलमधील मोकळ्या जागेत प्लेतन्योव रहात होता. जिन्याखाली त्याची खाट होती आणि हॉलच्या टोकाच्या खिडकीपाशी एक टेबल आणि खुर्ची. बस्स, आणखी काही नाही. त्या हॉलमधून तीन खोल्यांना रस्ता जात असे. दोन खोल्यांमध्ये वेश्या रहात होत्या आणि तिसरीत एक क्षयी गणिती रहात होता. पूर्वी तो पाठशाळेत शिकत होता. उंच, रोड आणि भयानक चेहऱ्याच्या ह्या माणसाच्या अंगावर त्याचे नागडेपण जेमतेम झाकण्यापुरती लक्तरे ल्यायलेली असत. त्याच्या गालांवर खरबरीत, तांबूस दाढीचे रान माजले होते. त्याच्या फाटक्या कपड्यांमधून त्याची भयानक, निळसर त्वचा आणि त्याच्या बरगड्या स्पष्ट दिसत.

आपली स्वतःची केवळ नखे खाऊनच तो जगत होता असे वाटायचे. ती नेहमी कुरतडलेली दिसत. दिवसरात्र तो कसल्यातरी आराखड्यां-मध्ये आणि हिशेबांमध्ये गुंतलेला असायचा. अखंड खोकत असायचा. त्याच्या त्या बद्द आवाजामधील खोकल्याने वातावरण हादरून जायचे. वेश्या त्याला वेडा समजत आणि त्याला घाबरून असत. पण करुणेपायी त्या त्याच्या दारापाशी पाव, चहा आणि साखर अशा गोष्टी ठेवून देत. तो खोलीतून बाहेर यायचा आणि ही पुडकी उचलून आत न्यायचा. त्यावेळी एखाद्या थकलेल्या घोड्याप्रमाणे मोठ्या कष्टाने सूं सूं आवाज करीत त्याचा श्वासोच्छ्वास चालायचा. जर त्या वेश्या ह्या वस्तू ठेवायला विसरल्या अथवा काही कारणामुळे त्यांना तसे करणे शक्य झाले नसले तर तो दारात उभे राहून घोगऱ्या आवाजात ओरडायचा:

"खायला पाहिजे!"

खोल वर्तुळांमध्ये गाडले गेलेले त्याचे डोळे वेडयाच्या अभिमानाने चमकत. स्वत:च्या मोठेपणाच्या ज्ञानाने त्याला आनंद झालेला दिसे. बऱ्याच काळाच्या अंतराने त्याला एक छोटा, कुबड असलेला आणि फेंगडया पायाचा राक्षस भेटायला येत असे. पांढऱ्याशुभ्र केसाच्या त्या प्राण्याच्या सुजट नाकावर जाड भिंगांचा चष्मा टेकलेला असे. खच्ची झालेल्या माणसासारखा त्याचा चेहरा पांढुरका होता आणि एक छद्मी हास्य त्यावर विलसत असे. दार घट्ट बंद करून ते दोघे तासन्तास गप्प बसत. त्या खोलीमधून एक चमत्कारिक स्तब्धता पसरत असल्याचा भास होई. एकदा मात्र खूप उशीरा रात्रीच्या वेळी मी त्या गणितीच्या घोगऱ्या आवाजातील ओरडण्यामुळे जागा झालो. तो रागारागाने म्हणत होता:

"मी म्हणतो हा तुरुंग आहे. भूमिती म्हणजे एक पिंजरा आहे! होय, उंदराचा सापळा आहे! एक तुरुंग आहे."

तो कुबडा राक्षस कर्कश्य आवाजात काहीतरी भराभरा बडबडला. एक विचित्र शब्द तो पुन:पुन्हा उच्चारीत होता. पण मला तो शब्द माहीत नव्हता. मग अचानक गणितीने बेंबीच्या देठापासून आरोळी ठोकली:

"जहन्नममध्ये गेलास! चालता हो!"

रागारागाने फिस्कारत आणि किरटया आवाजात बडबडत तो पाहुणा घाईघाईने आपला काळा डगला अंगाभोवती लपेटून हॉलमधून बाहेर जात होता तेव्हा गणिती आपल्या दारामध्ये उभा होता. त्याची लुकडी, भेदरवून टाकणारी आकृती स्वत:चे केस गच्च आवळून उभी होती. घरघरत्या आवाजात तो ओरडला:

"यूक्लीड मूर्ख आहे! महामूर्ख! त्या मूर्ख ग्रीकापेक्षा परमेश्वराला जास्त अक्कल असल्याचं मी सिद्ध करीन!"

नंतर धाडकन दार आपटून तो आत गेला. त्याने दार एवढया जोराने आपटले होते की त्या हादऱ्यासरशी त्याच्या खोलीतील काहीतरी वस्तू खाली पडली व तिचा खळखळाट ऐकू आला.

लौकरच मला समजले की, उच्च गणिताच्या साह्याने देवाचे अस्तित्व सिद्ध करण्याचा ह्या माणसाचा प्रयत्न चालू होता. पण आपले ईप्सित साध्य न करताच तो मेला.

प्लेतन्योव रात्रपाळीचा प्रूफ रीडर म्हणून छापखान्यात नोकरी

करायचा. एका रात्रीला त्याला अकरा कोपेक मिळत. जर मला काहीच मिळकत झाली नाही तर चार पौंड पाव, दोन कोपेकचा चहा आणि तीन कोपेकची साखर एवढ्या शिध्यावर आम्ही दिवसाचा गुजारा करीत असू. पैसे मिळविण्यासाठी माझ्यापाशी फारसा वेळ नसायचा, कारण मला अभ्यास करावा लागे. शिकण्यासाठी मला फार मेहनत पडायची. विशेषत: व्याकरणशास्त्राचा अभ्यास मला दडपून टाकायचा. त्याच्या भयानक संकुचित अश्मीभूत प्रकारांमध्ये रशियन भाषेला कोंबणे मला अगदी अशक्य ठरायचे. कारण रशियन भाषा किती जिवंत थड-थडीत, किती अवघड, किती प्रवाही आणि किती बहुविध होती. पण लौकरच मी सुटकेचा नि:श्वास टाकला. आम्हाला असे आढळले की, मी "फार लौकर" माझा अभ्यास सुरू केला होता. म्हणजे खेड्यातील मास्तरकीसाठी मी परीक्षा दिली असती तरी माझी नोकरीवर नेमणूक झाली नसती, कारण मी वयाने खूप लहान होतो.

प्लेतन्योव आणि मी एकाच खाटेवर झोपत असू—तो दिवसा आणि मी रात्री. जेव्हा तो रात्रभरच्या कामाने थकूनभागून भल्या सकाळी घरी यायचा तेव्हा त्याचा चेहरा अधिकच काळपट दिसत असे, त्याचे डोळे लालभडक सुजलेले असत. मी घाईघाईने उठून खाणावळी-मधून गरम पाणी आणायचा, कारण आमच्यापाशी पाणी तापवायला अर्थातच समोवार नव्हता. मग खिडकीजवळच्या टेबलाशी बसून चहा-पावाची न्याहरी आम्ही उरकीत असू. त्यावेळी गूरीय सकाळच्या वर्तमान-पत्रामधील बातम्या भडाभडा सांगायचा आणि "तांबडा डोमिनो" ह्या नांवाने लिहिणाऱ्या एका दारुड्या स्तंभलेखकाच्या नव्या विनोदी कविता पाठ म्हणून दाखवायचा. गूरीयचा जीवनाविषयीचा सहज दृष्टिकोन मला नेहमी चकित करीत असे. बायकांच्या जुन्या वस्तूंचा धंदा करणाऱ्या गुबगुबीत तोंडाच्या गाल्कीना नांवाच्या बाईशी तो जेवढा गंमतीने वागायचा, त्याच गंमतीने तो आपल्या आयुष्याशी खेळायचा असे मला भासत असे.

जिन्याखालील ते छोटे बीळ त्याने ह्या बाईकडून भाड्याने घेतले होते. ह्या "खोली"साठी भाडे द्यायला पैसे नसल्यामुळे तो तिला विनोद सांगून, ॲकॉर्डियन वाजवून आणि भावनाप्रधान गाणी म्हणून भाड्याचा मामला मिटवायचा. खर्जसुरात आणि उपहासगर्भ नजरेने तो ही गाणी म्हणत असे. ही गाल्कीना बाई तिच्या तारुण्यात संगीत

नाटकांमध्ये समूहगीतात गात असे. त्यामुळे स्वराची किंमत तिला चांगली माहीत होती. अनेकदा तिला रडू कोसळायचे. तिच्या कोडग्या डोळयांमधून अश्रूंच्या धारा वाहू लागत. तिच्या नशाबाजीचे आणि खादाडपणाचे प्रतीक असलेल्या तिच्या फुगीर, जांभळट गालांवरून घळघळ अश्रू वहात. आपल्या गुबगुबीत बोटांनी ती आपल्या गालांवरील अश्रू झटकून टाकायची, मग एका कळकट हातरुमालाला आपली बोटे काळजीपूर्वक पुसायची.

"अरे गूरीय, गूरीय!" एक उसासा टाकून ती उद्गारायची. "तू अस्सल कलाकार आहेस! खरंच, जरा दिसायला बरा असतास तर तुझं मी जमवून दिलं असतं. एकलेपणाची आग सहन न होणाऱ्या बायकांशी मी अनेक देखण्या जवान "मर्दांचं" जमवून दिलंय!"

असा एक जवान "मर्द" आमच्याच वर पोटमाळ्यावरील खोलीत रहात होता. तो विद्यार्थी होता. केसाळ कातडयांच्या व्यापाऱ्याच्या मदतनीसाचा मुलगा होता. ह्या तरुणाची उंची मध्यम होती, छाती रुंद होती आणि त्याची कंबर मात्र फारच निमुळती होती. टोकावर उभ्या केलेल्या त्रिकोणासारखा तो दिसायचा. फक्त त्या टोकाचा अगदी खालचा भाग तुटून गेला आहे असे वाटे. एखाद्या बाईसारखी त्याची पावले लहान होती. त्याचे डोकेही अगदी छोटे होते. लालभडक पिंजारलेले ताठ केस त्याच्या डोक्यावर होते. त्याच्या खांद्यांमधील खळग्यात त्याचे डोके बुडून गेल्यासारखे दिसायचे. त्याच्या फिकट, रक्तहीन चेहऱ्यावर त्याचे बटबटीत घारे डोळे उदासपणे चमकत असायचे.

अफाट प्रयत्न करून, घर नसलेल्या कुत्र्यासारखी उपासमार सहन करून, आपल्या वडिलांच्या इच्छेविरुद्ध त्याने शालेय शिक्षण पूर्ण करून विद्यापीठात प्रवेश मिळविला होता. मग त्याला अचानक स्वतःच्या घनगंभीर, मऊमुलायम खर्जातील आवाजाचा शोध लागला आणि त्याने गाणे शिकायचे ठरविले.

हे आमीष धरून गाल्कीनाने आपल्या एका गिऱ्हाईकासाठी त्याला जाळ्यात पकडले होते. ते गिऱ्हाईक म्हणजे व्यापारी वर्गामधील सुमारे चाळीशीची एक श्रीमंत बाई होती. तिचा मुलगा विद्यापीठाच्या तिसऱ्या वर्षात शिकत होता आणि मुलगी शाळेत शेवटच्या वर्षात शिकत होती. ती बाई रोड आणि सपाट छातीची होती. एखाद्या सैनिकासारखी ती ताठ चालायची आणि तिचा चेहरा एखाद्या संन्यासिनीसारखा निर्विकार

होता. तिचे मोठे राखाडी डोळे काळ्या खोबणींमध्ये दडलेले होते. ती नेहमी काळा पोषाख करायची. जुन्या धाटणीचा रेशमी रुमाल डोक्याला बांधायची आणि गर्द हिरव्या रंगाच्या खड्यांची कर्णभूषणे घालायची.

रात्री उशीरा किंवा अगदी सकाळच्या प्रहरी ही बाई आपल्या जवान "मर्दाला" घेण्यासाठी वारंवार यायची. फाटकातून आत घुसून ठाम पावलांनी अंगण ओलांडून ती येत असलेली अनेकदा मी पहात असे. तिच्या चेहऱ्यामध्ये काहीतरी भयानक होते. तिचे ओठ एवढे घट्ट मिटलेले असत, की ते जवळ जवळ दिसतच नसत. तिचे डोळे भेदरलेले, निराश आणि अगदी समोर पहात असायचे. अगदी सताड उघडे असूनही ती आंधळी भासायची. कुरूपांमध्ये तिची गणना झाली नसती. तिच्या मनावरचा ताण स्पष्ट जाणवत होता व त्यापायी ती अशी बेढब दिसायची. तिचे सारे अवयव जणू आकसून गेले आहेत असे भासायचे.

प्लेतन्योव म्हणायचा: "ही बाई वेडी दिसते की नाही!"

तो विद्यार्थी त्या बाईचा तिटकारा करायचा आणि तिला टाळायचा. एखाद्या हेराप्रमाणे अथवा निष्ठुर सावकाराप्रमाणे ती बाई त्याचा पाठपुरावा करायची.

"मी अगदी अब्रू लुटला गेलेला माणूस आहे," पोटात थोडी दारू गेली म्हणजे तो म्हणत असे. "कशाला हवंय् मला हे गाणं? अशा खोपडीच्या आणि अशा शरीराच्या माणसाला ते कधी स्टेजजवळसुद्धा उभं करणार नाहीत. अगदी जवळसुद्धा जाऊ देणार नाहीत!"

"सोडून दे सगळा नाद," प्लेतन्योव त्याला सल्ला द्यायचा.

"ते मला समजतंय. पण मला तिची दया येते. खरं आहे— तिचा सहवास मला मुळीच सहन होत नाही, पण तरीही मला तिची करुणा वाटते! तुम्हाला जर समजलं की ती कशी..."

आम्हाला ते माहीत होते. रात्रीच्या वेळी आम्ही तिच्या विनवण्या ऐकल्या होत्या. पोटमाळ्यावरच्या जिन्यावर उभे राहून कापऱ्या आवाजात ती त्याची आर्जवे करायची:

"देवाच्या प्रेमाखातर... लाडक्या, देवाच्या दयेखातर रे!"

एका मोठ्या कारखान्याची ती मालकीण होती. तिच्या मालकीचा जमीनजुमला होता. तिने स्वतःचे घोडे बाळगले होते. सुईण विद्यालया-

साठी तिने हजारो रूबलची देणगी दिली होती. प्रेमाच्या भिकेसाठी ती एखाद्या लाचाराप्रमाणे विनवणी करायची.

न्याहरीनंतर प्लेतन्योव झोपायचा आणि मी कामाच्या शोधावर बाहेर पडायचा. संध्याकाळी अगदी उशीरा मी परतायचा. तेव्हा छापखान्याला जायची त्याची वेळ झालेली असे. मी जर खाण्याचे पदार्थ आणले असले—पाव, कबाब अथवा उकडलेले मांस—तर ते आम्ही निम्मे निम्मे वाटून घेत असू. आपल्या वाट्याचे खाणे तो कामावर बरोबर घेऊन जाई.

तो गेला म्हणजे मी दालनांमधून आणि आमच्या "मारूसोवका" च्या आडवाटांमधून भटकायचा. मला नवीन आणि अपरिचित असलेल्या ह्या लोकांची आयुष्ये कुतूहलाने न्याहाळायचा. ते घर माणसांनी गच्च दाटलेले होते. एखाद्या मुंग्यांच्या वारूळासारखे. ज्यांचा उगम नक्की सांगता येणार नाही अशा कसल्यातरी आंबूस आणि तिखट वासांनी ते घर भरलेले होते. प्रत्येक कोपऱ्यात माणसाला अपायकारी जाडजूड सावल्या दिसायच्या. सकाळपासून ते रात्रीच्या उशीरा प्रहरपर्यंत जीवनाचा गोंगाट चालू असायचा: शिंपिणींच्या शिवणयंत्रांचा अखंड खडखडाट; संगीतिकेत गाणाऱ्या वृंदगायिकांच्या लकेरी; पोटमाळ्यावरील तरुण विद्यार्थ्यांच्या मखमाली खर्जाची रागदारी; दारूच्या व्यसनामुळे निम्म्या गर्तेत गेलेल्या अर्धवट डोक्याच्या नटाची नादमयी बडबड; वेश्यांच्या वेडसर, नशील्या किंकाळ्या. आणि मग माझ्या मनात एक स्वाभाविक पण उत्तर नसलेला प्रश्न उभा रहायचा:

"ह्या सगळ्याला अर्थ काय?"

अर्धपोटी तरुणांमधून निरुद्देशपणे फिरणारा एक माणूस त्या घरात होता. त्याच्या पसरत चाललेल्या टकलाभोवती गाजऱ्या रंगाचे केस होते, पोट डेरेदार होते, किडकिडीत पाय होते, गालाची हाडे पुढे आलेली होती आणि घोड्याप्रमाणे भल्या मोठ्या पिवळ्या दातांनी भरलेले प्रचंड थोबाड होते. त्याच्या दातांवरून त्याला "गाजरतट्टू" असे टोपणनांव पडले होते. एका खटल्यात तो अडकला होता. गेली तीन वर्षे तो खटला कोर्टात चालू होता. सिम्बिर्स्कमध्ये व्यापारी असलेल्या काही नातेवाईकांविरुद्ध तो खटला होता. त्याचे बोलणे ऐकणाऱ्या सर्वांना त्याने सांगितले होते:

"मरायची इच्छा आहे, पण त्याआधी शेवटच्या कोपेकपर्यंत त्यांचा

सत्यानाश करीन! त्यांना भिकेला लावीन, दयेच्या अन्नावर जगायला भाग पाडीन. अशी तीन वर्षं त्यांनी काढली म्हणजे कायद्यानं जिंकलेलं सारं मी त्यांना परत करीन, आणि म्हणेन: 'साल्यांनो! आता काय म्हणता बोला!' असं करणार आहे मी!"

"गाजरतट्टू, हेच तुझ्या आयुष्याचं ध्येय आहे?" लोक त्याला विचारीत. मग तो उत्तर द्यायचा:

"त्याचाच मी पाठपुरावा करतोय, अगदी तन-मनानं! दुसरा काही विचारच मनाला शिवत नाही."

दिवसाचा वेळ तो जिल्हा कोर्टात आणि वरिष्ठ कोर्टात अथवा वकीलाच्या कचेरीत घालवीत असे. संध्याकाळी अनेकदा तो बग्गीतून घरी यायचा. पिशव्या, पुडकी, बाटल्या इत्यादींनी बग्गी भरलेली असे. छत खचलेल्या विचित्र फरशीच्या त्याच्या घाणेरड्या खोलीत तो धिंगाणा घालणाऱ्या मेजवान्या करायचा. विद्यार्थ्यांना, शिंपिणींना बोलवायचा. ज्याला पोटभर खायची आणि थोडेसे पिण्याची इच्छा होती, अशा कुणालाही बोलवायचा. खुद्द "गाजरतट्टू" फक्त रम पीत असे. टेबला-वरील रुमालावर, त्याच्या कपड्यांवर आणि फरशीवरसुद्धा त्या रमचे कायमचे काळसर तांबडे डाग पडत. काही प्याले रिचविल्यानंतर तो विव्हळू लागे:

"पाखरांनो! लाडक्या इटुकल्या पाखरांनो! माझं प्रेम आहे तुमच्यावर! तुम्ही प्रामाणिक माणसं आहात. मी एक दुष्ट हरामखोर आणि मगर-र-र-मच्छ आहे! माझ्या नातेवाईकांना बुडवायला पाहतोय. आणि देवाशप्पत मी तसं नक्की करीन! मरीन, पण..."

त्याच्या उदास मिचमिचणाऱ्या डोळ्यांमधून नशीले अश्रू त्याच्या चमत्कारीक, कुरूप चेहऱ्यावर टपाटपा ठिपकत. आपल्या हाताच्या पंजाने आपल्या गालावरील आसवे तो झटकून टाकी आणि गुडघ्यावर हात पुसून कोरडे करी. त्याच्या विजारीवर नेहमी तेलकट डाग माखलेले असत.

"कसलं आयुष्य तुम्ही जगता रे?" तो ओरडून विचारायचा. "भुकेले, गारठलेले! तुमच्या अंगावर धड कपडे नाहीत. हे बरोबर आहे का? असं जगून तुम्ही काय शिकणार? अरेरे, तुम्ही कसं जगता हे झारला समजलं पाहिजे, म्हणजे..."

आणि खिशातून मूठभर चकचकीत कागद काढून तो ओरडायचा:

"कुणाला पैसे हवेत? बंधूनो, हे घ्या!"

वृंदगानातील मुली आणि शिंपिणी त्या नोटांवर आधाशीपणे तुटून पडायच्या. त्याच्या केसाळ मुठीमधून त्या नोटा खेचून घेऊ पहायच्या. खो खो हसत त्यांना बाजूला सारीत तो म्हणायचा:

"हे तुमच्यासाठी नाहीत! विद्यार्थ्यांसाठी आहेत!"

पण विद्यार्थ्यांनी त्याचे पैसे कधीही घेतले नाही.

"आग लागो तुझ्या पैशांना!" केसाळ कातडचांच्या व्यापाऱ्याचा मुलगा चिडून ओरडायचा.

एकदा तो स्वतः खूप झिंगलेल्या अवस्थेत प्लेतन्योवपाशी दहा रूबलच्या नोटांची चुरगळलेली पुरचुंडी घेऊन आला आणि टेबलावर ते पैसे फेकून म्हणाला:

"घे! पाहिजेत? मला नकोत!"

आमच्या खाटेवर त्याने अंग झोकून दिले. त्याने जोरजोराने हुंदके द्यायला आणि ओरडायला सुरुवात केली. शेवटी आम्हाला त्याच्यासाठी पळत पळत जाऊन पाणी आणावे लागले व त्याला पाजावे लागले. जेव्हा तो झोपला तेव्हा त्याच्या चुरगळलेल्या नोटा सरळ करण्याचा प्लेतन्योवने प्रयत्न केला. पण तसे करणे अशक्य ठरले. त्या नोटा एवढ्या घट्ट दाबल्या गेल्या होत्या, की त्यांना अलग करण्यासाठी पूर्ण भिजवावे लागले.

एक ओंगळ, धुराने भरलेली खोली; शेजारच्या घराच्या विटकरी भिंतीच्या दिशेला खिडक्या; माणसे गच्च भरलेली, वातावरण कोंदट, गजबजलेले; "गाजरतट्टू" सर्वांत जास्त ओरडा करतोय. मी त्याला विचारले:

"तुम्ही इथं का राहता? हॉटेलात का रहात नाही?"

"माझ्या लाडक्या, माझ्या आत्म्याच्या शांतीसाठी! इथं तुमच्याबरोबर राहिलं म्हणजे माझ्या आत्म्याला ऊब मिळते."

व्यापाऱ्याचा मुलगा सहमत होतो.

"बरोबर गाजरतट्टू! माझंसुद्धा तसंच आहे. दुसऱ्या कोणत्याही जागी मला रहायला जमणार नाही."

"गाजरतट्टू" प्लेतन्योवची मनधरणी करतो:

"काहीतरी वाजव. आमच्यासाठी एक गाणं म्हण."

गुडघ्यांवर गूस्ली धरून गूरीय गाणे म्हणू लागतो:

ऊठ, ऊठ, हे तेजस्वी सूर्या,
लालेलाल कर आकाशा साऱ्या...

त्याचा मधुर आवाज थेट काळजाला जाऊन भिडतो.

खोलीत स्तब्धता पसरते. गाण्याच्या विषण्ण शब्दांचे आणि गूस्लीच्या तारांच्या मंद कंपनाचे उदास मनाने आकंठ श्रवण करीत सर्वजण बसून राहतात.

"च्यायला, फारच छान आहे!" व्यापारी बाईचा दुःखी सांत्वनकर्ता गुरगुरतो.

ह्या जुन्या घरातील तऱ्हेवाईक रहिवाशांमध्ये गूरीय प्लेतन्योवपाशी आनंदीपणा नांवाची एक दुर्मीळ चीज वसत होती. परीकथांमधील भल्या व्यक्तिरेखेची भूमिका तो पार पाडीत असे. यौवनाच्या विविध रंगांनी त्याचा स्वभाव मुसमुसलेला होता. विनोद, सुंदर गाणी, मानवी चालीरीतींचे आणि सवयींचे चतुर विडंबन, जीवनातील अन्यायांविषयी धीट प्रतिकार—ह्या विविध गोष्टींची सतत आतषबाजी करून तो आपल्या सभोवतालचा परिसर उजळून टाकीत असे. त्याने नुकतीच विशी ओलांडली होती. अजून तो पोरसवदाच दिसायचा. तरीसुद्धा, कुणावर संकट आले, एखादी कठीण समस्या अंगावर कोसळली, तर त्या घरातील माणसे त्याच्यापाशी सल्ल्यासाठी धाव घेत. शांत चित्ताने विचार करून या ना त्या तऱ्हेने मदत करण्यास तो समर्थ होता, अशी त्या घरामधील प्रत्येकाची खात्री पटली होती. चांगली माणसे त्याच्यावर प्रेम करीत; वाईट लोक त्याला घाबरून रहात. एवढेच नव्हे तर निकीफोरीच नांवाचा म्हातारा पोलीस गूरीय भेटला म्हणजे नेहमी आपले खोटे, लबाड स्मित करी.

"मारूसोवका" चे आवार चढावर जात होते आणि वरच्या टोकाला दोन रस्ते फुटत होते: रीब्नोऱ्यादस्काया व आणखी उंचावर स्तारो-गोर्शेचनाया. ह्या स्तारो-गोर्शेचनायावर, आमच्या फाटकापासून जवळच, एका आरामशीर छोटचाशा कोनाडचामध्ये निकीफोरीचची पहाऱ्याची चौकी उभी होती.

आमच्या परिसरामधील तो वरिष्ठ पोलीस होता. उंच, कृश अंग-काठीच्या ह्या म्हाताऱ्या माणसाच्या छातीवर पदकांची चकचकीत माळ लटकत असे. त्याचा चेहरा बुद्धिमान होता, चेहऱ्यावर मधुर हास्य होते आणि डोळे धूर्त होते.

आमच्या भल्या-बुऱ्या माणसांच्या गजबजलेल्या वसाहतीमध्ये निकीफोरीचला खूप स्वारस्य वाटायचे. दिवसभरात अनेकवेळा त्याची नीटस कातीव आकृती फाटकामध्ये अवतीर्ण व्हायची. अंगणातून सावकाशपणे चालताना प्रत्येक खिडकीत तो डोकावून पहायचा. प्राणी संग्रहालयामधील पिंजऱ्यांची पाहणी करणाऱ्या राखणदारासारखा. हिवाळ्यामध्ये आमच्या घरातील दोन भाडेकरूंना अटक झाली: एक हात असलेला लष्करी अधिकारी स्मिर्नोव आणि सैनिक मूरातोव. त्या दोघांनीही स्कोबेलेवच्या अखाल-तेके मोहीमेत * भाग घेतला होता व सेंट जॉर्ज क्रॉसचे ते मानकरी होते. एक गुप्त छापखाना स्थापन करण्याचा प्रयत्न केल्याचा आरोप त्यांच्यावर ठेवण्यात आला होता. त्या हेतूने, एका रविवारी, भर दिवसाढवळ्या, मूरातोव आणि स्मिर्नोव यांनी शहरातील एका हमरस्त्यावरील क्ल्यूचनिकोव छापखान्यामधून काही खिळे चोरण्याचा प्रयत्न केला होता. त्यांच्याबरोबरच झोब्निन, अवस्यान्किन, ग्रिगोऱ्येव, क्रीलोव व इतरांनाही अटक झाली होती. खिळे चोरीत असतानाच ते पकडले गेले होते. त्यानंतर एका रात्री राजकीय गुप्तचरांनी एका फाटक्या अंगाच्या, उदास चेहऱ्याच्या माणसाला अटक केली. "भटका घंटा-बुरूज" असे मी त्याला टोपणनांव ठेवले होते. ही बातमी दुसऱ्या दिवशी सकाळी समजताच गूरीय आपले काळे केस विसकटत उत्तेजित स्वरात म्हणाला:

"हे बघ माक्सीमिच – मोठं संकट आलंय! शक्य तितक्या वेगानं पळत जा..."

आणि मी कुठे पळत जायचे ते समजावून दिल्यानंतर तो पुढे म्हणाला:

"मात्र काळजी घे! तिथं भोवताली हेर असतील!"

ह्या रहस्यमय कामगिरीमुळे अत्यंत खूष होऊन मी सशाच्या चपळतेने ॲडमिराल्टी विभागाकडे धाव घेतली. तेथे एका तांबटाच्या दुकानात मला एक कुरळ्या केसाचा तरुण भेटला. त्याचे डोळे विलक्षण निळे होते. एका तांब्याच्या कढईवर तो काम करीत होता. पण तो कामगारासारखा दिसत नव्हता. एका दूरच्या कोपऱ्यात एक म्हातारा माणूस चापयंत्राशी उभे राहून नळ दुरुस्त करीत होता. त्याने आपल्या शुभ्र केसांना चामड्याच्या वादीने मागे बांधले होते.

---

*झारकालीन जनरलची अश्खाबाद मोहीम – सं.

मी विचारले : "इथं काही काम आहे?"

म्हाताऱ्या तांबटाने तुटक कोरडे उत्तर दिले :

"काम खूप आहे. पण तुझ्यासाठी नाही."

तरुणाने एक ओझरता कटाक्ष माझ्याकडे टाकला आणि पुन्हा मान खाली घालून तो काम करू लागला. मी हळूच त्याच्या पायाला माझ्या पायाने धक्का मारला. चकित रागाने त्याने आपले निळे डोळे माझ्याकडे वळविले. कढईचा दांडा त्याने अशा थाटात पकडला होता, की कोणत्याही क्षणी ती कढई तो माझ्या अंगावर भिरकावून मारील असे वाटत होते. पण मी डोळा मारल्याचे पाहताच तो शांत आवाजात म्हणाला :

"चालता हो इथून!"

मी पुन्हा डोळा मारला व दुकानातून बाहेर पडलो. दाराबाहेर मी वाट पहात थांबलो. कुरळया केसांचा तांबट उठला, आपले अवघडलेले स्नायू त्याने सरळ केले व माझ्या पाठोपाठ तो बाहेर आला. सिगारेट पेटवून त्याने मूक अपेक्षेने माझ्याकडे पाहिले.

"तुमचं नांव तीखोन?"

"होय."

"प्योत्रला अटक झालीय!"

रागाने त्याच्या भुवया आकुंचित झाल्या. त्याच्या डोळयांनी शोधकपणे माझ्या नजरेचा ठाव घेतला.

"कुठला प्योत्र?"

"लंबू माणूस. पाद्रयासारखा दिसतो."

"बरं मग?"

"बस्स! एवढंच!"

"पण हा प्योत्र, पाद्री आणि बाकीच्या तुझ्या भानगडीचा माझ्याशी संबंध काय?" तांबटाने विचारले. त्याच्या प्रश्नाच्या ह्या स्वरूपावरूनच माझी खात्री पटली की, तो सर्वसामान्य कामगार नव्हता. गूरीयने सोपविलेली कामगिरी पार पाडल्याच्या अभिमानातच मी घाईघाईने घरी परतलो. "कारस्थानी" भानगडींमध्ये पहिल्याप्रथम मी असा भाग घेतला.

गूरीय प्लेतन्योव अशा भानगडींशी संबंधित होता. पण मला दीक्षा द्यावी अशी मी त्याला विनंती केली की तो एवढेच उत्तर द्यायचा :

"बंधू, तू अजून लहान आहेस. तू तुझी पुस्तकं सांभाळ!"

नंतर येवरेईनोवने एका काहीशा गूढ व्यक्तीशी माझी गाठ घालून दिली. त्याने प्रस्तावनाच अशा काही थाटात केली होती, की सावध अपेक्षेने मी त्या ओळखीची वाट पाहू लागलो होतो. ही नवी ओळख करून देण्यासाठी शहराच्या हद्दीबाहेर असलेल्या आरस्कोये पोल्ये नांवाच्या एका मोठ्या खुल्या मैदानाकडे येवरेईनोव मला घेऊन निघाला होता. वाटेत त्याने मला पुन:पुन्हा बजावून सांगितले की, ह्या नव्या माणसाबरोबर संपर्क साधताना मी अत्यंत सावधगिरी बाळगणे आवश्यक होते. ही भेट गुप्त ठेवायची होती. सरतेशेवटी त्याने एका छोट्या करड्या आकृतीकडे माझे लक्ष वेधले. ओसाड मैदानातून दूरवरून ती व्यक्ती हळूहळू चालत येत होती. येवरेईनोवने हळूच एकदा मागे वळून आसपास कुणी नाही याची खात्री केली व तो माझ्या कानात कुजबुजला:

"तो बघ. त्याच्या मागोमाग जा आणि तो जेव्हा थांबेल तेव्हा त्याच्यापाशी जाऊन म्हण: 'मी शहरातून आलोय!"'

गूढाचे नेहमीच आकर्षण असते. पण इथे ही गूढता मला विचित्र वाटत होती. चांगला ढळढळीत तापल्या ऊन्हाचा दिवस. आणि शेतातील सुकल्या कडब्याच्या दांड्यासारखी दिसणारी ती एकाकी, झुलणारी मानवी आकृती! बस्स–आणखी काहीही नाही. स्मशानाच्या दाराशी मी त्या आकृतीला गाठले. अगदी रोड चेहऱ्याचा आणि पक्ष्याप्रमाणे वाटोळे डोळे असलेला एक छोटा तरुण माझ्यासमोर उभा होता. त्याने जिम्नाशियमच्या गणवेषाचा राखाडी कोट अंगात घातला होता. पण त्या कोटावर चकचकीत पितळी बटणांऐवजी हाडाची काळी बटणे लावलेली होती. त्याच्या मळकट टोपीवरही एक काळा डाग होता. त्या ठिकाणी पूर्वी जिम्नाशियमचे चिन्ह असावे. एकूण त्याने प्रौढत्वाचा उसना आव आणल्यासारखे वाटत होते.

दाट झुडुपांच्या सावलीत थडग्यांच्या मध्यभागी आम्ही बसलो. त्याची बोलण्याची ढब थंड आणि मुद्देसूद होती. मला तो आवडला नाही. त्याच्याविषयीचे काहीच आवडले नाही. मी काय वाचले आहे ह्याची त्याने काटेकोर चौकशी केली आणि त्याने चालविलेल्या अभ्यास मंडळात दाखल होण्याचे मला निमंत्रण दिले. मी ते स्वीकारले. मग आम्ही एकमेकांपासून दूर झालो. मोकळया मैदानात एक सावध कटाक्ष टाकून प्रथम तो गेला.

ह्या अभ्यास मंडळात आम्ही फक्त चार-पाच जण होतो. मी सर्वांत लहान होतो. जॉन स्टुअर्ट मिलचा अभ्यास करण्यास अथवा चेर्नीशेवस्कीची त्याच्यावरील टिपणे वाचण्यास आवश्यक ती शैक्षणिक पार्श्वभूमी माझ्यापाशी अजिबात नव्हती. मीलोवस्की नांवाच्या एका अध्यापनशास्त्राच्या विद्यार्थ्याच्या खोलीमध्ये आम्ही एकत्र जमत असू. पुढे तो लघुकथालेखक म्हणून प्रसिद्धीस आला. येलेओन्स्की ह्या टोपण नांवाने तो लिखाण करी. सुमारे पाच खंड लिहिल्यानंतर त्याने आत्महत्या केली. असे स्वतःच्या हातांनी आपले आयुष्य नष्ट करणारी खूप माणसे मला भेटली!

मीलोवस्की शांत स्वभावाचा होता. त्याचे विचार भित्रे होते आणि बोलण्यात तो सावध होता. एका गलिच्छ घराच्या तळघरात तो रहात असे. "शरीर आणि मन यांचा समतोल साधण्यासाठी" तो जुळाऱ्याचे काम करी. त्याचा सहवास नीरस असे. मिलचे पुस्तक मी अभ्यासले, पण त्यात मी रमू शकलो नाही. अर्थशास्त्राची मूलभूत तत्त्वे लौकरच मला अतिपरिचित भासू लागली. थेट अनुभवातून मी त्यांच्यावर प्रभुत्व मिळविले होते. माझ्या त्वचेवर त्यांची नोंद होती. स्वतः नव्हे तर "इतर लोक" आरामात आणि चैनीत रहावेत म्हणून श्रमणाऱ्या कुणाही व्यक्तीला अत्यंत स्पष्ट समजणाऱ्या गोष्टी, अत्यंत कठीण शब्दात मोठ-मोठ्या पुस्तकांमार्फत लिहिण्याची गरज नाही असे माझे मत बनले. तळघरातील त्या बिळात सलग दोन-तीन तास बसणे, जुळाऱ्याच्या सरसाचा घाण वास सहन करणे आणि घाणेरड्या भिंतींवरून सरपटणाऱ्या उवा पाहणे मला अत्यंत जड जाई.

एक दिवस आमचा अध्यापक नेहमीच्या वेळेस आला नाही. बहुधा तो येणारच नाही असे समजून आम्ही छोटासा मेजवानीचा बेत आखला. वोदकाची एक बाटली, थोडा पाव आणि काकड्या. पण अचानक त्याचे राखाडी पाय खिडकीपासून झपाट्याने गेलेले आम्ही पाहिले. तो आत येण्यापूर्वी मोठ्या मुष्कीलीने वोदकाची बाटली आम्ही टेबलाखाली लपविली. चेर्नीशेवस्कीचे पंडिती निष्कर्ष तो समजावून सांगत होता तेव्हा मूर्खांसारखे आम्ही ताठ बसून होतो. पायाचा चुकून धक्का लागून बाटली पडेल ह्या धास्तीने किंचितही हालचाल करीत नव्हतो. पण सरतेशेवटी आमच्या मास्तरनेच ती बाटली पाडली. बाटली गडगडल्याचा आवाज होताच त्याने एकदा टेबलाखाली नजर टाकली,

पण त्याबाबत तो चकार शब्द बोलला नाही. त्यापेक्षा त्याने आमची खरडपट्टी काढली असती तर फार फार बरे झाले असते!

त्याचे गप्प राहणे, त्याचा निर्विकार चेहरा, त्याच्या आकुंचित डोळ्यांमधील दुखरा भाव – ह्या सर्व गोष्टी पाहून मी कमालीचा अस्वस्थ झालो. माझ्या साथीदारांकडे मी चोरटा कटाक्ष टाकला. शरमेने त्यांचे चेहरे लालबुंद झाले होते. आमच्या शिक्षकासमोर आम्हाला अपराधी वाटत होते. आम्हाला खरोखरीच त्याच्याबद्दल वाईट वाटत होते. मात्र वोदका खरीदण्याची कल्पना माझी नव्हती.

त्या बैठकींना मी भयानक कंटाळलो होतो. तेथून बाहेर पडून तातार वस्त्यांमधून भटकण्याची इच्छा मला होत होती. त्या वस्त्यांमधून उमद्या, प्रेमळ स्वभावाची, स्वतःचे नितळ आयुष्य जगणारी माणसे रहात होती. ही माणसे गंमतीदार चुकीचे रशियन बोलत. संध्याकाळ झाली म्हणजे मुएझ्झिनांच्या बांगा उंच मीनारांवरून ऐकू येत. प्रार्थनेसाठी ते तातारांना बोलावीत. तातारांचे एकूण आयुष्य अगदी वेगळे असल्याचे मला भासे. मला माहीत असलेल्या, मला दुःखी करणाऱ्या आयुष्याहून त्यांचे आयुष्य अगदी अपरिचित होते.

मी वोल्गाकडेही खेचला जायचा. तेथील श्रमिकांच्या संगीताकडे. आजही त्या संगीताच्या आठवणीने माझा ऊर प्रसन्नतेने भरून येतो. श्रमिकांच्या शूर काव्याचा पहिल्यांदा मी आस्वाद घेतला त्या घटका अजूनही मला उत्तम आठवतात.

कझानच्या थोडचा खालच्या अंगास पर्शियाचा माल भरून घेऊन आलेला एक मोठा पडाव खडकावर आपटला होता. त्याच्या तळाची थोडी नुकसानी झाली होती. गोदीकामगारांचे एक पथक त्या पडावा-वरील माल उतरविण्यासाठी बोलाविण्यात आले होते. त्या कामगारां-बरोबर मीही गेलो होतो. ते सप्टेंबरचे दिवस होते. खालच्या दिशेने जोराचे वारे वहात होते. थंड चावरा पाऊस कोसळत होता. राखाडी नदीवर सर्वत्र लाटा उसळत होत्या आणि त्यांच्या कडांना वारा जोराने घासत होता. आमच्या पथकात सुमारे पन्नास माणसे होती. रिकाम्या पडावाच्या डेकवर ताडपत्र्यांखाली आणि पोत्यांखाली सारेजण अंग चोरून बसले होते. एक छोटी वाफेवर चालणारी बोट आमच्या पडावाला खालच्या अंगाला खेचून नेत होती. पावसामध्ये तिच्या चिमणीतून लाल ठिणग्या उसळत होत्या.

संध्याकाळ दाटली. काळवंडलेले ओले आकाश नदीवर ओठंगले. गोदीकामगार पावसाला, वाऱ्याला, आयुष्याला शिव्यांची लाखोली वाहात होते; कुरकुरत होते. सुस्तपणे ते डेकवरून सरपटत फिरत होते. थंडीपासून आणि ओलीपासून आसरा धुंडाळत होते. ही झोपाळलेली माणसे त्यांच्यापुढे वाढून ठेवलेले काम करण्यास अगदी नालायक होती अशी माझी खात्री झाली होती. बुडणारा माल वाचविणे त्यांना कधीही जमणार नव्हते.

मध्यरात्रीच्या सुमारास आम्ही उथळ पात्रात पोहोचलो. फुटलेल्या पडावापाशी वेगाने गेलो. पथकाचा पुढारी एक दुष्ट स्वभावाचा, तोंडावर देवीचे वण असलेला, अभद्र बोलणारा, घारीप्रमाणे डोळे व बाकदार नाक असलेला म्हातारा होता. आपल्या टकलावरील ओलीचिप्प टोपी खेचत तो किनऱ्या बायकी आवाजात किंचाळला:

"पोरांनो, प्रार्थना!"

सगळे गोदीकामगार डेकवर एकत्र जमले. त्या धूसर रात्रीत तो काळा जमाव उठून दिसत होता. अस्वले गुरगुरल्यासारखा आवाज ऐकू येऊ लागला. इतर सर्वांआधी पुढाऱ्याची प्रार्थना संपली. पुन्हा तो कर्कश्य आवाजात केकाटला:

"कंदील! पोरांनो, आता दाखवा तुमची करामत! बच्छड्यांनो, कसून काम करा! देवाचं नांव घ्या आणि सुरू करा!"

आणि ते मंद, सुस्त, पावसाने चिंब भिजलेले लोक आपली "करामत दाखवू लागले." जणू काही लढाईच्या मैदानात उडी घ्यावी तशा आरोळ्या ठोकीत, किंचाळत, थट्टा-मस्करी करीत त्यांनी त्या बुडत्या पडावावर उड्या टाकल्या. तांदळाची पोती आणि मनुक्याची, कातड्यांची व काराकुल लोकरीची गाठोडी भराभर हवेत भिरकावली जाऊ लागली. ती अवजड पोती हलक्या पिसांप्रमाणे गरगरत जाऊन पडत होती. माझ्या शेजारून जाडजूड आकृत्या धावत होत्या, एकमेकींना ओरडून साद घालीत होत्या, गलिच्छ शिव्या हासडत होत्या. शिट्ट्यांनी वातावरण दणाणून गेले होते. आयुष्याविषयी, पावसाविषयी आणि थंडी-वाऱ्याविषयी अवघ्या थोड्या वेळापूर्वी कुरकुरणारे ते दुर्मुखलेले, सुस्त लोक एवढ्या सहज आनंदाने आणि कसबाने काम करू शकतात, ह्यावर विश्वास ठेवणे मला कठीण जात होते. पाऊस अधिकच जोरात कोसळू लागला. त्याचा गारठा हाडांमध्ये शिरशिरी आणत

होता. वारा आमच्या सदऱ्यांना झोंबत होता. आमचे सदरे डोक्यांपर्यंत वर उडत होते आणि आमची पोटे उघडी पडत होती. सहा मंद कंदिलांच्या प्रकाशात, ओल्या अंधारामधून काळया आकृती धावपळ करीत होत्या. पडावांच्या डेकवर त्यांच्या पावलांचे बद्द आवाज उमटत होते. जणू काही कामासाठी ते भुकेले होते, चार-चार पूड वजनांची पोती ह्या हातावरून त्या हातावर भिरकावायला ते जणू आसुसले होते, आपल्या खांद्यांवरून गाठोडी पळवीत न्यायचा आनंद लुटायला हपापले होते, असे त्यांना काम करताना पाहून वाटत होते. लहान मुले आनंदाने खेळतात तसे ते उत्साहाने काम करीत होते. श्रमाच्या नशील्या उत्साहाने काम करीत होते. त्या आनंदाला तोडीस तोड म्हणजे केवळ स्त्रीची मधुर मिठीच ठरली असती!

पायघोळ कोटातील एक धिप्पाड, दाढीवाला, ओलाचिप्प माणूस— बहुधा पडावावरील मालाचा मालक अथवा एजंट असावा— अचानक बेंबीच्या देठापासून ओरडला:

"अरे मित्रांनो! एक बादली भरून देतो! अरे चांच्यानो, दोन बादल्या देतो! पण काम पुरं करा!"

अंधारातून चारी बाजूंनी त्याच्यावर आवाज कोसळले:

"तीन बादल्या!"

"कबूल! पण काम फत्ते करा!"

आणि नव्या जोमाने कामाची दंगल उसळली.

"कबूल! पण काम फत्ते फत्ते करा!"

आणि नव्या जोमाने कामाची दंगल उसळली.

मीसुद्धा पोती खेचत होतो, त्यांना फरफटत नेत होतो, भिरकावीत होतो, पळत जाऊन पुन्हा नवी पोती खेचत होतो. एखाद्या जंगली आणि तुफानी नाचात मी आणि माझ्याभोवतालचे सर्व काही गुंतले होते असे मला भासत होते; असे आनंदाने, अफाट काम करण्याचे सामर्थ्य, अशा अथकपणे, जीवाची पर्वा न करता महिनोन्महिने, वर्षानुवर्षे काम करण्याचे सामर्थ्य ह्या लोकांपाशी होते. जर त्यांनी घंटाबुरूजांना आणि मीनारांना हात घातला असता तर त्यांना हव्या त्या ठिकाणी अख्खे शहर खेचून नेण्याची अफाट ताकद त्यांच्या ठायी होती.

पूर्वी कधीही न अनुभवलेला आनंद मी त्या रात्री चाखला. अशा

श्रमाच्या पिसाट आनंदात सगळे आयुष्य सरले तर काय बहार होईल अशी इच्छा अंतःकरणात प्रज्वलित झाली. खाली लाटांचे नृत्य चालू होते. पाऊस अजूनही डेक धुवून काढीत होता. नदीवर वारा भणाणत होता. पहाटेच्या धूसर उजेडात त्या ओल्या, अर्धनग्न माणसांची धावपळ अजून चालूच होती. वेगाने आणि न दमता ते काम करीत होते, ओरडत होते, हसत होते. आपल्या श्रमाचे आणि ताकदीचे वैभव दाखवीत होते. सरतेशेवटी वाऱ्याने शिसवी मेघांचा पडदा टराटरा फाडला आणि गुलाबी सूर्यप्रकाशाचा झोत आकाशाच्या तेजस्वी निळ्या पट्टयावर पाझरला. त्या आनंदी जंगली लोकांनी आरोळ्या ठोकून, हसऱ्या चेहऱ्यांनी सूर्यकिरणांचे स्वागत केले. त्यांच्या केसांची आणि दाढीची लोकर भिजून चिप्प झाली होती. त्या दोन पायांच्या पशूंना, आपल्या कामात एवढ्या कसबी आणि हुशार असलेल्या लोकांना, आपल्या कामात पूर्ण बुडून जाणाऱ्या त्या लोकांना घट्ट मिठी मारावी असे मला वाटत होते.

ह्या आनंदी उधाणाच्या शक्तीपुढे दुसरे काहीही टिकू शकणार नाही असे मला वाटले. ही शक्ती पृथ्वीवर चमत्कार घडवू शकेल, एका रात्रीत सबंध भूमीला अद्भुत प्रासादांनी आणि शहरांनी मढवू शकेल. जादूच्या भविष्यकथा सांगतात त्याप्रमाणे! सूर्यकिरणाने क्षण दोन क्षण मानवाच्या श्रमावर कटाक्ष फेकला. पण मेघांच्या अफाट समुदायाशी स्पर्धा करण्यात तो थिटा पडला आणि एखादे लहान बालक सागरात गडप व्हावे तसा तो मेघांआड नाहीसा झाला. मुसळधार पावसाला आरंभ झाला.

"काम बंद करा!" कुणीतरी ओरडले. पण त्याला चिडून प्रतिप्रश्न आला :

"कोण म्हणतोय काम बंद करा?"

दुपारी दोनपर्यंत, शेवटचा माल हलवेपर्यंत, माणसे अखंड काम करीत होती. धुवांधार पावसात आणि चावऱ्या वाऱ्यात अर्धनग्न अवस्थेत श्रमत होती. आपले मानवी जग बलाढ्य शक्तीसंबंधात किती संपन्न आहे त्याची आदरयुक्त जाणीव मला त्यावेळी घडली.

काम संपल्यानंतर आम्ही आमच्या पडावावर चढलो आणि झिंग-लेल्या माणसांप्रमाणे ठार झोपी गेलो. कझानला पोहोचताच राखाडी, चिखलभरल्या पाण्यातून भराभरा वाळूच्या किनाऱ्यावर धावलो आणि

वोदकाच्या तीन बादल्या पिण्यासाठी सर्वांनी खाणावळीकडे मोर्चा वळविला.

चोर बाश्कीन तेथे माझ्यापाशी आला आणि मला संपूर्ण न्याहाळीत त्याने विचारले:

"काय केलं त्यांनी तुला?"

अत्यानंदाने मी त्याला कामाबद्दल सांगितले. त्याने ऐकून घेतले आणि नंतर उसासा टाकून तो तिरस्काराने म्हणाला:

"मूर्ख. मूर्खाहूनही वाईट. वेडपट!"

शीळेवर कसलातरी स्वर वाजवीत टेबलांच्या दाटीमधून तो हलकेच निघून गेला. एव्हाना त्या टेबलांवर गोदीकामगारांनी मजेत आरडाओरड करीत खायला-प्यायला सुरुवात केली होती. कोपऱ्यातून एक जण मध्य स्वरात एक अश्लील गाणे गाऊ लागला:

अहो, घडली गंमत मध्यरातीच्या वेळेला,<br>
अहो, अंधाऱ्या रातीच्या वेळेला!<br>
अहो, गेली बाई लपत छपत बागेला!<br>
अहो गेली फुलबागेला!

त्यावर सुमारे दहा-बारा आवाज कानठळ्या बसेपर्यंत गरजले. त्यांनी टेबलांवर आपल्या हातांनी ठेका धरला:

अहो, दिसलं काय दरवानाच्या नजरेला ऽऽ<br>
अहो, दिसलं झंगट दरवानाच्या डोळ्याला...

हास्याचे प्रचंड फवारे फुटले. शिट्ट्या वाजल्या. भिंती एवढ्या हादरल्या की त्याचे वर्णन करायला शब्द अपुरे ठरतील.

कुणीतरी माझी आंद्रेई देरेन्कोवशी ओळख करून दिली. एका अरुंद, कंगाल रस्त्याच्या टोकाला त्याचे स्वतःचे किराणा मालाचे छोटेसे दुकान होते. त्या दुकानाशेजारीच उकीरड्याने भरलेली एक घळ होती.

छोट्या चणीच्या देरेन्कोवचा एक हात लुळा होता. त्याचा सुरेख दाढीदार चेहरा प्रेमळ होता आणि डोळ्यात बुद्धिमानतेची झाक होती. कझानमधील दुर्मीळ आणि बेकायदेशीर साहित्याचा सर्वोत्तम ग्रंथ-संग्रह

त्याच्यापाशी होता. शहरातील असंख्य शैक्षणिक संस्थांमधील विद्यार्थी आणि इतर विविध क्रांतिकारक प्रवृत्तीचे लोक त्याच्या ग्रंथालयाचा लाभ घेत.

एका स्कोपेत्स* सावकाराच्या मालकीच्या घराच्या खोलगट ओसरीत ते किराणा मालाचे दुकान होते. दुकानातून एका दरवाजाने एका मोठ्या खोलीत जाता येत असे. अंगणाकडील दिशेला असणाऱ्या खिडकीतून त्या खोलीत तुरळक प्रकाश पडायचा. त्या खोलीतून दाटीच्या स्वयंपाकघराकडे जायला वाट होती. त्या स्वयंपाकघराच्या पलिकडे ओसरी आणि घराच्या दरम्यान अंधाऱ्या बोळकंडीत कोठीची एक छोटी खोली होती. त्या कोठीच्या खोलीत ते अनीतीमान ग्रंथालय होते. काही पुस्तकांच्या हस्तलिखित स्वरूपातील जाडजूड वह्या होत्या. लावरोव यांचे 'ऐतिहासिक पत्रे', चेर्नीशेवस्कींचे 'काय केले पाहिजे?', पीसारेव यांचे अनेक लेख, 'भूकराजा' आणि 'चतुर यंत्रशास्त्र' वगैरे पुस्तके अशा हस्तलिखित स्वरूपात होती. ह्या सर्व हस्तलिखित प्रती चुरगळलेल्या, जीर्ण होत्या. अगदी चिंध्या होईपर्यंत त्यांची पारायणे घडली होती.

पहिल्या वेळी मी जेव्हा दुकानात गेलो तेव्हा देरेन्कोव गिऱ्हाईकांबरोबर गुंतला होता. त्याने मानेनेच आतील दाराकडे जाण्याचा इशारा केला. मी त्या मोठ्या निम-अंधाऱ्या खोलीत प्रवेश केला तेव्हा पुतळ्यांच्या कोनाड्यात एक छोटा म्हातारा माणूस गुडघे टेकून मनोभावे प्रार्थना करीत असलेला मला दिसला. सेराफिम सारोवस्की याच्या चित्राशी त्या म्हाताऱ्याचे साम्य होते असे मला आढळले. त्याला तशा स्थितीत पहात असताना काहीतरी चूक घडत असल्याची मला भावना झाली. ती विरोधाची भावना होती.

देरेन्कोव "नरोद्निक" होता असे मला सांगण्यात आले होते. माझ्या समजुतीनुसार नरोद्निक हा क्रांतिकारक होता. आणि क्रांतिकारकाने देवावर विश्वास ठेवू नये. त्या घरात तो श्रद्धाळू म्हातारा मला अगदी विसंगत वाटत होता.

प्रार्थना संपविल्यानंतर त्याने आपले शुभ्र केस व शुभ्र दाढी यांवर हात फिरवून सारखे केले. माझ्याकडे रोखून पहात तो म्हणाला:

---

*स्कोपेत्स – खच्चीकरण अंमलात आणणारा स्कोपत्सी धर्मपंथाचा अनुयायी. – अनु.

"मी आंद्रेईचा बाप. तू कोण असावास बरं?.. ओहो, असं आहे तर! मला वाटलं तू वेषांतर करून आलेला विद्यार्थी आहेस!"

"विद्यार्थ्यानं वेषांतर करून कशाला फिरायचं?" मी विचारले.

"तसं करतात खरं!" म्हातारा शांतपणे उत्तरला. "सरतेशेवटी तुम्ही कितीही सोंग आणलं तरी देवाला खरं ते समजणारच!"

तो म्हातारा स्वयंपाकघरात अदृश्य झाला. मी खिडकीशी बसलो आणि लौकरच विचारांमध्ये पूर्ण गढून गेलो. मग अचानक कुणाचेतरी उद्गार मी ऐकले:

"तर असा आहे होय तो!"

संपूर्ण पांढरा पोषाख केलेली एक मुलगी स्वयंपाकघराच्या दाराच्या चौकटीला टेकून उभी होती. तिचे सुरेख केस आखूड कापलेले होते. तिचा वाटोळा चेहरा फिका होता. तिच्या गडद निळया डोळ्यांमध्ये स्मित चमकत होते. स्वस्तात विकल्या जाणाऱ्या चित्रांमधील एखाद्या देवदूतासारखी ती भासत होती.

"एवढा घाबरलास कशाला? मी एवढी भयानक आहे दिसायला?" तिने विचारले. तिचा आवाज पातळ आणि कापरा होता. सावकाशपणे, सावधपणे, भिंतीशी लगटून ती माझ्या दिशेने पुढे सरकली. जणू काही तिच्या पायाखालील जमीन म्हणजे अधांतरी टांगलेला दोर आहे अशा थाटात ती एकेक पाऊल तोलून मापून टाकीत होती. आणि तिच्या ह्या चालण्याच्या असमर्थतेमुळे तिच्या अलौकिकत्वाविषयीची भावना अधिकच वाढत होती. जणू तिच्या पायांच्या तळव्यांमध्ये सुया खुपसल्या जात असाव्यात अशा तऱ्हेने तिच्या सबंध शरीराचा थरकाप होत होता. जणू ती भिंत तिच्या गुबगुबीत, बालिश हातांना डंख मारीत होती असे वाटत होते. तिच्या हाताची बोटे मात्र आश्चर्यकारकरीत्या ताठर होती.

मी मूकस्तंभासारखा कमालीचा शरमून आणि मनोमनी तिची कीव करीत उभा होतो. त्या अर्धवट उजेडाच्या खोलीत प्रत्येक गोष्टच चमत्कारिक होती.

ती मुलगी खुर्चीवर सावधपणे बसली. जणू ती खूर्ची अचानक उडून जाईल अशी धास्ती त्या मुलीच्या चेहऱ्यावर होती. सहसा जे कुणी सांगत नाही ते सरळपणे तिने मला सांगितले की, जवळ जवळ तीन महिने अंथरूणाला खिळून काढल्यानंतर आणि आपल्या अवयवांचा

वापर करण्याची क्षमता गमावल्यानंतर, गेल्या अवघ्या चार-पाच दिवसांपूर्वीच ती थोडी-फार हिंडू-फिरू लागली होती.

"हा काहीसा मानसिक आजार आहे," स्मित करीत ती म्हणाली.

मला आठवते की, तिच्या त्या अवस्थेचा दुसऱ्या एखाद्या पद्धतीने खुलासा करता आला असता तर अधिक बरे झाले असते. मानसिक आजार हा अशा मुलीच्या दृष्टीने फारच गद्य होता! आणि तशा त्या विचित्र खोलीत! त्या ठिकाणी प्रत्येक गोष्ट घाबरून भिंतीशी मागे चिकटत आहे असे वाटत होते. कोपऱ्यातील पुतळीसमोरचा दिवा खूपच तेजस्वीपणे पेटत होता. दिव्याच्या तांब्याच्या साखळयांच्या सावल्या जेवणाच्या मोठ्या टेबलावरील पांढऱ्या कपड्यावर काहीही कारण नसताना हेलकावत होत्या.

"मी तुझ्याविषयी खूप ऐकलंय आणि तू कसा आहेस ते मला पहायची इच्छा होती," बालिश पातळ आवाज बोलत होता.

त्या मुलीच्या नजरेखाली मला कसेसेच वाटू लागले. ती अस्वस्थता सहन करणे अशक्य ठरले. तिच्या डोळयांच्या गडद निळाईपलिकडे असे काही होते, जे मला संपूर्ण पारदर्शी बनवून पाहू शकत होते. अशा मुलीशी मी बोलू शकत नव्हतो. कसे बोलायचे ते मला ठाऊक नव्हते. हेर्त्सेन, डार्विन, गॅरीबाल्डी इत्यादींची भिंतीवरील चित्रे पहात मी गप्प उभा राहिलो.

तागाच्या रंगाचे केस असलेला आणि उर्मट डोळयांचा माझ्याच वयाचा एक मुलगा दुकानातून झपाट्याने आत आला व आमच्यासमोरून स्वयंपाकघराकडे तेवढ्याच वेगाने जाता जाता फुटलेल्या आवाजात म्हणाला :

"मारीया, इथं खाली काय करतेस तू?"

"हा माझा सर्वांत धाकटा भाऊ अलेक्सेई," त्या मुलीने मला सांगितले. "मी सुईणकाम शिकत होते. पण आजारी पडले. तू काहीच बोलत का नाहीस? लाजाळू आहेस का?"

आंद्रेई देरेन्कोव आत आला. आपला लुळा हात त्याने जाकीटाच्या खिशात कोंबला होता. आपल्या बहिणीच्या रेशमी केसांना हलकेच कुरवाळीत त्याने माझ्या कामासंबंधी प्रश्न विचारायला सुरुवात केली.

तेवढ्यात एक सडपातळ बांध्याची मुलगी तेथे आली. तिचे केस लाल कुरळे होते आणि डोळे घारे होते. माझ्याकडे तिने तिखट नजरेने

पाहिले. पांढऱ्या कपडयांमधील मुलीच्या दंडाला तिने धरले व तिला तेथून घेऊन जात ती म्हणाली :

"एवढं पुरं झाले मारीया!"

ते नांव शोभत नव्हते. फारच ओबडधोबड वाटले.

मीसुद्धा तेथून निघालो. एक अनोळखी उत्तेजक भावना मनात निर्माण झाली होती. दोन दिवसांनंतर संध्याकाळच्या वेळी मी परत त्या खोलीत आलो. ही माणसे कशा प्रकारे जगत होती, तशा जगण्याचा अर्थ काय होता, हे जाणून घेण्यास मी उत्सुक होतो. सारेच काही विचित्र होते.

गरीब, प्रेमळ म्हातारा स्तेपान इवानोविच खोलीच्या कोपऱ्यात बसला होता. त्याचे केस पांढरेशुभ्र होते आणि पारदर्शी दिसावी एवढी त्यांची कांती फिकट होती. मंद स्मित त्याच्या चेहऱ्यावर झळकत होते आणि त्याचे काळसर ओठ हलत होते जणू ते विनवणी करीत होते :

"मला राहू द्या!"

सतत भीतीने त्याला पछाडले होते. आगामी संकटाच्या चाहुलीने तो अस्वस्थ होता. त्याची ती धास्ती मला स्पष्ट दिसत होती.

एक हात सुकलेला आंद्रेई खोलीमध्ये अपराधी भावनेने चकरा मारीत होता. पीठ आणि तेल यांच्यामुळे त्याचे जाकीट छातीशी लाकडी फळीप्रमाणे कडक बनले होते. एखादी निष्पाप खोडी केल्यानंतर नुकतीच माफी मिळालेल्या लहान मुलाच्या चेहऱ्यावर असते तसे अपराधी स्मित त्याच्या चेहऱ्यावर उमटले होते. दुकानात त्याला अलेक्सेई मदत करायचा. हा आडदांड, आळशी मुलगा होता. तिसरा भाऊ, इवान, अध्यापनशास्त्र संस्थेत शिकत होता आणि तिथेच वसतीगृहात रहात होता. फक्त सणा-सुदीला तो घरी येई. इवान हा नीटनेटका पोषाख करीत असे, केस व्यवस्थित विंचरीत असे. त्याला पाहिले म्हणजे एखाद्या म्हाताऱ्या सरकारी कारकुनाची आठवण व्हायची. आजारी बहीण मारीया पोटमाळ्यावर कोठेतरी रहात होती. जिना उतरून खाली येण्याचे धाडस ती क्वचितच करीत असे. जेव्हा ती खाली यायची तेव्हा मला नेहमी अवघडल्यासारखे व्हायचे. जणू अदृश्य बंधनांनी जखडून गेल्यासारखे वाटायचे.

देरेन्कोव कुटुंबाचा कारभार एक उंच, हडकुळी बाई चालवीत असे. लाकडी बाहुलीसारखा तिचा चेहरा होता आणि कडवट स्वभावाच्या

जोगिणीसारखे तिचे डोळे कठोर होते. त्यांच्या स्कोपेत्स मालकाबरोबर ती रहायची. तिची मुलगी — लाल केसांची आणि धारदार नाकाची नास्त्या — तिला कामात मदत करायची. कुणाही पुरुषावर नास्त्याचे हिरवे डोळे वळले म्हणजे तिच्या नाकपुड्या थरथरू लागत.

पण देरेन्कोव कुटुंबाचे खरे मालक होते विद्यार्थी! विद्यापीठामधील, धर्म प्रबोधिनीमधील, पशुआरोग्य संस्थेतील विद्यार्थी. रशियन लोकांच्या काळजीने तळमळणाऱ्या, रशियाच्या भवितव्याविषयी अस्वस्थ बनलेल्या तरुणांचा एक मोठा घोळका तेथे गजबजत असायचा. दैनिकांमध्ये प्रसिद्ध झालेल्या लेखांमुळे उत्तेजित झालेले, नुकत्याच वाचलेल्या पुस्तकांवरून काही निष्कर्ष काढलेले, शहरातील आणि विद्यापीठातील घडामोडींनी अस्वस्थ बनलेले ते तरुण विद्यार्थी सायंकाळच्या वेळी देरेन्कोवच्या दुकानाकडे घाईघाईने येत. कझानच्या सर्व भागांमधून आलेले विद्यार्थी तेथे एकत्र होत. एखादा कडाक्याचा वादविवाद रंगत असे अथवा खोलीच्या कोपऱ्यांमध्ये बसून कुजबुजत्या स्वरांमध्ये ते चर्चा करीत. आपल्या सांगाती ते जाडी जाडी पुस्तके आणत व उत्तेजित बोटे त्या पुस्तकांच्या पानांमध्ये खुपसून एकमेकांवर ओरडत. आपल्याला सर्वांत खरी सत्ये कोणती वाटतात ती सिद्ध करण्याचा प्रयत्न प्रत्येकजण करायचा.

अर्थात त्या वादविवादामधील फारच थोड्या गोष्टी मला समजत. गरीबाच्या पाणचट पेजेत चरबीचे दुर्मीळ तुकडे जसे नाहीसे होतात, त्याप्रमाणे शब्दांच्या धबधब्यात चर्चित सत्ये मी हरवून जायचा. काही विद्यार्थी मला वोल्गा नदीवरील धर्म संप्रदायांच्या पांढऱ्या दाढीवाल्या पोथीनिष्ठांची आठवण करून देत. पण एक गोष्ट मला येथे जाणवली होती की, आमचे आयुष्य बदलून टाकणे, आयुष्यात बदल घडवून त्यात सुधारणा करणे हे ह्या लोकांचे ध्येय होते. शब्दांच्या प्रचंड ओघा-मध्ये त्यांचा प्रामाणिकपणा जरी घुसमटत असला, त्याची धांदल होत असली, तरी त्या प्रपातात तो बुडून जात नव्हता. कोणत्या समस्या ते सोडवू पहात होते ते मला स्पष्ट समजत होते. त्या समस्यांच्या यशस्वी सोडवणुकीत मला स्वतःला खूप स्वारस्य होते, आस्था होती. अनेकदा मला जाणवायचे की, त्या विद्यार्थ्यांच्या बोलण्याद्वारे माझ्या मनामधील वेड्याबागड्या विचारांचा उच्चार घडत होता. एखादा बंदिवान जसा त्याला स्वातंत्र्याचे आश्वासन देणाऱ्यांना वंद्य मानतो त्याप्रमाणे ह्या लोकांना मी पूजनीय मानीत होतो.

याउलट, एखाद्या लाकडाच्या तुकड्याकडे सुताराने पहावे आणि त्या लाकडातून अगदीच काही सामान्य वस्तू निर्माण होणार नाही असे त्याला वाटावे, तशा दृष्टिकोनातून ते माझ्याकडे पहात.

"तद्देशीय गुणी बाळ", एक विद्यार्थी दुसऱ्या विद्यार्थ्याला माझी ओळख करून देई. गटारात सापडलेले तांब्याचे नाणे रस्त्यावरील पोर आपल्या मित्रांना ज्या अभिमानाने दाखविते त्या भावनेने मला दाखविले जाई. "तद्देशीय गुणी बाळ," "जनता-पुत्र" अशी लावलेली विशेषणे मला मुळीच आवडत नव्हती. मी जीवनाचा सावत्र मुलगा होतो असे मला वाटायचे. ह्या नव्या शक्ती माझ्या मनाच्या विकासाला ज्या लहरीपणाने वळण द्यायच्या, त्या पद्धतीने काही वेळा माझा विलक्षण कोंडमारा होई. एक दिवस पुस्तकाच्या दुकानात माझ्या दृष्टीला एक पुस्तक पडले: 'वाक्प्रचार आणि म्हणी.' त्या शब्दांचा अर्थ जरी मला माहीत नव्हता तरी ते पुस्तक वाचायची एकदम तीव्र इच्छा झाली. धर्म प्रबोधिनीच्या एका विद्यार्थ्यापाशी मी ते पुस्तक वाचायला मागितले.

"पुढं काय?" त्या भावी धर्मगुरूने उपहासाने मला प्रश्न टाकला. त्या तरुणाचे डोके एखाद्या नीग्रोप्रमाणे होते. आखूड कुरळे केस, जाड ओठ आणि चकाकणारे शुभ्र दात. "बंधू, मूर्खपणा करू नको. तुला जे वाचायला सांगितलं आहे तेच वाच. नको त्या ठिकाणी नाक खुपसू नको!"

माझ्या शिक्षकाचे उद्धट बोलणे मला तात्काळ झोंबले. मी ते पुस्तक विकत घेतले. अर्थात काही पैसे मी धक्क्यावर काम करून मिळविलेले होते आणि बाकीचे पैसे आंद्रेई देरेन्कोवकडून उसने घेतले. ते पुस्तक अजूनही माझ्यापाशी आहे. मी खरेदी केलेले पहिलेवहिले गंभीर पुस्तक.

एकूण मला तेथे वागणूक फार कडक मिळे. 'समाजशास्त्रांचा ओनामा' हे पुस्तक मी वाचले तेव्हा संस्कृतीसंवर्धनात धर्मगुरू मंडळींचे स्तोम लेखकाने गरजेपेक्षा जास्त माजविले आहे असे मला वाटले. तसेच भटक्या शिकाऱ्यांच्या कामगिरीला निष्कारण कमी लेखले होते अशी माझी धारणा झाली. एका भाषाशास्त्राच्या विद्यार्थ्यापाशी मी माझ्या ह्या भावना व्यक्त केल्या. त्यानंतर तब्बल तासभर त्याने मला "टीका करण्याच्या हक्कावर" व्याख्यान झोडले. आपला बायकी चेहरा कठोर राखण्याचा आणि नापसंती व्यक्त करण्याचा सबंध तासभर तो विद्यार्थी आटोकाट प्रयत्न करीत होता.

"टीका करण्याचा हक्क बजाविण्याआधी माणसानं एका ठाम सत्यावर विश्वास ठेवला पाहिजे. कोणत्या सत्यावर तुझा विश्वास आहे?" त्याने पृच्छा केली.

हा विद्यार्थी नेहमी वाचन करीत असे. अगदी रस्त्यातसुद्धा. फूट-पाथवरून चालत जाताना त्याचा पुस्तकात खुपसलेला चेहरा मी अनेकदा पाहिला होता. त्याच्या वाटेत आडव्या येणाऱ्यांना धक्का मारून तो पुढे जायचा. कातरमाळ्यावरील त्याच्या खोलीत विषमज्वराने तळमळत असताना वातामध्ये तो ओरडला होता:

"स्वातंत्र्य आणि सक्ती यांच्या मूलतत्त्वांचा नीतीमत्तेत सुसंवादी संयोग घडला पाहिजे! सुसंवादी! सु... सु... संवा..."

अत्यंत दयाळू अंत:करणाच्या ह्या माणसाची सतत पद्धतशीर उपास-मार घडत होती. चिरंतन सत्याचा शोध घेण्याच्या नादात त्याला पुस्तकांविना जीवनातील इतर सुखे ठाऊक नव्हती. दोन प्रभावी मनां-मधील विरोध आपण मिटविले आहेत असे त्याला जेव्हा जेव्हा वाटे तेव्हा तेव्हा त्याच्या मृदु, काळया डोळयांमध्ये बालिश स्मिताची चमक उजळत असे. कझानमध्ये आमची ओळख घडल्यानंतर सुमारे दहा वर्षांनी त्याच्याशी खार्कोवमध्ये माझी पुन्हा गाठ पडली. केममध्ये पाच वर्षे हद्दपारीची शिक्षा भोगून तो तेथे विद्यापीठीय अभ्यास पूर्ण करीत होता. परस्परविरोधी विचारांचे मोहोळ उठलेल्या मुंग्यांच्या वारूळात राहणारा तो इसम आहे असे मला वाटले. क्षयाने तो फार आजारी होता, रक्त थुंकीत होता आणि त्याही अवस्थेत नीत्शे व मार्क्स यांचा समेट घडवू पहात होता. आपल्या चिकचिकीत पंजामध्ये माझे हात पकडून तो घरघरत्या आवाजात म्हणाला:

"संयोगाविना जीवन – अशक्य!"

विद्यापीठाकडे जात असताना वाटेत ट्राममध्येच तो मेला.

तर्काच्या ध्येयासाठी हुतात्मा झालेले असे अनेक लोक मला भेटले. त्यांची स्मृती मला पवित्र वाटते.

अशा प्रकारचे सुमारे वीस-एक लोक देरेन्कोवच्या घरी जमत. त्यांच्यात एक जपानीही होता. धर्म प्रबोधिनीचा विद्यार्थी पान्तेलेईमोन सातो. ह्या बैठकींमध्ये अनेकदा माझ्या दृष्टीला एक धिप्पाड, रुंद छातीचा माणूस दिसे. त्याचे डोके तातार पद्धतीने भादरलेले होते आणि त्याला लांब, भरघोस दाढी होती. त्याच्या लांब करड्या कोटात त्याला

घट्ट शिवून टाकले आहे असे वाटायचे. अगदी हनुवटीपर्यंत तो नेहमी कोटाची बटणे लावायचा. सर्वसाधारणपणे एखाद्या कोपऱ्यात एकटेच बसून आपला छोट्या दांड्याचा पाईप तो फुंकत असे. खोलीतील लोकांवर आपले राखाडी डोळे फिरवीत शांतपणे विचार करीत तो बसायचा. त्याची बारीक, लक्षपूर्वक नजर अनेकदा माझ्या चेहऱ्यावर रेंगाळत रहायची. त्या माणसाच्या गंभीर विचारांमध्ये मला मापले जात आहे असे मला वाटायचे. का कुणास ठाऊक, पण मला त्याची भीती वाटायची. त्याचे गप्प राहणे मला बुचकळ्यात टाकत होते. बाकी प्रत्येकजण मोठ्यांदा, भरपूर आणि ठामपणे बोलत असे. अर्थात बोलणे जेवढे अधिक जोरदार, तेवढे ते मला जास्त आवडायचे. पण आवेशपूर्ण शब्द हे अनेकदा माणसाच्या हीन आणि ढोंगी विचारांवर पांघरूण घालीत असतात, ही जाणीव यायला मला पुढे बराच अवधी लागला. त्या दाढीधारी राक्षसाच्या मुग्धतेमागे काय लपले होते?

त्याला ते "खखोल" म्हणून हाक मारीत. मला वाटते, आंद्रेई सोडून इतर कुणालाही त्याचे खरे नांव माहीत नव्हते. लौकरच मला समजले की हा माणूस नुकताच याकुत्स्क प्रदेशामधून परतला होता. तेथे त्याने दहा वर्षे हद्दपारीची शिक्षा भोगली होती. ह्या माहितीमुळे त्याच्याविषयीचे माझे कुतूहल वाढले. पण त्याची ओळख करून घेण्याचा मला धीर झाला नाही. असे असले तरी माझ्या अंगी लाजाळूपणा अथवा भित्रेपणा नव्हता. उलट अत्यंत अधीर, अस्वस्थ कुतूहलाची मला बाधा झालेली होती. सर्व काही लौकरात लौकर माहीत करून घ्यावेसे वाटत होते. ह्या स्वभावापायी आयुष्यात एका वेळी एकाच गोष्टीचा गंभीरपणे अभ्यास करणे मला शक्य झाले नाही.

लोकांविषयी जेव्हा ते बोलत तेव्हा माझ्या स्वतःच्या निष्कर्षांविषयी आश्चर्य करीत अविश्वासाच्या भावनेने मी ऐकायचा. त्यांच्याप्रमाणे त्या विषयावर मी विचार करू शकत नव्हतो. त्यांच्या दृष्टीने लोक म्हणजे शहाणपणाचे, दयाळूपणाचे आणि आत्मिक सौंदर्याचे मूर्त रूप होते. हे मूर्त रूप देवासदृश होते. त्याचे उगमस्थान उदात्त होते, उत्तुंग होते. मला लोक असे दिसत नव्हते. माझ्या भोवती मला सुतार, गोदीकामगार, गवंडी दिसत. मला याकोव, ओसिप, ग्रिगोरी माहीत होते. पण येथे एकूण लोकांविषयी चर्चा चालायची. येथील वक्ते स्वतःला लोकांपेक्षा कमी पातळीवर समजायचे. ते लोकांच्या इच्छेवर अवलंबून होते असे

मानायचे. पण मला मात्र वाटायचे की, बुद्धीचे सारे सौंदर्य, तिची सारी शक्ती, ह्या वक्त्यांमध्ये एकवटली होती. त्यांच्या अंत:करणांमध्ये जगण्याची, मानवतेसाठी प्रेमाच्या नव्या नियमांनुसार मुक्तपणे नवे आयुष्य उभारण्याची प्रेमळ आणि हितकारक ज्योत प्रज्वलित झाली होती.

आजपर्यंत ज्या क्षुद्र लोकांमध्ये मी राहिलो होतो त्यांच्यात ही प्रेमभावना मला कधीच दिसली नव्हती. येथे मात्र ते प्रेम प्रत्येक शब्दामधून ध्वनित होत होते, प्रत्येक दृष्टिक्षेपामधून व्यक्त होत होते.

ह्या लोकपूजाप्रेमी माणसांचे बोलणे माझ्या काळजावर आल्हादक पावसाचा शिडकावा करी. ग्रामीण उदास जीवनाविषयीच्या, शेतकऱ्यांच्या हौतात्म्याविषयीच्या भाबड्या साहित्याची मला खूप मदत झाली. मला वाटू लागले की, मानवजातीविषयीच्या जोरदार, आवेगपूर्ण प्रेमामधूनच जीवनाचा खरा अर्थ शोधून त्याचे आकलन करण्याची शक्ती प्राप्त होऊ शकेल. मी स्वत:विषयी विचार करण्याचे थांबविले आणि दुसऱ्यांकडे जास्त लक्ष देऊ लागलो.

आंद्रेई देरेन्कोवने विश्वासात घेऊन मला सांगितले की, त्याच्या दुकानामधून जे काही छोटेसे उत्पन्न येत होते ते संपूर्णपणे "लोकांचे सुख सर्वोच्च मानणाऱ्या" ह्या गटाच्या साहाय्यार्थ खर्च करण्यात येत होते. आणि त्यांच्यामध्ये वावरताना तो स्वत: एखाद्या धर्माधिकाऱ्याने भाविकपणे पूजेची व्यवस्था पहावी तसा वागायचा. त्या शिकल्यासवरल्या लोकांच्या विद्वत्तेविषयीचे आपले कौतुक तो मुळीच लपवीत नसे. आपला लुळा हात कोटाच्या खिशात कोंबून, आनंदी स्मित करीत आणि आपल्या रेशमी दाढीला झटके देत तो मला विचारी :

"छान आहे की नाही? आता छान वाटतंय ना?"

पशुवैद्य लावरोवचा बदकांच्या ओरडण्यासारखा चमत्कारिक आवाज होता. त्या विचित्र आवाजात जेव्हा तो नरोदनिकांविरुद्ध पाखंडी वादंग सुरू करी, तेव्हा देरेन्कोवची नजर खाली वळे आणि धास्तावल्या आवाजात तो पुटपुटे :

"नेहमी संकट निर्माण करतो हा!"

देरेन्कोवचे नरोदनिकांविषयीचे मत जवळ जवळ माझ्यासारखेच होते. पण विद्यार्थी मात्र त्याच्याशी उद्धटपणे वागत, त्याची किंमत ठेवीत नसत. उमराव जसे नोकराशी, खानावळीतील पोऱ्याशी वागतात तसे विद्यार्थी देरेन्कोवशी वागत. मात्र खुद्द देरेन्कोवला ह्याची जाणीव

नव्हती. जमलेली माणसे निघून गेल्यानंतर अनेकदा तो मला रात्रीच्या मुक्कामाला थांबवून घेई. आम्ही खोलीतील सामान जागच्या जागी व्यवस्थित ठेवत असू आणि मग तक्तपोशीवर एखादी नमदी चटई पसरून तिच्यावर पहुडत असू. रात्री खूप उशीरापर्यंत गप्पा मारत असू. खोलीत खूप अंधार असे. कोपऱ्यातील पुतळीसमोरील दिव्याचा फारसा उजेड पडत नसे. खऱ्याखुऱ्या श्रद्धेच्या विश्रब्ध आनंदाच्या भावनेने तो मला म्हणायचा :

"योग्य काळात आपल्याकडं अशी शेकड्यांनी, हजारांनी भली माणसं निर्माण होतील. सबंध रशियाभर महत्त्वाच्या जागांवर ती काम करू लागतील आणि अगदी वेगानं आपलं सारं आयुष्य बदलून टाकतील."

माझ्यापेक्षा सुमारे दहा वर्षांनी तो मोठा होता. लालकेशा नास्त्याकडे तो कमालीचा आकर्षित झाला होता हे मला स्पष्ट समजत होते. तिच्या थट्टेखोर नजरेला नजर देण्याचे तो टाळत असे व इतरांच्या उपस्थितीत मालकाने नोकराशी वागावे त्याप्रमाणे शुष्क, अधिकारवाणीत बोलण्याचा प्रयत्न करीत असे. पण तिची तो आतुरतेने वाट पहायचा. तिच्याबरोबर एकटा असताना भित्रे आणि अपराधी स्मित चेहऱ्यावर ठेवून बोलायचा, घाबरून स्वतःची दाढी धरून ठेवायचा.

त्याची धाकटी बहीणही खोलीच्या एखाद्या कोपऱ्यात बसून शाब्दिक लढाया पहायची. सारे लक्ष एकवटून ऐकताना तिचे डोळे विस्फारलेले असत आणि तिच्या बालिश चेहऱ्याचा मजेदार चंबू झालेला असे. नेहमीपेक्षा जास्त तिखट शब्दांची फेकाफेक झाली तर अचानक बर्फाळ पाण्याचा सपकारा बसताच दचकावे तशी ती झटकन मोठ्यांदा श्वास घ्यायची. एक तांबूस-पिवळ्या केसांचा वैद्यकशास्त्राचा विद्यार्थी होता. ती ज्या कोपऱ्यात बसायची तेथे एखाद्या तरण्याबांड कोंबड्याप्रमाणे मागे-पुढे येरझाऱ्या घालायला त्याला आवडायचे. जेव्हा तिच्याशी तो बोलायचा तेव्हा उगीचच गूढ, अस्पष्ट खालच्या आवाजात बोलायचा आणि आपल्या भुवयांची आकर्षक जुळवण करायचा. ते सारे खूपच गंमतीदार वाटायचे.

शरदाचा मोसम जवळ आला आणि स्थिर नोकरीविना जगणे अशक्य ठरले. माझ्या नव्या छंदांमध्ये वाहवत गेल्यामुळे माझी कमाई कमी कमी होत गेली आणि माझ्या रोजच्या भाकरीसाठी जास्त जास्त प्रमाणात मी दुसऱ्यांवर अवलंबून राहू लागलो. आणि दुसऱ्याची भाकरी

गिळायला नेहमीच जड जाते. हिवाळ्यासाठी "निवारा" शोधायची वेळ झाली होती. तसा निवारा मला वासिली सेम्योनोवच्या कडक कडबोळी बिस्कीटे बनविण्याच्या बेकरीत मिळाला.

'मालक', 'कोनोवालोव', 'सव्वीस आणि एक' ह्या कथांमधून ह्या काळातील माझ्या जीवनाची रूपरेषा मी मांडली आहे. अत्यंत वाईट काळ होता! पण त्यात खूप काही शिकलो.

शारीरिकदृष्टचा हा काळ तर वाईट होताच, पण मानसिकदृष्टचा त्याहूनही वाईट होता.

तळघरातील बेकरीत जेव्हा मी गेलो तेव्हा माझ्यात आणि ज्यांचा सहवास व ज्यांचे मार्गदर्शन मला अत्यावश्यक ठरले त्या लोकांमध्ये एक "विस्मृतीची भिंत" उभी झाली. त्यांच्यापैकी कुणीही कधीही मला भेटायला बेकरीत आला नाही. दररोज चौदा तास काम करावे लागत असल्यामुळे आठवडचातील कामाच्या दिवशी देरेन्कोवच्या घरी जाणे मला शक्य नव्हते. आणि सुटीच्या दिवशी एक तर मी झोपायचा किंवा बेकरीमधील माझ्या सहकाऱ्यांबरोबर वेळ घालवायचा. लौकरच त्यांच्या-पैकी काहीजण मला गंमत्या विदूषक समजू लागले. तर अद्भुत कथा सांगणाऱ्याविषयी मुलांना जे भाबडे प्रेम वाटते तसे प्रेम इतरांना माझ्या-बद्दल वाटू लागले. ह्या लोकांना खरे मी काय सांगत होतो कुणास ठाऊक! पण अस्तित्वात होते त्याहून दुसरे, कमी कष्टाचे आयुष्य शक्य होते, ज्या आयुष्याला अर्थ आणि हेतू आहे असे आयुष्य शक्य होते, अशी आशा मात्र मी त्यांच्या मनांमध्ये निर्माण करण्याचा प्रयत्न केला. काहीवेळा मी यशस्वी व्हायचा. त्यांच्या सुजवट चेहऱ्यांवर मानवी दु:खाची चमक उमटलेली पाहिली, त्यांच्या डोळ्यात संतापाची आणि तिरस्काराची ठिणगी फुललेली पाहिली, म्हणजे माझा अभिमानाने आणि आनंदाने ऊर दाटून यायचा. मी "लोकांमध्ये काम करीत होतो," त्यांचे "प्रबोधन" घडवीत होतो, ही भावना सुखद वाटायची.

मात्र अनेकदा मी नपुंसक आहे अशी भावना व्हायची, तसे वाटणे स्वाभाविक होते. आपले ज्ञान तोकडे असल्याची जाणीव व्हायची. जीवनाने, आमच्या सभोवतालच्या वातावरणाने निर्माण केलेल्या अत्यंत प्राथमिक प्रश्नांना उत्तर देणेही अशक्य ठरायचे. अशा वेळी एखाद्या काळोख्या खड्डचात मी पडलो आहे असे वाटायचे. ज्या अंधाऱ्या गर्तेत माणसे आंधळ्या किडचांप्रमाणे चाचपडत फिरत असतात, जेथे वास्तवाचा

विसर पडावा एवढा एकच प्रयत्न ती करीत असतात; त्यासाठी मद्याचा किंवा वेश्यांच्या थंडगार मिठ्यांचा ती आश्रय घेतात.

दर महिन्याच्या पगारादिवशी कुंटणखान्यांना भेट देणे हा अगदी न चुकणारा नेम होता. ह्या सुखी दिवसाविषयी आठवडाभर आधीपासून मोठमोठ्यांदा चर्चा चाले. आणि तो दिवस उलटला म्हणजे भोगलेल्या आनंदांच्या कथा ते एकमेकांना मिटक्या मारीत सांगत. अशा बोलण्यां-मध्ये आपल्या पौरुषाची ते खूप फुशारकी मारीत आणि बायकांची क्रूर हेटाळणी करीत. त्यांच्याविषयी बोलताना तिरस्काराने थुंकत.

आणि तरीही विलक्षण म्हणजे या सर्व गोष्टींमागे दुःख आणि शरमेच्या भावना व्यक्त झालेल्या मला ऐकू येत. किंवा तशा त्या व्यक्त होत असे मला वाटायचे. त्या "विसाव्याच्या घरां" मध्ये अवघ्या एका रूबलमध्ये सबंध रात्रीसाठी एक बाई विकत घेता येत असे, ही वस्तुस्थिती माझ्या सहकाऱ्यांना चमत्कारिक, अपराधी भावना देई. तसे वाटणे स्वाभाविक होते असे मला वाटायचे. त्या अपराधी, शरमिंद्या भावनेवर पांघरूण घालण्यासाठी काहीजण मुद्दामच अति रंगेलपणाचा आव आणत. लैंगिक संबंधांबाबत मला खूप कुतूहल असल्यामुळे तीव्र अंतर्दृष्टीने ह्या सर्व गोष्टी मी निरखायचा. अद्याप मी स्त्रीच्या लाघवाचा अनुभव घेतला नव्हता. अद्याप मी ब्रह्मचर्य पाळीत होतो. त्याबद्दल बायका आणि माझे सहकारी, असे दोन्ही माझी दुष्टाव्याने थट्टा करीत. मला पेचात टाकीत. पुढे लौकरच माझ्या सहकाऱ्यांनी "मनोरंजन घरां" मध्ये मला बोलाविणे बंद केले. त्यांनी स्पष्टपणे मला सुनावले:

"बंधू, तू आमच्याबरोबर न येणं चांगलं!"

"का?"

"कारण तू भोवती असताना आम्हाला अवघडल्यासारखं वाटतं!"

माझ्याविषयी त्यांना खास काहीतरी वाटते असे मला त्यांच्या उद्‌गारांवरून वाटले. पण त्या शब्दांचा नीटसा खुलास झाला नाही. मी त्यांच्या खनपटीला बसलो.

"काय गृहस्थ आहे! एकदा तुला सांगितलं ना – तू आमच्याबरोबर येऊ नकोस! तू बरोबर असलास म्हणजे तिथं मजा येत नाही!"

फक्त आर्तेम खवट स्मित करीत म्हणाला:

"एखादा पाद्री किंवा कुणाचेतरी वडील बरोबर आहेत असं वाटतं!"

माझ्या संयमाबद्दल मुली प्रथम माझी चेष्टा करीत. पण पुढे त्या तिरस्काराने विचारू लागल्या :

"तू आमच्यापेक्षा फार चांगला आहेस असं वाटतं काय तुला?"

तेरेसा बोरूता नांवाची एक गुबगुबीत, आकर्षक, चाळीशीची पोलिश "मुलगी" त्या वेश्यागृहाची मालकीण होती. जातिवंत कुत्र्याच्या चतुर नजरेने मला न्याहाळीत ती म्हणाली :

"मुलींनो, त्याला सतावू नका. त्याची नक्की कुणीतरी प्रेयसी आहे. होय ना रे? एवढा छान, दणकट पोरगा! प्रेयसी असावी म्हणून स्वतःला आवरून धरतोय! दुसरं काय?"

ती अट्टल दारुडी होती. ती झिंगली म्हणजे कल्पनेपलिकडे किळसवाणी बनायची. पण शुद्धीवर असली म्हणजे इतर लोकांविषयीचा तिचा चिंतनपर दृष्टिकोन मला चकित करायचा. लोकांच्या कृत्यांमागील तर्कशास्त्र धुंडाळण्याची तिची शांत विचारी वृत्ती आश्चर्यकारक होती.

"प्रबोधिनीमधले विद्यार्थी समजून घेणं सर्वांत कठीण," तिने माझ्या साथीदारांना एकदा सांगितले. "एखाद्या मुलीशी ते काय करतील ठाऊक आहे? सबंध फरशीवर साबणाचं पाणी ओतून ठेवतील, मुलीला संपूर्ण नागडं करून हाता-पायांवर ओणवं व्हायला लावतील, तिच्या हाता-पायांखाली चिनी मातीच्या बशा ठेवतील आणि तिला मागून धक्का मारून ती किती लांब घसरत जाते ते पाहतील. मग दुसऱ्या, तिसऱ्या मुलीशी तोच खेळ! कशासाठी हे असं?"

"तू खोटं सांगतेस!" मी म्हणालो.

"मुळीच नाही!" तेरेसा न चिडता शांतपणे म्हणाली. तिची ती शांत वृत्ती कसलेतरी दडपण आणायची.

"तू गोष्ट बनवून सांगितलीस!"

"एखादी मुलगी अशी कहाणी रचून कशी सांगेल? का मी वेडी आहे असं तुला वाटतं?" माझ्याकडे सताड नजरेने रोखून पहात तिने विचारले.

आमचा वाद माणसे खूप रस घेऊन ऐकत होती. गिऱ्हाईकांच्या खेळांचे वर्णन तेरेसा पुढे करीत राहिली. तिचा आवाज निर्विकार होता. त्या खेळांमागील, त्या वर्तनामागील अर्थ समजावून घेणे, एवढे एकच उद्दिष्ट तिच्या कथनामध्ये होते. ते सारे कशासाठी?

श्रोत्यांनी संतापून थुंकत विद्यार्थ्यांना शिव्या हासडल्या. पण फक्त

माझ्या लक्षात आले की, ज्या लोकांवर मी जिवापाड प्रेम करायला शिकलो होतो, त्यांच्याविषयी वैराचे बीज तेरेसा पेरीत होती. मी उत्तरलो की, विद्यार्थी लोकांवर प्रेम करीत होते, लोकांना मदत करण्याची त्यांची इच्छा होती.

"ते वस्क्रेसेन्स्काया रस्त्यावरचे विद्यापीठातले विद्यार्थी. पण मी बोलतेय धर्मपीठातल्या विद्यार्थ्यांविषयी. आरस्कोये पोलेवरच्या! ते सगळे अनाथ आहेत आणि अनाथ पोरगा मोठेपणी हमखास चोर किंवा डांबीस बनतो. वाईट माणूस बनतो. तो अनाथ असल्यामुळं त्याला आवरून धरणारं काहीच नसतं."

"कोठीवाली" च्या शांत सुरातील कथा, मुलींच्या विद्यार्थ्यांविरुद्धच्या, सरकारी कारकुनांविषयीच्या आणि एकूण "स्वच्छ कपड्यांमधील लोकां" विषयीच्या तक्रारी ऐकून, माझ्या साथीदारांच्या मनांमध्ये त्या लोकांविषयी तिटकारा व किळस तर निर्माण झालीच; शिवाय आनंदाच्या अगदी समीप अशी एक भावना त्यांनी शब्दांमधून व्यक्त केली:

"म्हणजे शिकलेली माणसं आमच्यापेक्षा वाईट आहेत तर!"

अशी चर्चा ऐकायला मला यातना झाल्या, मन कडवट बनले. घाणीच्या डबऱ्यांमध्ये जशी सर्व शहरभरची घाण झिरपत येऊन साठते त्याप्रमाणे त्या अंधाऱ्या छोट्या खोल्यांमध्ये सर्व शहरभरची घाण येऊन साठत होती असे मला जाणवू लागले. वैर आणि दुष्टाव्याने तुडुंब भरलेल्या दुर्गंधयुक्त धुरकट ज्वालेवर ती घाण उकळली जात होती आणि तेथून परत एकदा शहरभर वाहत जात होती. पशुसुलभ भावनेने आणि जीवनातील कंटाळयाला त्रासून माणसे त्या दाटलेल्या बिळांकडे खेचली जात होती. तेथे बीभत्स भाषेचे प्रेमयातनांच्या करुण गीतांमध्ये रूपांतर घडलेले मी पाहिले होते. "सुशिक्षित लोकां" च्या आयुष्यां-विषयीच्या घाणेरड्या काल्पनिक कथांचा जन्म झालेला पाहिला होता. जे समजत नाही त्याविषयी संताप आणि वैरभावना उत्पन्न झालेली पाहिली होती. मला स्पष्ट झाले की, "विसाव्याची घरे" म्हणजे एक प्रकारचे विद्यापीठ होते आणि त्यात माझे साथीदार अत्यंत विखारी स्वरूपाचे शिक्षण घेत होते.

"सुख देणाऱ्या पोरी" घाणेरड्या फरशीवर आळसटपणे पायांची चाळवाचाळव करीत असताना मी पहात होतो. ॲकॉर्डियनच्या सतत रेकत्या सुरावर किंवा खिळखिळ्या झालेल्या पियानोच्या कानठळ्या

बसविणाऱ्या घणघणाटावर त्यांचे थुलथुलीत मांस हिडीसपणे थरथरत होते. ते दृश्य पहात असताना नवे, अस्पष्ट, पण अस्वस्थ करणारे विचार माझ्या मनात निर्माण झाले. माझ्याभोवतालची प्रत्येक गोष्ट एक कंटाळा उत्पन्न करीत होती. तेथून निसटून जाण्याच्या वांझ इच्छेचे वीष मनात कालवीत होती.

लोकांसाठी स्वातंत्र्याचे आणि सुखाचे मार्ग शोधण्याचा निष्ठेने प्रयत्न करणाऱ्या माणसांविषयी बेकरीमध्ये मी बोलू लागलो, की उत्तरादाखल मला ऐकायला मिळे:

"पण मुली तर त्या माणसांविषयी वेगळ्याच गोष्टी सांगतात!"

संतापी तिरसटपणाने ते माझी क्रूर थट्टा करीत. पण बंडखोर कुत्र्याच्या पिलासारखा मी वागायचा. माझ्यापेक्षा वयाने मोठ्या पशूंच्या शहाणपणापेक्षा आणि धैर्यापेक्षा माझे शहाणपण कमी नव्हते आणि धाडस अधिक होते, असे मला वाटायचे. मीसुद्धा संतापायचा. मला जाणीव होऊ लागली की, खुद्द आयुष्याएवढेच आयुष्याविषयीचा विचार करणे अवघड होते. ज्या लोकांबरोबर मी काम करीत होतो त्या लोकांच्या चिवट सहनशक्तीविषयी काही वेळा माझ्या मनात अतीव तिरस्काराच्या ऊर्मी उठत. त्या लोकांची सहन करण्याची ताकद बघून, आमच्या दारुड्या मालकाने केलेल्या अर्धवट वेड्या अपमानांपुढे मुकाटपणे त्यांनी मान तुकविलेली पाहून मी प्रक्षुब्ध व्हायचा.

आणि अशा वेळी एक घटना घडली! त्या कसोटीच्या काळात मला सर्वस्वी परक्या अशा एका विचाराच्या संपर्कात मी आलो. तो विचार मूलतः माझ्या स्वभावाशी परका होता, तरीही त्याने मला खूप अस्वस्थ केले.

लेंटच्या सणाआधीच्या एका रात्री देरेन्कोवच्या घरापासून मी बेकरीकडे परत चालत निघालो होतो. ती एक भयानक वादळी रात्र होती. अशी एक वादळी रात्र, ज्यावेळी घोंघावणारा वारा राखाडी आकाशाला टराटरा फाडून त्याचे असंख्य तुकडे तुकडे करील असे वाटते; त्या चिंध्या झालेल्या आकाशामधून बर्फाच्या भुकटीची उधळण करून सबंध जगाला त्या भुकटीखाली गाडून टाकील असे वाटते; अशा वेळी पृथ्वीच्या आयुष्याची घटका भरल्याचा भास होतो आणि सूर्य पुन्हा कधीही न उगवण्यासाठी विझून जातो. तर ती अशी भयाण रात्र होती. वारा माझ्या चेहऱ्याला झोंबत होता. डोळे मिटूनच मी त्या झंझावाता-

मधून पुढची वाट काढीत होतो. अचानक मी कशालातरी अडखळलो आणि खाली पडलो. फूटपाथच्या कडेला बर्फात एक माणूस पडला होता. माझा पाय त्याला अडखळला होता. आम्ही दोघांनीही शिव्या हासडल्या. मी ग्शियन भाषेत आणि त्याने फ्रेंचमध्ये!

मला ते जरा विचित्र वाटले. मी त्या माणसाला खेचून त्याच्या पायांवर उभे केले. तो बुटका, छोटा आणि फारसे वजन नसलेला माणूस होता. माझ्या दंडाला हिसका देऊन चिडून तो ओरडला:

"माझी हॅट! साल्या माझी हॅट मला परत दे! मी गोठून जाईन!"

बर्फात मी त्याची हॅट धुंडाळली. ती सापडताच तिला झटकून मी स्वच्छ केले आणि त्याच्या आखूड, ताठ केसांच्या डोक्यावर जोरात खुपसली. पण त्याने ती खेचून काढली आणि हातामध्ये तिला हलवीत दोन भाषांमध्ये तो शिव्या घालू लागला, माझ्या अंगावर खेकसू लागला:

"चालता हो!"

अचानक त्याने पुढे झेप घेतली आणि बर्फाच्या वादळात तो गुडुप झाला. पण थोड्याच वेळात मला तो पुन्हा भेटला: रस्त्यावरील विझलेल्या दिव्याखाली. दिव्याच्या लाकडी खांबाला बिलगून तो कळकळीने म्हणत होता:

"लेना, मी मरतोय... लेना...!"

तो झिंगला होता हे स्पष्ट समजत होते. जर मी त्याला रस्त्यात सोडून गेलो असतो तर बहुधा तो गोठला असता. तो कुठे रहात होता याची मी त्याला विचारणा केली.

"हा कोणता रस्ता?" रडव्या आवाजात तो ओरडला. "कुठल्या दिशेनं जायचं ते मला ठाऊक नाही."

मी त्याच्या अंगाभोवती माझ्या हाताचा विळखा घातला आणि त्याच्याबरोबर चालत पुन्हा एकदा त्याच्या घराच्या पत्त्याची चौकशी केली.

"बुलाकवर..." कुडकुडत तो पुटपुटला. "बुलाकवर... तिथं एक बान्या* आहे..."

त्याची पावले अनिश्चितपणे पडत होती. तो अडखळत होता, झोकांड्या खात होता. मला चालणे अवघड करीत होता. त्याच्या दातांची कडकड मला ऐकू येत होती.

---

*हमामखाना – अनु.

"Si tu Savais" माझ्या अंगाला रेटा देत तो पुटपुटला.

"मला समजत नाही."

तो एकदम थांबला, त्याने आपला एक हात वर उचलला आणि स्पष्ट आवाजात – मला वाटते मोठ्या अभिमानपूर्वक – म्हणाला :

"Si tu savais où je te mène..."

त्याने आपली बोटे आपल्या तोंडात कोंबली. तो धडपडला आणि जवळ जवळ खाली कोसळला. मी टाचांवर खाली बसलो आणि माझ्या पाठुंगळी त्याला उचलून घेतले. मी माझ्या पाठीवरून त्याला नेत होतो तेव्हा माझ्या डोक्याच्या कवटीवर आपली हनुवटी दाबीत तो पुन्हा पुटपुटला :

"Si tu savnis ... अरे मी गोठतोय. अरे देवा!"

आम्ही बुलाकवर पोहोचलो तेव्हा तो कोठे राहतो याबद्दल त्याच्या-पाशी वारंवार चौकशी करावी लागली. सरतेशेवटी, एका आवाराच्या मागील बाजूस बर्फाळ वादळात लपलेल्या छोटया इमारतीच्या दाराशी आम्ही जाऊन थडकलो. आतील बाजूच्या दारापर्यंत तो चाचपडत गेला आणि हळूच टक टक आवाज करीत तो दबत्या आवाजात मला म्हणाला :

"श्शू ऽऽ! चूप!"

लाल रंगाचा पायघोळ झगा घातलेल्या एका बाईने दार उघडले. तिच्या एका हातात पेटती मेणबत्ती होती. आम्हाला वाट करून देण्या-साठी ती शांतपणे बाजूला सरली. आपल्या झग्याच्या खिशातून अथवा कुठूनतरी तिने एक दांडीचा चष्मा काढला आणि त्यामधून ती मला न्याहाळून पाहू लागली.

मी तिला सांगितले की, त्या माणसाचे हात गोठलेले असावेत आणि त्याच्या अंगातील कपडे काढून त्याला झोपविले पाहिजे.

"असं?" तिनं विचारले. तिचा आवाज भरदार होता. एखाद्या तरुणीसारखा स्पष्ट होता.

"त्याचे हात थंड पाण्यानं धुतलं पाहिजेत."

काहीही न बोलता आपल्या चष्म्याने तिने मला खोलीमधील एक कोपरा दाखविला. तिथे फक्त एक चिताऱ्याचा घोडा होता आणि त्या घोड्यावर एक चित्र होते. एका नदीचे आणि झाडांचे. गोंधळून मी त्या बाईच्या चेहऱ्याकडे अधिक बारकाईने पाहिले. तो विलक्षण मख्ख होता. ती माझ्यापासून दूर सरली आणि दुसऱ्या कोपऱ्यात गेली. तेथे

गुलाबी आवरणाखाली एका टेबलावर एक दिवा जळत होता. तेथे ती बसली. टेबलावरील बदामचा गुलाम उचलून त्याचे ती तन्मयतेने निरीक्षण करू लागली.

"तुमच्यापाशी वोदका आहे का?" मी खूप मोठ्या आवाजात विचारले. तिने उत्तर दिले नाही. टेबलावर पत्ते मांडण्यात ती गर्क होती. तो माणूस खूर्चीवर बसला होता. त्याचे डोके त्याच्या छातीवर झुकले होते. त्याचे लाल हात लुळेपणाने लोंबत होते. मी त्याला कोचावर निजविले आणि त्याच्या अंगातील कपडे काढू लागलो. काय घडत होते ते मला समजत नव्हते. एखाद्या स्वप्नातल्याप्रमाणे तो सारा प्रकार मला वाटत होता. कोचाशेजारच्या भिंतीला छायाचित्रांनी संपूर्ण झाकून टाकलेले होते. त्या छायाचित्रांमध्ये दिव्याच्या उजेडात एक फिकट सोनेरी पुष्पहार दिसत होता. त्या हाराभोवती पांढरी फीत गुंडाळलेली होती आणि त्या फितीच्या एका टोकाला मुलाम्याने अक्षरे कोरलेली होती: "अनुपमेय जिल्डासाठी"

"साल्या, जरा हळू!" त्या माणसाचे हात चोळायला मी आरंभ केला तेव्हा तो कण्हला.

त्या बाईने पत्ते मांडले होते आणि त्यांच्यात ती पुरती गुंगली होती. तिच्या धारदार नाकामुळे तिच्या चेहऱ्याला पक्ष्याशी साधर्म्य आले होते. तिच्या मोठ्या, स्थिर डोळ्यांमुळे तिचा चेहरा उजळला होता. आता तिने आपले पांढरे केस किंचित नीट करण्यासाठी हात वर उचलले. तिचे हात एखाद्या किशोरीप्रमाणे भासत होते आणि केस एवढे नीटनेटके बसविले होते, की तिने केसांचा टोप घातला असावा असे मला वाटले. तिने खालच्या, पण अत्यंत स्पष्ट आवाजात विचारले:

"जॉर्ज, तू मीषाला भेटलास?"

जॉर्जने मला बाजूला सारले आणि तो झटकन उठून बसला. चाचरत, धांदरल्या आवाजात तो उत्तरला:

"पण तो कीव्हला गेलाय हे तुला ठाऊक आहे."

"हो, कीव्हला!" आपल्या पत्त्यांवर नजर स्थिर ठेवीत तिने त्याच्या शब्दांना पुन्हा उच्चारले. तिच्या आवाजात कोणताही भाव नव्हता, कोणतीही छटा नव्हती असे माझ्या ध्यानात आले.

"तो लौकरच परत येईल..."

"असं?"

“होय ! लौकरच !”

“असं ?” बाईने पुन्हा विचारले.

अर्धनग्न अवस्थेतील जॉर्ज तसाच कोचावरून उडी मारून उठला आणि घाईघाईने तिच्यापाशी गेला. तिच्या पायांशी गुडघ्यांवर बसत तो काहीतरी फ्रेंचमध्ये बोलला.

“माझं मन अगदी शांत आहे,” ती रशियनमध्ये उत्तरली.

“मी रस्ता चुकलो. बर्फाचं एवढं भयंकर वादळ आणि सुसाट वारा ! मला वाटलं, मी गोठून जाणार,” जॉर्ज तिला घाईघाईने खुलासा करीत होता. तिच्या हातांना कुरवाळीत होता. पण तिने आपले हात थंडपणे आपल्या गुडघ्यांवर टेकविले होते. तो माणूस सुमारे चाळी-शीचा होता. त्याच्या तांबूस चेहऱ्यावर, काळ्या मिशांखालील जाड ओठांवर एक अस्वस्थ, धास्तावलेला भाव होता. त्याच्या वाटोळ्या कवटीवरील ताठ पांढऱ्या केसांना तो सारखा चोळत होता. त्याच्या-वरील दारूचा अंमल वेगाने नाहीसा होत होता.

“आपण उद्या कीव्हला जायचं,” बाई म्हणाली. तो प्रश्न असू शकत होता, किंवा ते सरळ निवेदन असू शकत होते.

“ठीक आहे, उद्या ! तेव्हा आता तुला विश्रांती घेतली पाहिजे. तू झोपायला का जात नाहीस ? खूप उशीर झालाय.”

“आणि मीषा आज इथं येणार नाही ?”

“छे: छे: ! एवढं भयंकर वादळ आहे... चल, तुला आता थोडी झोप घेतली पाहिजे.”

त्याने टेबलावरील दिवा उचलला आणि पुस्तकांच्या कपाटामागील एका छोट्या दरवाजामधून तिला घेऊन तो आत गेला. बराच वेळपर्यंत तेथे मी एकटाच होतो. मन शून्य होते. शेजारच्या खोलीमधून त्याचा घोगरा आवाज अस्पष्ट ऐकू येत होता. खिडकीशी वादळ झोंबत होते. तक्तपोशीवर वितळलेल्या बर्फाच्या पाण्यामध्ये मेणबत्तीच्या ज्योतीचे प्रतिबिंब थरथरत होते. खोलीत सामानाची दाटी होती. एक विचित्र, ऊबदार दर्प तेथे भरला होता. त्या दर्पामुळे मनाला गुंगी येत होती.

बऱ्याच वेळानंतर जॉर्ज झुकांडचा खात पुन्हा अवतरला. त्याच्या हातात दिवा होता. दिव्याची शेड चिमणीच्या काचेला घासत होती.

“ती झोपली.”

त्याने दिवा टेबलावर ठेवला. तो खूप विचारात गढल्यासारखे वाटत होते. खोलीच्या मध्यभागी थांबून त्याने बोलायला सुरुवात केली . पण बोलताना त्याने माझ्याकडे पाहिले नाही.

"तर काय सांगू? मला वाटतं... तू नसतास... तर आज मी मेलोच असतो!.. आभारी आहे तुझा! पण... तू कोण आहेस?"

त्याने आपले डोके एका बाजूला कलते करीत माझे बोलणे ऐकून घेतले. दुसऱ्या खोलीतून किंचित जरी सळसळ ऐकू आली तरी तो दचकायचा.

"ती तुमची बायको आहे काय?" मी हळूच विचारले.

"होय, माझी बायको. माझं सर्वस्व! तिच्यासाठीच केवळ मला आयुष्य जगावंसं वाटतं!" तक्तपोशीवर नजर रोखीत तो माणूस हळूच आणि शांतपणे म्हणाला. पुन्हा त्याने आपले डोके चोळायला आरंभ केला.

"आपण थोडा चहा पिऊ या का?"

विमनस्कपणे तो दाराकडे निघाला, पण एकदम थांबला. त्याला आठवण झाली की, मोलकरीण आजारी पडली होती आणि तिला इस्पितळात धाडण्यात आले होते.

समोवार तापवून देण्याची मी तयारी दर्शविली. त्याने संमतीदर्शक मान हलविली. आपल्या अंगावर पूर्ण कपडे नाहीत याचा त्याला विसर पडला होता. तसाच अनवाणी पायांनी ओल्या फरशीवरून चालत तो मला छोटचा स्वयंपाकघराकडे घेऊन गेला. तेथे चुलाण्याशी टेकून तो पुन्हा म्हणाला:

"तू जर नसतास तर मी गोठून मेलो असतो! धन्यवाद!"

आणि एकदम दचकून त्याने माझ्याकडे विस्फारल्या डोळ्यांनी टक लावली. त्याच्या डोळ्यांमध्ये भीती दाटली होती.

"मग तिचं काय झालं असतं बरं? बापरे!"

दरवाजाच्या रस्त्याच्या काळोख्या भगदाडाकडे डोळे वळवून तो दबत्या आवाजात घाईघाईने म्हणाला:

"तिला बरं नाही. तू पाहिलंस ना? तिला एक मुलगा होता— मॉस्कोत—तो संगीतकार होता... त्यानं आत्महत्या केली! पण तिला अजूनही असं वाटतंय की, परत घरी येईल. जवळ जवळ दोन वर्षं असं चाललंय!"

नंतर आम्ही चहा पीत असताना तो असंबद्धपणे बोलत होता. नेहमीच्या वापरात नसलेले शब्द तो वापरीत होता. खेड्यातील एका उमराव घरामधील ती बाई होती. आणि तो इतिहासाचा शिक्षक होता. तिच्या मुलाला शिकविण्यासाठी त्याची नेमणूक झाली होती आणि तो तिच्याच प्रेमात पडला होता. त्याच्यासाठी तिने आपल्या नवऱ्याला सोडले होते. तिचा नवरा जर्मन होता, एक बॅरन होता. ती ऑपेरा-मध्ये गात असे आणि त्यांचे एकत्र जीवन खूप सुखी होते. पण तिच्या आयुष्यात वीष कालविण्यासाठी बॅरन शक्य ते सर्व करायचा.

एवढी हकीकत मला सांगून झाल्यानंतर, डोळे किलकिले करून त्या कळकट स्वयंपाकघरामधील सावल्यांकडे तो एकटक पहात राहिला. चुलाण्याशेजारी लाकडी फरशी कुजली होती आणि त्यापलिकडे कुठेतरी त्याची नजर लागली होती. त्याने एवढ्या गरम चहाचा घोट घेतला की, त्याचे तोंड भाजून निघाले आणि त्या वेदनेने त्याचा चेहरा आक्रसला. मग अस्वस्थपणे आपल्या वाटोळ्या डोळ्यांची त्याने उघडझाप केली:

"पण, तू कोण आहेस?" त्याने पुन्हा विचारले. "अरे हो, तू बेकरीत काम करतोस! कडक बिस्कीटं तयार करणाऱ्या. मोठं विचित्र आहे. तसा तू दिसत नाहीस. असं का बरं?"

त्याच्या आवाजात सावधगिरी जाणवत होती. त्याने माझ्याकडे अविश्वासाचा एक कटाक्ष फेकला. एखाद्या सापळ्यात सापडलेल्या माणसाप्रमाणे त्याने माझ्याकडे पाहिले.

माझी कहाणी मी त्याला थोडक्यात सांगितली.

"असं आहे तर!" हळूच तो उद्‌गारला. "अच्छा, म्हणजे असं आहे तर!"

मग अचानक उत्तेजित स्वरात त्याने मला विचारले:

"ती परीकथा—'बदकाच्या कुरूप पिल्लाची'—तुला माहीत असेलच?"

त्याच्या चेहऱ्याची वेडीवाकडी हालचाल झाली. तो बोलत होता तेव्हा त्याच्या शब्दांमधून संताप भरलेला होता. त्याचा घोगरा आवाज एका विचित्र, अनैसर्गिक किंकाळीपर्यंत वर चढला होता.

"अशा परीकथेचा तुला मोह पडतो, होय की नाही? मी तुझ्या वयाचा होतो तेव्हा मलासुद्धा असंच वाटायचं. माझं सुरेख हंसात रूपांतर होईल असं वाटायचं. पण... अकादमीमध्ये अभ्यास करायला जाण्या-

ऐवजी मी विद्यापीठात गेलो. माझे वडील पाद्री होते. त्यांनी माझं नांव टाकलं. मग माणसाच्या कमनशीबांचा इतिहास, प्रगतीचा इतिहास मी पॅरिसमध्ये अभ्यासला. थोडं स्वतंत्र लिखाणही केलं. छे: ते सारंच इतकं..."

तो दचकला आणि क्षणक्षर कान देऊन ऐकत राहिला. मग म्हणाला:

"प्रगती—लोकांनी स्वतःची फसवणूक करून घेण्यासाठी निर्माण केलेली गोष्ट! आयुष्याला काही अर्थ नाही, त्याचं काही तर्कशास्त्र नाही. गुलामीशिवाय तुमची प्रगती घडत नाही. अल्पसंख्य ज्या क्षणी बहुसंख्यापुढे आपली सत्ता गमावतील, त्या क्षणी मानवजात स्तब्ध होईल. जेव्हा आपण आयुष्य सुकर करू पाहतो, आपले श्रम हलके करू पाहतो, तेव्हा प्रत्यक्षात आपण आयुष्य जास्त अवघड करीत असतो, जास्त श्रमत असतो. कारखाने आणि यंत्रं—किती मूर्खपणा! जगात खरं म्हणजे शेतकऱ्यांची, धान्य पेरणाऱ्यांची गरज आहे. पण पहावं तर जास्त जास्त कारखाना-कामगार निर्माण होत आहेत. अन्न एवढी एकच गोष्ट माणसानं आपल्या हातांनी श्रम करून निसर्गापासून खेचून घेतली पाहिजे. माणसाची गरज जेवढी कमी तेवढा तो जास्त सुखी! त्याच्या इच्छा जेवढया जास्त, तेवढं त्याचं स्वातंत्र्य कमी!"

त्याचे प्रत्यक्ष शब्द बहुधा नेमके असे नव्हते. पण हे धक्का देणारे विचार मात्र त्याने असेच व्यक्त केले होते. अशा विचारांशी ती माझी पहिलीच भेट होती. एवढया झगझगीतपणे आणि उघडपणे प्रथमच असे विचार माझ्या सामोरे आले होते. एक उच्च स्वरातील किंकाळी फोडून तो माणूस गप्प झाला आणि इतर खोल्यांकडे जाण्याच्या उघडया दारांकडे डोळे वळवून क्षणभर त्याने शांततेचा कानोसा घेतला. मग दबत्या आवाजात अत्यंत चिडून तो पुढे बोलू लागला:

"ही गोष्ट तुझ्या डोक्यात पक्की बिंबव—कुणालाही फारशा गरजा नसतात. भाकरी आणि बाई..."

बाईविषयी तो रहस्यमय खालच्या आवाजात बोलत होता. त्याचे शब्द मला अनोळखी होते. त्याच्या कविता मी वाचलेल्या नव्हत्या. आणि अचानक मला तो चोर बाश्कीनसारखा भासला.

"बीॲट्रिस, फियामेत्ता, लॉरा, नीनोन," मला अज्ञात अशी नांवे तो पुटपुटला. प्रेमविव्हल राजांविषयी आणि कवींविषयी तो बोलला. फ्रेंच कविता त्याने म्हटल्या. कोपरापर्यंत उघडा असलेला बारकुळा हात उडवीत त्याने ताल धरला होता.

“प्रेम आणि भूक जगावर सत्ता गाजवतात,” आवेगाने तो म्हणाला. हे शब्द मला ठाऊक होते. ‘भूक राजा’ नांवाच्या एका क्रांतिकारक पुस्तिकेच्या शीर्षकाखाली ते छापलेले होते. ती गोष्ट माझ्या मनावर विशेष वजनपूर्वक आणि महत्त्वाने कोरली गेली होती.

“माणसांना सर्व काही विसरायला हवं असतं, त्यांना सांत्वन हवं असतं, ज्ञान नको असतं!”

ह्या शेवटच्या विचाराने तर मी पुरता हबकलो.

सकाळी मी स्वयंपाकघरातून बाहेर पडलो. भिंतीवरील छोट्या घड्याळात सहा वाजून काही मिनिटे उलटली होती. अंधारात बर्फाची ढेकळे रेटीत मी पुढची वाट काढीत होतो. माझ्याभोवती वादळ अजूनही घोंघावत होते. मन मोडून गेलेल्या त्या माणसाचे किंकाळीयुक्त संतापलेले शब्द माझ्या कानांमध्ये अजूनही घुमत होते. तो जे काही बोलला होता ते गिळून टाकणे मला जमले नव्हते असे जाणवले. त्या सर्व गोष्टी घशातच कोठेतरी अडकल्या होत्या आणि माझा जीव गुदमरत होता. बेकरीत जाण्याची इच्छा होत नव्हती. लोकांमध्ये जाणे नको वाटत होते. चिकटलेल्या हिमकणांचे वाढते ओझे खांद्यांवरून वाहात, दिवस चांगला वर येईपर्यंत तातार वस्तीतील रस्त्यांवरून मी भटकत राहिलो. बर्फाच्या ढिगाऱ्यांमधून शहरच्या माणसांच्या आकृती दिसू लागल्या होत्या.

ह्या इतिहासाच्या मास्तरला पुन्हा कधीही मी भेटलो नाही किंवा त्याला परत भेटण्याची मला इच्छाही झाली नाही. पण जीवनाच्या ह्या वेडेपणाविषयीची, श्रमाच्या व्यर्थतेविषयीची ही भाषा भविष्यकाळात वारंवार मला ऐकायला मिळणार होती. अशिक्षित भटक्यांच्या आणि घरदार नसलेल्या भिकाऱ्यांच्या तोंडून मी ही भाषा ऐकणार होतो. “तल्स्तोयवाद्यांच्या”*, अत्यंत सुसंस्कृत स्त्री-पुरुषांच्या तोंडून हेच विचार ऐकणार होतो. धर्मविषयातील उच्च पदवी धारण करणाऱ्या एका धर्माधिकाऱ्याच्या तोंडी मी अशा प्रकारची भाषा ऐकली. स्फोटक द्रव्ये बनविणारा एक रसायनतज्ज्ञ असेच बोलला होता. नव-जोमदार प्रवृत्तीच्या जीवनशास्त्रज्ञाकडून आणि इतर अनेकांकडून हेच ऐकले होते. पण ह्या अशा प्रकारच्या विचारांशी माझी पहिली भेट झाली तेव्हा जशी माझी मती गुंग झाली होती, तशी अवस्था नंतरच्या भेटींमध्ये झाली नाही.

---

*ल्येव तल्स्तोय यांचे अनुयायी – सं.

आणि अवघ्या एक-दोन वर्षांपूर्वी – म्हणजे इतिहासाच्या मास्तरशी माझे बोलणे घडून तीस वर्षांपेक्षा जास्त काळ लोटल्यानंतर – अगदी अचानकपणे तेच विचार जवळ जवळ त्याच शब्दांमध्ये माझ्या एका जुन्या परिचिताच्या – एका कामगाराच्या – तोंडून मला ऐकायला मिळाले.

आमचे संभाषण अगदी मोकळेपणाने सुरू झाले. हा माणूस स्वतःला "मोठा राजकारणी किडा" म्हणवून घ्यायचा. काहीसे गंभीर स्मित करीत बेधडक स्पष्टपणे – हा गुण मला वाटते फक्त रशियनांमध्ये आहे – तो म्हणाला :

"मित्रा, अलेक्सेई माक्सीमिच! मला ह्या शास्त्रांशी, अकादमींशी, विमानांशी काय कर्तव्य आहे? फक्त आणखी एक ओझं! मला त्याचा काहीही उपयोग नाही. मला फक्त हवा आहे एक निवांत कोपरा आणि मला इच्छा होईल तेव्हा चुंबायला एक बाई! आणि माझ्या चुंबनांना तिनं प्रामाणिक प्रतिसाद द्यावा म्हणून शरीर आणि आत्मा! बस्स! तू एखाद्या बुद्धिमान माणसासारखा युक्तिवाद करतोस. आता तू आमच्यातला एक राहिला नाहीस. तू बिघडलास. लोकांसारख्या छोट्या गोष्टीपेक्षा विचार तुला जास्त मोलाचे वाटतात. तू यहुद्यांप्रमाणं विचार करतोस की, माणूस विश्रांतीचा दिवस भोगण्यासाठी जन्मला आहे. होय की नाही?"

"यहुदी लोक असं मुळीच मानत नाहीत."

"सैतानाला ठाऊक ते काय मानतात ते! त्यांना समजून घेणं मोठं कठीण!" तो म्हणाला. त्याने सिगारेट नदीवर भिरकावली आणि ती पडत असताना शांतपणे तो पहात राहिला.

शरदामधील ती चांदणी रात्र होती. नेवा नदीच्या किनाऱ्यावरील एका ग्रॅनाईट दगडाच्या बाकावर आम्ही बसलो होतो. सबंध दिवसभर निष्फळ भावनिक ताण पडल्यामुळे आम्ही दोघेही खूप थकलो होतो. काहीतरी साध्य करण्याची, एक चांगले आणि उपयुक्त उद्दिष्ट साध्य करण्याची चिकाटीची, पण अनुपलब्ध इच्छा आम्हाला छळत होती.

"तू आमच्याबरोबर आहेस, पण तू आमच्यातला एक नाहीस, आणि हेच मला सांगायचंय," शांतपणे विचारपूर्वक तो पुढे बोलू लागला. "बुद्धिमान माणसांना चिंता करायला आवडतं. शतकानुशतकांपासून त्यांनी स्वतःला बंडांशी जोडून घेतलंय. ख्रिस्ताप्रमाणे. तो कल्पनावादी होता आणि दुसऱ्या जगासाठी त्यानं बंड केलं. अगदी त्याच

मार्गानं सगळी बुद्धिजीवी माणसं मनोराज्यमय जगासाठी बंड करतात. एक कल्पनावादी बंड करतो आणि सुस्थित नसलेले, पाजी, सगळे नीच लोक त्याच्याबरोबर जातात! ते सगळे चिडीपायी जातात, कारण आयुष्यात त्यांना कुठंच स्थान नसतं म्हणून! कामगार क्रांतीसाठी बंड करतात. श्रमाची साधनं आणि उत्पादनवस्तू यांचं योग्य वाटप व्हावं, एवढीच त्यांची गरज असते. जेव्हा त्यांना सर्व सत्ता उपलब्ध होईल तेव्हा आपलं राज्य असावं असं त्यांना वाटेल? मुळीच नाही! ते सारे विघटित होतील, विस्कळीत होतील आणि प्रत्येकजण स्वतःसाठी एक निवांत कोपरा शोधायची स्वतःच धडपड करील...

"तू यंत्रांविषयी विचारतोस? तंत्रशास्त्राविषयी? पण ह्या गोष्टी आमच्या गळ्यांभोवतीचा फास तेवढा जास्त घट्ट करतात. आमची बंधनं अधिक भक्कम करतात. नको. अनावश्यक कामापासून आम्ही स्वतःला मुक्त केलं पाहिजे. माणसाला हवा असतो निवांतपणा. कारखाने आणि शास्त्रं आम्हाला निवांतता लाभू देणार नाहीत. माणसाला फारशा गरजा नसतात. त्याला एकट्याला निवांत रहावंसं वाटतं. मला घराचा एक छोटा कोपरा पाहिजे असताना मी शहरांचे ढिगारे कशाला रचायचे? जेव्हा माणसं झुपक्यांनी राहतात तेव्हा त्यांच्यासाठी वाहत्या पाण्याची, नळांची, विजेची वगैरे सोय करावी लागते. पण ह्या गोष्टींशिवाय तुम्ही जर राहू शकलात तर आयुष्य किती सोपं होईल! तुला काय हवं ते म्हण, पण आपल्यापाशी अनावश्यक गोष्टी फार आहेत. आणि त्या सगळ्या बुद्धिजीवींमुळं आल्या आहेत. म्हणून मी म्हणतो की, बुद्धिजीवी हे अपायकारी वर्गातले आहेत."

अर्थपूर्ण आयुष्य पूर्णपणे आणि बिनदिक्कतपणे हिरावून घेणे रशियनांना जेवढे जमते तेवढे पृथ्वीतलावर इतर कुणालाही जमत नाही, असा मी शेरा मारला.

"अत्यंत मुक्त मनाची माणसं," किंचित हसून माझ्या ओळखीच्या गृहस्थाने मला दुजोरा दिला. "मात्र रागावू नको, पण माझा युक्तिवाद बरोबर आहे. आमच्यासारखी लक्षावधी माणसं असाच विचार करतात, पण ते विचार शब्दांमध्ये कसे मांडायचे हे त्यांना ठाऊक नाही... आयुष्य अधिक सोपं केलं पाहिजे. म्हणजे ते आमच्याशी जास्त दयाळू वागेल!"

हा माणूस कधीही "तल्स्तोयवादी" नव्हता, अथवा त्याने कधी

अराजकवादी प्रवृत्ती प्रकट केल्या नव्हत्या. त्याच्या बौद्धिक विकासक्रमाची मला चांगली ओळख होती.

त्याच्याबरोबरील संभाषणानंतर साहजिकच माझ्या मनात विचार येऊ लागले: लक्षावधी रशियन स्त्री आणि पुरुष क्रांतीची वेदना आणि तिचा ताण सहन करीत आहेत, कारण त्यांच्या खोल अंत:करणात श्रमापासून मुक्त होण्याची आशा दडलेली आहे, हे जर खरोखरीच सत्य असेल तर? कमीत कमी श्रम आणि जास्तीत जास्त सुख! ही भावना मोठी लोभस आहे. ती लोकांना वाहवत नेते. प्रत्येक असाध्य गोष्टी-प्रमाणे, प्रत्येक मनोराज्याप्रमाणे!

हेन्रिक इब्सेनच्या ओळी मला आठवल्या:

"पुराणमतवादी" झालो म्हणता मी?
सारं आयुष्य जसा आहे तसाच आहे मी.
प्यादी हलवणं कधी ठाऊक नाही मला.
संपवा सगळा खेळ! —आणि मी सर्वस्वी तुमचाच.

आठवते एकच क्रांती
जिच्यात नव्हती फारशी लांडीलबाडी,
नंतरच्या सगळ्या क्रांत्यांवर तिनं मात केली,
अर्थात तिचं नांव महाप्रलय!

पण तरीही झाली सैतानाची फसगत
कारण गलबतावरचा नोआ बनला हुकूमशहा.

तेव्हा जहाल मित्रांनो, करू या प्रयत्न पुन्हा.
त्याच्यासाठी आणा योद्धे, आणा वक्ते.
होय, आणा आणखी एक जगव्यापी महाप्रलय
आणि मी—मी आनंदानं गलबत फोडीन!

देरेन्कोवच्या दुकानामधून होणारी मिळकत अगदी तुटपुंजी होती. आणि आर्थिक मदतीची गरज असलेल्या लोकांची व कामगिऱ्यांची संख्या सतत वाढतच होती.

"आपल्याला काहीतरी मार्ग शोधला पाहिजे," विमनस्कपणे आपल्या दाढीमधून बोटे फिरवीत आंद्रेई म्हणायचा. मग त्याचे नेहमीचे अपराधी स्मित करायचा किंवा सोत्कंठ उसासा टाकायचा.

मानवतेसाठी आयुष्यभर सक्तमजुरी करायला आपला जन्म झाला आहे असे हा गृहस्थ समजत होता, असे मला भासायचे. आणि जरी ही शिक्षा त्याने मान्य केली होती तरी काहीवेळा तिचे ओझे त्याला असह्य व्हायचे.

अनेकदा वेगवेगळया तऱ्हांनी मी त्याला विचारले होते:

"तुम्ही का करता हे?"

पण माझ्या विचारण्याचा अर्थ त्याला समजला नाही. कारण ह्या प्रश्नाऐवजी, "कशाबद्दल?' ह्या प्रश्नाला तो नेहमी उत्तर द्यायचा. त्याची उत्तरे पुस्तकी असायची, असंबद्ध असायची. लोकांच्या जीवनातील दैन्याविषयी, प्रबोधनाच्या आणि ज्ञानाच्या गरजेविषयी तो बोलायचा.

"पण लोकांना ज्ञान हवं आहे का? ज्ञानाचा ध्यास त्यांनी धरलाय का?"

सतरा वर्षांच्या तरुणांसमोर असे भेदक विचार येणे अपायकारक आहे. अशा भेटींमुळे विचार बोथट बनतात. तरुणांचा त्यांच्यापासून काहीच लाभ घडत नाही.

मला वाटू लागले की, एकच गोष्ट सर्वत्र आढळते. तसे नेहमीच माझ्या ध्यानात आले होते की, मनोरंजक गोष्टी लोकांना आवडण्याचे एकमेव कारण म्हणजे त्यांच्या भिकार, पण सवयीच्या दैनंदिन आयुष्याचा त्यांना घटकाभर विसर पडायचा. गोष्टीमध्ये जेवढी जास्त "नवलाई" तेवढ्या जास्त उत्साहाने तिचे स्वागत व्हायचे. खूप "अद्भुत" मसाला पुरविणारी पुस्तके वाचकांना मुग्ध करून टाकीत. थोडक्यात म्हणजे "मी अपकारक धुक्यात चाचपडत होतो."

देरेन्कोवने एक बेकरी सुरू करण्याचा निर्णय घेतला. मला आठवते की, ती सर्व योजना अगदी अचूकपणे आखण्यात आली होती व प्रत्येक उलाढालीत त्या धंद्यात किमान पस्तीस टक्के नफा अपेक्षित धरला होता. रोटीवाल्याचा "पोऱ्या" म्हणून आणि "मंडळातील एक सदस्य" म्हणून मी काम करायचे ठरले. रोटीवाल्याने पीठ, अंडी, लोणी अगर तयार झालेला माल चोरू नये, अशी खबरदारी घेण्याचे माझे काम होते.

अशा रीतीने एका प्रचंड आणि गलिच्छ तळघरामधून दुसऱ्या छोट्या आणि किंचित अधिक स्वच्छ तळघरात मी दाखल झालो. त्या तळघराला स्वच्छ राखणे हे माझ्या अनेक कामांपैकी एक काम होते. चाळीस लोकांच्या आर्तेलमध्ये काम करण्याऐवजी आता मला फक्त एकाच

माणसाबरोबर काम करावयाचे होते. ह्या माणसाचे कपाळावरील केस पांढरे होत चालले होते. त्याची दाढी आखूड, टोकदार होती. निमुळता, धूर खाल्लेला चेहरा होता. डोळे काळे आणि गंभीर होते. त्याचे तोंड वैशिष्टयपूर्ण होते. पर्च माशासारखे छोटे. तो विचारात असला म्हणजे त्याच्या जाड, नरम ओठांना मुरड पडायची आणि कुणाचे तरी तो चुंबन घेत होता असे वाटायचे. त्याच्या डोळ्यात खोलवर उपहासाची चमक होती.

अर्थात तो चोरी करायचा. बेकरीमध्ये कामाच्या पहिल्याच रात्री दहा अंडी, तीन किंवा अधिक पौंड पीठ व लोण्याचा एक मोठा गोळा, एवढ्या गोष्टी त्याने बाजूला काढून ठेवल्या.

"हे कशासाठी?"

"माझ्या ओळखीच्या एका छोटया मुलीसाठी," मित्रत्वाच्या सुरात तो उत्तरला आणि कपाळाला चुण्या पाडीत पुढे म्हणाला "एका छा ऽऽ न छोटया मुलीसाठी!"

चोरी करणे हा जगात गुन्हा मानला जातो असे त्याला पटविण्याचा मी हरतऱ्हेने प्रयत्न केला. पण माझी वक्तृत्वशक्ती प्रभावी ठरली नाही. किंवा जे सत्य मी त्याला पटवू पहात होतो त्याबद्दल माझी स्वतःचीच पुरेशी खात्री झाली नसावी. सारांश, माझे शब्द फुसके ठरले.

पिठाच्या पेटीवर उताणे पडून खिडकीमधून तारे पहात रोटीवाला अविश्वासाने पुटपुटला:

"हा मला व्याख्यान झोडतो! आयुष्यात पहिल्यांदाच मला पाहतो आणि ताबडतोब व्याख्यान सुनावतो? आणि मी तर ह्याच्यापेक्षा वयानं तिप्पट मोठा! मोठी गंमत आहे."

तारे न्याहाळून पाहण्याचे काम संपविल्यानंतर त्याने मला विचारले:

"यापूर्वी तू कुठं काम करत होतास? मला वाटतं, मी तुला कुठंतरी पाहिलंय. सेम्योनोवांकडं तर नाही? जिथं मोठं भांडण झालं होतं? नाही? मग कदाचित माझ्या एखाद्या स्वप्नात मी तुला पाहिलं असावं."

थोड्याच दिवसात मला आढळून आले की, ह्या माणसाला झोपेची अमर्याद देणगी होती. कोणत्याही वेळी, कोणत्याही अवस्थेत तो झोपू शके. चुलाण्यात रोटया ठेवण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या लाकडी

फावड्याला अंग टेकून उभ्या उभ्या सुद्धा तो झोपायचा. झोपेत त्याच्या भुवया उंचावत आणि त्याच्या सबंध चेहऱ्यात बारीक बदल घडून येई. उपहासात्मक आश्चर्याचा भाव त्यावर उमटे. दडविलेले खजिने आणि स्वप्ने हे त्याचे संभाषणाचे आवडते विषय होते. मोठ्या ठामपणे तो म्हणायचा :

"मला पृथ्वी अगदी आरपार दिसते आणि पुरण भरलेल्या पाय् पक्वान्नाप्रमाणं तिच्यात खजिने ठासून भरले आहे. पैशाने भरलेले हंडे, पेटारे आणि भांडी सगळीकडं पुरली आहेत. मला माहीत असलेल्या जागेविषयी मला पुन्हा पुन्हा स्वप्न पडतं. एकेकाळी तिथं बान्या होता. तिथं कोपऱ्यात चांदीच्या पत्र्यानं मढवलेली एक पेटी पुरली आहे असं मला स्वप्न पडलं. तेवढ्यात मला जाग आली. तडक उठलो रात्रीचा आणि तिथं खणायला गेलो. हात-दीड हात खोल खणलं आणि काय सापडलं ठाऊक आहे? अर्धवट जळलेले कोळसे आणि कुत्र्याची कवटी! झालं! मी नेमक्या जागी पोहोचलो होतो! आणि अचानक खळाळ आवाज! खिडकी फुटली आणि कुणी एक मूर्ख बाई ठणाणा बोंबलायला लागली: 'चोर! चोर! धावा!' अर्थातच मला पळ काढावा लागला, नाही तर बेदम मार खावा लागला असता. मोठी गंमतीची गोष्ट!"

"मोठी गंमतीची गोष्ट" हे शब्द अनेकदा मी त्याच्या तोंडून ऐकत असे. पण इवान कूझमिच लूतोनिन हसत नसे. फक्त तो कपाळाला चुण्या पाडायचा, नाकपुड्या फुगवायचा आणि स्मित करताना डोळे किलकिले करतात तसे डोळे बारीक करायचा.

त्याच्या स्वप्नांमध्ये कल्पनारम्यता मुळीच नव्हती. वास्तवतेप्रमाणेच त्याची स्वप्नेही अत्यंत नीरसतेने आणि मूर्खपणाने भरलेली होती. त्या स्वप्नांचे वर्णन करताना त्याला एवढा आनंद कसा व्हायचा हेच मला समजत नव्हते. मात्र त्याच्या भोवतालच्या जीवनाविषयी बोलायला तो उत्सुक नसे.*

चहाचा व्यापार करणाऱ्या एका श्रीमंत माणसाच्या मुलीनं तिच्या मर्जीविरुद्ध तिचे लग्न लावण्यात आले म्हणून विवाहसमारंभानंतर तात्काळ

---

*एकोणीसाव्या शतकाच्या अखेरी एका पुराणवस्तुशास्त्रीय मासिकात मी वाचले होते की, लूतोनिन-कोरोवेकोवला चिस्तापोल्स्की ऊयेझ्दमध्ये अरबी नाण्यांचा हंडा सापडला होता: [गोर्कींची टिप]

गोळी झाडून आत्महत्या केली. सबंध शहरभर ह्या घटनेने मोठी खळबळ माजली. तिच्या अंत्ययात्रेमध्ये हजारो तरुण सामील झाले. तिच्या थडग्यापाशी विद्यार्थ्यांनी भाषणे केली. शेवटी पोलिसांनी त्यांना पांगविले. ह्या शोकांतिकेबद्दल आमच्या छोटचा दुकानात प्रत्येकजण तावातावाने बोलत होता. दुकानामागील खोलीत उत्तेजित विद्यार्थ्यांची दाटी झाली होती. संतापलेले आवाज, धारदार शब्द तेथून आमच्या तळघरापर्यंत ऐकू येत होते.

"तिला त्यांनी थोडा जास्त चोप द्यायला पाहिजे होता," लूतोनिन म्हणाला; आणि त्याच दमात त्याने मला पुढे सांगितले:

"मला स्वप्न पडलं की, कार्प मासा पकडण्यासाठी एका तळयात मी गळ टाकून बसलो होतो. तेवढ्यात एक पोलीस आला. 'ए, थांब! परवानगीशिवाय मासे कसे पकडतोस?' आणि मला पळायला रस्ताच राहिला नाही. म्हणून मी पाण्यात उडी टाकली आणि जागा झालो!"

प्रत्यक्षात तेथे जे काही घडत होते ते त्याच्या अवधानाच्या कक्षेच्या पलिकडे असले, तरी आमची बेकरी जरा वेगळीच असल्याचे लौकरच त्याच्या लक्षात आले. दुकानामध्ये गिऱ्हाईकांची सेवा बजावणाऱ्या मुली त्या कामाला लायक नव्हत्या. पुस्तके वाचणाऱ्या मुली ते काम करीत होत्या! एक होती बेकरी मालकाची बहीण आणि दुसरी होती तिची एक मैत्रीण–उंच आणि लाल लाल गालांची, प्रेमळ डोळ्यांची. विद्यार्थी दररोज येत. दुकानामागील खोलीत तासन्तास बसून मोठमोठ्यांदा किंवा कुजबुजत एकत्र चर्चा करीत. खुद्द मालक क्वचितच दिसायचा. आणि मी "पोऱ्या" असलो तरी प्रत्यक्षात मॅनेजरच्या भूमिकेत वावरत होतो.

"मालकाच्या तू नात्यातला आहेस काय?" लूतोनिनने विचारले. "किंवा तुला मेहुणा बनवून घ्यायचा त्याचा बेत आहे? नाही? मोठी गंमतीची गोष्ट! आणि हे विद्यार्थी कशाला इथं घोटाळत असतात? तरुण पोरींसाठी? हं!.. शक्य आहे. पण त्या तरुण पोरी दिसायला अगदीच सुमार आहेत. ते विद्यार्थी मला वाटतं पोरींना खूष करण्यापेक्षा स्वतःची पोटं भरायला येत असावेत."

जवळ जवळ दररोज सकाळी पाच किंवा सहा वाजता एक मुलगी बेकरीच्या खिडकीपाशी यायची. आखूड पायांची तिची आकृती कलिंगडांनी भरलेल्या पोत्यासारखी दिसायची. आमच्या खिडकीबाहेरच्या

चौकटीच्या कडेवर बसून आपले उघडे पाय हलवीत, जांभया देत देत ती हाका मारायची :

"वान्या ऽ!"

तिच्या डोक्यावर बांधलेल्या रंगीबेरंगी रुमालामधून तिच्या सोनेरी, कुरळ्या केसांच्या बटा कपाळाबाहेर डोकावीत. खेळण्यातील फुग्यांप्रमाणे दिसणाऱ्या तिच्या तांबूस गालांवर काही दाट कुरळ्या बटा रूळत. तिच्या झोपाळू डोळ्यांवर त्या बटा आडव्या येत आणि आपल्या छोट्या हातांनी आळसटपणे त्यांना ती बाजूला सारीत असे. त्यावेळी नवजात बालकाप्रमाणे तिच्या हाताच्या पसरलेल्या बोटांची गंमतीदार हालचाल होई. मला अनेकदा आश्चर्य वाटायचे : अशा मुलीबरोबर माणूस काय बोलत असेल? रोटीवाल्याला मी जागे केले म्हणजे तो तिला विचारायचा :

"तू आलीस?"

"हो. मी आल्येय."

"झोप चांगली झाली?"

"का होऊ नये?"

"काय स्वप्न पडलं?"

"मला आठवत नाही."

शहर अजून स्तब्ध झोपलेय. मात्र पूर्णतया नव्हे. चौकीदाराच्या झाडूचा घासणारा आवाज कुठेतरी ऐकू येत आहे. नुकत्याच जाग्या झालेल्या चिमण्या चिव चिव करू लागल्या आहेत. उगवत्या सूर्याचे प्रेमळ, ऊबदार किरण खिडक्यांच्या तावदानांवरील आपल्या प्रतिबिंबांना भेटण्यासाठी तिरपे कलले आहेत. दिवस नुकता सुरू होत असतो तेव्हाचे हे विचारमग्न क्षण मला खूप आवडतात. उघड्या खिडकीतून आपला केसाळ हात बाहेर काढून रोटीवाला त्या मुलीचे पाय पकडतो. त्याच्या ह्या कृतीला ती आक्षेप घेत नाही. ती त्याच्याकडे ढुंकून पहात नाही, तिच्या चेहऱ्यावर स्मिताची पुसट रेषासुद्धा नाही. आपल्या मेंढीसारख्या शून्य डोळ्यांची नुसती उघडझाप करीत राहते.

"पेश्कोव, त्या गोड वस्तू बाहेर काढ. वेळ झालीय!"

चुलाण्यामधून लोखंडी तवे मी बाहेर काढतो. बनपाव, सुरळ्या वगैरेंचे जवळ जवळ दहा एक नग रोटीवाला मुठीत पकडतो आणि त्या मुलीच्या ओच्यात टाकतो. एक गरम बनपाव ती सावधपणे ह्या

हातामधून त्या हातामध्ये खेळविते व आपले बकरीसारखे पिवळे दात त्याच्यात खुपसते. तिचे तोंड भाजते. ती अधीरपणे विव्हळते, कण्हते.

कामुक नजरेने तिच्याकडे पहात रोटीवाला म्हणतो :

"ए खटचाळ कारटे, आता झाक तुझे पाय!"

ती निघून गेल्यानंतर तो माझ्यापाशी बढाई मारतो :

"अगदी कोकरासारखी आहे. कुरळे कुरळे केस! पाहिलंस? बंधू, ह्या बाबतीत मी फार चोखंदळ आहे. मी बाई कधीही घेत नाही. फक्त पोरी. ही माझी तेरावी आहे. निकीफोरीचची मानलेली मुलगी!"

त्याचे हे बरळणे मी मुकाट ऐकून घेतो. पण मनात स्वतःला प्रश्न विचारतो :

"आणि मी? मीसुद्धा असंच जगणार काय?"

वजनावर विकण्याचे पांढरे मोठे पाव तयार होताच एका लांबट फळीवर दहा-बारा पाव मी ठेवायचा आणि देरेन्कोवच्या जुन्या दुकानाकडे लगबगीने घेऊन जायचा. ही फेरी संपली म्हणजे दोन पूड * वजनाच्या टोपलीत बनपाव आणि सुरळ्या मी भरायचा आणि धर्म प्रबोधिनीच्या दिशेने धूम ठोकायचा. तेथे विद्यार्थ्यांची न्याहरीची वेळ साधण्यासाठी माझी ही पळापळ व्हायची. प्रचंड भोजनगृहाच्या दाराच्या किंचित आतील अंगास उभे राहून मी "रोखीने" अथवा "उधारीवर" विद्यार्थ्यांना मालाची विक्री करायचा. त्यावेळी ल्येव तल्स्तोय यांच्या-विषयी होणारे त्यांचे वादविवाद मी अधीरेपणाने ऐकून घ्यायचा. प्रबोधिनीमधील गूसेव नांवाचे एक प्राध्यापक तल्स्तोय आणि त्यांची शिकवण यांचे कट्टर शत्रू होते. काहीवेळा माझ्या टोपलीत पावांखाली काही पुस्तके लपविलेली असत. एखाद-दुसऱ्या विद्यार्थ्याकडे त्यांना गुप-चुप देण्याची कामगिरी माझ्यावर असे. काहीवेळा विद्यार्थीही माझ्या टोपलीत हळूच पुस्तके अथवा टिपणे कोंबीत.

आठवड्यातून एकदा मी माझा माल आणखीही पुढे घेऊन जायचा. त्या इमारतीला "वेड्यांचे घर" म्हणत. मानसशास्त्रज्ञ बेख्तेरेव तेथे व्याख्याने देत आणि रुग्णांना दाखवीत. एक दिवस त्यांनी विद्यार्थ्यांना एक गौरवोन्मादाचा रोगी दाखविला. सभागृहाच्या दारामध्ये त्या रोग्याची उंच, कृश, इस्पितळाच्या पांढऱ्या अंगरख्यात झाकलेली आकृती

---

* १ पूड-१६ किलोग्राम

अवतरली, तेव्हा मला हसू दाबणे अवघड झाले. पण मला ओलांडून सभागृहात जात असताना तो एक क्षणभर थांबला आणि त्याने माझ्या चेहऱ्याकडे एक कटाक्ष टाकला. मी अंग चोरून मागे सरलो. जणू त्याची भेदक नजर—कोळशासारखी काळी, तरीही धगधगती—माझ्या काळजात खच्‌दिशी रुतली. आणि सबंध व्याख्यानभर बेख्तेरेव आपली दाढी कुरवाळीत त्या वेड्याबरोबर जरी अत्यंत आदरपूर्वक संभाषण करीत होते, तरी मी माझा चेहरा हातांनी सारखा खसाखसा चोळत राहिलो होतो. भाजून काढणारी धुळीची लाट माझ्या चेहऱ्यावर कुणीतरी फुंकली होती असे मला वाटत होते.

अगदी नीरस, सपाट आवाजात तो माणूस बेख्तेरेव यांच्यापाशी कसलीतरी मागणी करीत होता. आपल्या हडकुळ्या लांबोड्या हाताने त्याने काहीतरी डौलदार हालचाल केली तेव्हा त्याच्या अंगरख्याची बाही त्याच्या लांबसडक पातळ बोटांपासून मागे सरली. त्याची संपूर्ण आकृती अनैसर्गिकपणे ताणली गेली होती आणि त्याचा काळसर हात त्या सभा-गृहामधून लांब पसरत थेट माझ्या गळ्याशी येऊन भिडेल, असा मला भास होत होता. त्याच्या रोड चेहऱ्यावरील काळ्या खोबणींमध्ये बुडालेल्या काळ्या डोळ्यांच्या भेदक नजरेमधून धमकी आणि अधिकार यांची भावना चमकत होती. विचित्र टोपी घातलेल्या त्या माणसाकडे सुमारे वीस विद्यार्थी लक्षपूर्वक पहात होते. काही थोड्यांच्या चेहऱ्यांवर स्मित उमटले होते. पण बहुतेकजण गंभीर होते आणि व्याख्यान ऐकण्यात गढून गेले होते. त्या माणसाच्या धगधगत्या डोळ्यांपुढे त्या विद्यार्थ्यांचे डोळे अतिसामान्य भासत होते. तो माणूस सर्वांच्या काळजात धडकी भरवीत होता. त्याच्या एकूण वर्तनात एक दिमाख होता एवढे मात्र खरे!

विद्यार्थ्यांच्या त्या गंभीर शांततेमध्ये प्राध्यापकांचा आवाज स्पष्ट आणि खणखणीत घुमत होता. त्यांच्या प्रत्येक प्रश्नानंतर त्या बद्द आवाजाचा खालच्या बाजूने जोरदार गोंगाट ऐकू येत होता. मृतवत पांढऱ्या भिंतींमागून तो गलबला ऐकू येत होता असे वाटत होते. एखाद्या श्रेष्ठ धर्माधिकाऱ्याप्रमाणे त्या वेड्याच्या हालचाली मंद आणि भव्य होत्या.

त्या रात्री त्या वेड्यासंबंधी मी काही कविता खरडल्या. त्यात त्याला "सार्वभौमांचा सार्वभौम देवाचा मित्र आणि सल्लागार" म्हणून

मी संबोधिले होते. बराच काळपर्यंत तो माझ्या विचारांमध्ये रेंगाळत राहिला आणि आयुष्य त्यामुळे अधिक अवघड बनले.

संध्याकाळी सहापासून ते जवळ जवळ मध्यान्हीपर्यंत मी कामात गुंतलेला असायचा. त्यामुळे दुपारच्या प्रहरी झोपा काढायचा. वाचन करायला मला सवड सापडेना. कामाच्या धांदलीत मध्ये थोडा अवधी सापडेल तेवढाच. म्हणजे पिठाची एक परात मळून झाल्यानंतर दुसरी मळेपर्यंत व पाव भट्टीत भाजायला टाकल्यानंतर. धंद्यातील गुपिते जसजशी मी शिकू लागलो, तसतसा रोटीवाला कमी कमी कामे करू लागला. "कसे करायचे ते मला शिकविण्याच्या" बहाण्याखाली कामाचा सारा बोजा त्याने माझ्या खांद्यांवर टाकला. काहीशा स्नेहार्द चकित सुरात तो म्हणायचा :

"तुझ्यात कुवत आहे रे! वर्षा-दोन वर्षांत पट्टीचा रोटीवाला बनशील. मोठी गंमतीची गोष्ट! तुझ्यासारख्या कोवळ्या पोराला कोण आदर दाखवील? किंवा कामाला कोण बोलवील?"

पुस्तकांचे माझे वेड त्याला आवडत नव्हते.

"तुझं वाचणं थांबव आणि थोडी झोप घे," काळजीच्या सुरात तो मला सल्ला देई. पण मी वाचत असलेल्या पुस्तकांमध्ये काय होते याबद्दल त्याने मला कधीही विचारले नाही.

त्याच्या स्वप्नांमध्ये, दडविलेल्या खजिन्यांबाबतच्या त्याच्या अफाट कल्पनांमध्ये, त्याच्या आखूड पायवाल्या गाठोड्यासारख्या आकाराच्या पोरीमध्ये तो सतत गुरफटून गेलेला होता. ती पोरगी वारंवार रात्रीच्या वेळी येई आणि दरवाजाशी पिठाच्या पोत्यांजवळ तो तिला घेऊन जाई. किंवा थंडी असली तर कपाळाला चुण्या घालीत तो मला म्हणायचा :

"अर्ध्या तासापुरता बाहेर जा!"

आणि मी बाहेर निघून जायचा. हे प्रेम आणि पुस्तकांमध्ये वर्णन केलेले प्रेम, यांच्यामधील राक्षसी फरकाबद्दल विचार करीत रहायचा...

माझ्या मालकाची बहीण दुकानामागील छोट्या खोलीत रहात होती. तिच्यासाठी मी नियमितपणे समोवार तापवून द्यायचा, पण तिला भेटण्याचे शक्यतो टाळायचा. तिच्या संगतीत मला खूप अवघड वाटायचे. पहिल्या भेटींमध्ये ती माझ्याकडे ज्या असह्य नजरेने रोखून पहात होती, त्याच नजरेने अजूनही तिचे डोळे माझा पाठलाग करीत रहायचे. त्या

डोळयांमध्ये खोलवर एक स्मित दडलेले असावे असा मला संशय होता. माझा उपहास करणारे स्मित!

माझ्या प्रचंड शारीरिक ताकदीमुळे मी फार बेडौल दिसू लागलो होतो. पाच पूड वजनाचे पिठाचे पोते मी उचलून नेऊ लागलो म्हणजे रोटीवाला कळवळून म्हणत असे:

"तुझ्या अंगात तिघांचं बळ आहे. पण फक्त गबाळा आहेस! उंच टंगाळ्या आहेस एवढं सोडलं तर अगदी शुद्ध बैल!"

या दरम्यान मी बरेच वाचन केले होते. मला काव्याची आवड होती आणि मी स्वतः काही कविता खरडायला आरंभ केला होता. पण बोलण्यात मात्र पुस्तकातील शब्दप्रयोगांऐवजी "माझे स्वतःचे" शब्दच वापरणे मी चालू ठेवले. ते खूप बोजड आणि कठोर शब्द वाटत हे मला माहीत होते. पण माझ्या विचारांमधील प्रचंड गोंधळाला वाट मोकळी करून देणे फक्त त्यांनाच जमले असते, असे मला वाटायचे. काही वेळा, एखाद्या गोष्टीविरुद्ध मी मुद्दाम उद्धट बोलायचा. ती गोष्ट नेमकी कोणती ते मला सांगता येणार नाही; पण मला परकी वाटणाऱ्या, प्रक्षुब्ध वाटणाऱ्या गोष्टींविरुद्ध मी चिडून बोलायचा.

माझा एक अध्यापक – तो गणिताचा विद्यार्थी होता – याबद्दल नापसंती व्यक्त करीत मला म्हणाला:

"तुझं बोलणं अगदी महाभयंकर आहे बाबा! तुझ्या तोंडून शब्द बाहेर पडत नाहीत, लोखंडी वजनं बाहेर पडतात!"

बहुतेक किशोरवयीन मुलांना ज्या न्यूनगंडाने पछाडलेले असते त्याची बाधा मलाही झाली होती. मी अत्यंत मूर्ख आणि ओबडधोबड होतो, असे मला वाटायचे. माझ्याविषयी मी असमाधानी होतो. माझा चेहराही तसाच चमत्कारीक होता. एखाद्या काल्मीक राष्ट्रजमातीच्या माणसा-प्रमाणे माझ्या गालाची हाडे उंच पुढे आलेली होती आणि माझ्या आवाजावर माझा ताबा रहात नव्हता.

याउलट, माझ्या मालकाची बहीण एखाद्या उडत्या पाकोळीसारखी डौलाने भिरभिरायची. पण तिच्या गुबगुबीत, गोल, छोटया चणीला तिच्या जलद हालचाली शोभत नव्हत्या, असे मला वाटायचे. तिच्या हातवाऱ्यांमध्ये, तिच्या चालीमध्ये काहीतरी कृत्रिम जाणवायचे. मुद्दाम प्रयत्नपूर्वक ती तसे करीत होती असे वाटायचे. तिचा आवाज उल्हसित करणारा होता. ती सतत हसायची. पण तिचे खणखणीत हसणे ऐकले

म्हणजे मला वाटायचे की, मी प्रथम तिला ज्या अवस्थेत पाहिले होते ते मी विसरावे म्हणून केवळ ती प्रयत्न करीत होती. मला ते विसरण्याची इच्छा नव्हती. सर्वसामान्य गोष्टींपलिकडील प्रत्येक ठसा मी जपून ठेवला होता. असाधारण असे काही शक्य असते, ते प्रत्यक्ष अस्तित्वात असते, हे जाणून घेण्याची मला घाई झाली होती.

काहीवेळा ती विचारायची :

"काय वाचतोस ?"

मी तुटक उत्तर द्यायचा. तिला उलट प्रश्न विचारण्याची उत्कट इच्छा व्हायची :

"माझ्या वाचण्याशी तुला काय करायचंय ?"

एके रात्री रोटीवाला आपल्या प्रेयसीला कुरवाळता कुरवाळता अर्धवट नशेत मला म्हणाला :

"थोडा वेळ बाहेर जा. त्या मालकाच्या बहिणीशी खेळ करायला का जात नाहीस ? एवढी छान संधी वाया घालवतोस ! ते विद्यार्थी बघ . . ."

अशा प्रकारचे तो पुन्हा काही बोलला तर लोखंडी वजनाने मी त्याचे टाळके फोडीन, असे मी त्याला सांगितले. दारातील पिठाच्या पोत्यांवर मी बैठक मारली, तेव्हा अर्धवट लोंबकळत्या दारापलिकडून त्याचा आवाज ऐकू आला :

"मी एवढं चिडायचं कशाला ? दिवसभर पुस्तकात डोकं खुपसून बसलं म्हणजे असं होतं. माणूस वेड्यासारखा वागू लागतो."

दारात उंदीर खुडबुडत होते. त्यांची ची ची ऐकू येत होती. बेकरीमध्ये त्या मुलीच्या कण्हण्याचा आणि चीत्कारांचा आवाज येत होता. मी बाहेर आवारात गेलो. अजिबात आवाज न करता पावसाची सुरेख झिमझिम चालू होती. पण जळक्या वासाने भरलेली कुंद हवा त्यामुळे ताजी बनली नव्हती. कोठेतरी जंगलांमध्ये वणवा पेटला होता. मध्यरात्र केव्हाच उलटून गेली होती. बेकरीसमोरील घराच्या खिडक्या उघड्या होत्या. अर्धप्रकाशित खोल्यांमधून गाण्याच्या लकेरी तरंगत येत होत्या :

तेजोवलय सोनेरी,
संत वाल्मीच्या डोईवरी,
खूष होऊन भगतांवरी,
प्रसन्न वदने स्मित करी.

त्या रोटीवाल्याची पोरगी जशी त्याच्या मांडीवर पहुडलेली असायची तशी मारीया देरेन्कोवा माझ्या मांडीवर पहुडलेली आहे, अशी कल्पना करण्याचा मी प्रयत्न केला. पण ते सुतराम शक्य नव्हते असे मला जाणवले. तो विचारच धडकी भरवीत होता.

सूर्यास्त ते सूर्योदय काळात
संत दंग गाण्यात – प्याल्यात,
आणि... हं! नाहीतर गुंगतात
आपल्याच छंदा-फंदात!

इतर आवाजांमधून एक घनगंभीर, छानदार खर्ज आवाज चावट-पणे 'हं' वर रेंगाळत होता. खिडकीत डोकावून पाहण्यासाठी मी माझ्या गुडघ्यांवर हात ताणून पुढे झुकलो. विणलेल्या पडद्यामधून राखाडी रंगाच्या भिंती दिसल्या. एका छोटचा, निळया आच्छादनाच्या दिव्याने खोली उजळली होती. दिव्यासमोर, खिडकीकडे चेहरा करून एक मुलगी लिहीत बसली होती. आता तिने आपले डोके वर उचलले, आपल्या तांबडचा लेखणीच्या टोकाने कपाळावरील केसांची बट मागे सारली. तिचे डोळे अर्धवट मिटलेले होते, तिचा चेहरा स्मिताने उजळलेला होता. सावकाशपणे तिने पत्राला घडी घातली, लिफाफ्याच्या कडेवर जीभ फिरविली आणि तो बंद केला. नंतर तिने तो लिफाफा टेबलावर भिरकावला आणि तर्जनीने त्याला धमकाविले. तिची तर्जनी माझ्या करंगळीपेक्षा लहान होती. पण कपाळाला आठचा घालीत पुन्हा ते पत्र उचलले. लिफाफा फाडून ते पत्र संपूर्ण वाचून काढले, दुसऱ्या लिफा-फ्यात बंद केले आणि टेबलावर वाकून त्यावर पत्ता लिहिला. नंतर शरणागतीचा पांढरा झेंडा फडफडावा, तसा तिने तो लिफाफा वाळविण्यासाठी हवेत फडफडवला. आपल्या पायांच्या अंगठचांवर गिरक्या मारीत आणि हातांनी टाळया पिटीत नाचत नाचत ती माझ्या दृष्टीआड झाली व कोपऱ्यातील बिछान्याकडे गेली. ती परत माझ्या दृष्टीपथात आली तेव्हा तिने आपल्या अंगातील पोलके काढून टाकलेले होते, तिचे खांदे खूप गुबगुबीत आणि गोलसर होते. तिने टेबलावरून दिवा उचलला आणि ती पुन्हा कोपऱ्यात अदृश्य झाली. एखादी व्यक्ती जेव्हा पूर्णतया आपण एकटे आहोत असे समजते तेव्हा तिच्या नकळत तिला योगायोगाने पाहणाऱ्या माणसाला तिच्या सर्व कृती वेडचासारख्या

वाटण्याचा संभव असतो. मी आवारात येरझाऱ्या घालू लागलो आणि ती मुलगी खोलीत एकटी असताना घालवीत असलेल्या तिच्या विचित्र जीवनाबद्दल विचार करू लागली.

पण तांबूस-पिवळ्या केसांचा विद्यार्थी तिला भेटायला येत असे आणि जवळ जवळ कुजबुजत्या आवाजात काहीतरी बोलत बसत असे, तेव्हा ती अगदीच संकोचून जायची. नेहमीपेक्षा जास्त छोटी भासायची. त्याच्याकडे ती भित्र्या नजरेने पहायची आणि आपले हात स्वत:मागे अगर टेबलाखाली लपवायची. मला तो तांबूस-पिवळ्या केसांचा विद्यार्थी आवडत नव्हता. त्याच्याविषयी मला कमालीचा तिटकारा वाटे...

शालीमध्ये स्वत:ला गुरफटून घेतलेली रोटीवाल्याची पोरगी ठेचकाळत बाहेर आली आणि घोगऱ्या आवाजात मला म्हणाली:

"आत जा."

फळीवर पीठ ओतत रोटीवाल्याने आपल्या प्रेयसीची माझ्यापाशी तारीफ केली. रतिसुख देण्याच्या तिच्या असीम शक्तीचे कौतुक केले. मी मात्र स्वत:शी नवल करीत उभा होतो:

"मी कुठं चाललोय?"

आणि मला जाणवले की, जवळच कुठेतरी, पुढील कोपऱ्यापाशी, दुर्दैव माझी वाट पहात उभे होते.

बेकरी एवढी छान चालली होती की, देरेन्कोवने अधिक मोठी जागा शोधायला आरंभ केला होता. मदतीला आणखी एक माणूस घेण्याचेही त्याने ठरविले होते. ही गोष्ट चांगली होती. मी फार मोठा बोजा ओढत होतो आणि माझा जीव घुसमटेपर्यंत दमत होता.

"नव्या ठिकाणी तुला वरची जागा मिळेल," रोटीवाल्याने मला आश्वासन दिले. "तुला दहा रूबल महिना पगार करायला मी त्यांना सांगीन. ठीक आहे?"

वरिष्ठ मदतनीस म्हणून मी त्याला का हवा होतो ते मला चांगले ठाऊक होते. त्याला कामाचा तिटकारा होता. आणि मी आनंदाने काम करायचा. थकवा माझ्या दृष्टीने चांगला होता. त्यामुळे माझी मानसिक अस्वस्थता कमी व्हायची आणि सतत निर्माण होणाऱ्या लैंगिक इच्छांना आवर बसायचा. पण त्यापायी वाचन अशक्य ठरले.

"तुझी पुस्तकं टाकून दिलीस ते फार चांगलं केलंस," रोटीवाला म्हणाला. "पुस्तकं म्हणजे उंदरांचं खाद्य! दुसरा उपयोग काय त्यांचा?

पण तुला खरंच कधी स्वप्नं पडत नाहीत? अर्थात, तुला स्वप्नं पडत असलीच पाहिजेत. पण तू लपवतोस. मोठी गंमतीची गोष्ट. अरे, स्वप्नं सांगण्यात नुकसान काहीच नाही. त्यानं कुणाला दुखापत होत नाही."

तो माझ्याशी नेहमी मित्रत्वाने वागायचा. माझ्याविषयी त्याला खरोखरीच आदर वाटत होता, असे जाणवायचे. किंवा कदाचित भीतीही वाटत असावी, कारण आमच्या मालकाचा मी बगलबच्चा होतो असे त्याला वाटायचे. मात्र त्यामुळे पद्धतशीर चोरी करण्याचा उद्योग त्याने मुळीच थांबविला नाही.

माझी आजी वारली. तिच्या दफनानंतर सात आठवड्यांनी मला पत्र मिळाले. माझ्या एका मामेभावाने तिच्या मृत्यूची बातमी देणारे ते पत्र पाठविले होते. व्याकरणचिन्हांचा गंध नसलेल्या त्या छोट्या चिटोऱ्यात लिहिले होते की, भीक मागत असताना माझी आजी चर्चच्या पोर्चमधून खाली पडली होती आणि तिचा पाय मोडला होता. त्यानंतर आठ दिवसांनी तिचा पाय सडू लागला. पुढे काही काळानंतर मला समजले की, माझे तीन तरुण आणि धट्टेकट्टे मामेभाऊ व त्यांची मुले, माझ्या आजीने गोळा करून आणलेल्या भिकेवर जगत होती. डॉक्टरला बोलावून आजीवर उपचार करण्याची अक्कल त्यांच्यापाशी नव्हती.

माझ्या मामेभावाने लिहिले होते:

"पीटर आणि पॉल चर्चच्या आवारात आपले सगळे नातेवाईक जिथं पुरले आहेत तिथंच आम्ही तिला पुरलं आम्ही तिच्या दफनाला गेलो होतो आणि तिच्यावर प्रेम करणारे सगळे भिकारीही जमले होते. तेसुद्धा रडले. आजोबासुद्धा रडले त्यांनी आम्हाला तिथून पळवून लावलं. आणि तिच्या थडग्यापाशी ते एकटेच उभे राहिले. आम्ही झुडुपांमागून त्यांना बघत होतो ते रडत होते तेसुद्धा लौकरच मरतील."

मी रडलो नाही. पण मला आठवते की, जणू बर्फाळ वाऱ्याने मला लपेटून टाकले होते. त्या रात्री आवारांमधील लाकडांच्या ढिगावर मी बसलो होतो तेव्हा आजीविषयी कुणापाशी तरी बोलण्याची मला तीव्र इच्छा झाली होती. ती किती दयाळू आणि शहाणी होती, सर्वांशी मातेच्या ममतेने कशी वागायची, हे सांगावेसे वाटत होते. खूप वेळ-पर्यंत ह्या इच्छेचे ओझे मी अंतःकरणात बाळगले. पण अशा गोष्टी बोलता येण्यासारखे तेथे कुणीच नव्हते. शेवटी ती इच्छा असमाधानाने आपोआपच जळून गेली.

त्यानंतर अनेक वर्षांनी, आन्तोन पावलोविच चेखोव यांनी लिहिलेली एक सुरेख सत्यकथा मी वाचली. त्या कथेत बग्गीवाला आपल्या मुलाच्या मृत्यूबद्दल आपल्या घोड्याला सांगतो. त्यावेळी मला माझ्या आजीच्या मृत्यूनंतरच्या दिवसांची पुन्हा तीव्रतेने आठवण झाली. अतीव दुःखाच्या त्या काळात माझ्यापाशी बोलायला एखादा घोडा किंवा कुत्रा नव्हता याचा मला अतीव खेद झाला. उंदरांशी बोलून आपले दुःख हलके करण्याचे मला सुचले नाही, याची खंत वाटली. बेकरीमध्ये पुष्कळ उंदीर होते आणि त्यांच्याशी माझी चांगली मैत्री होती.

एखाद्या शिकारी हिंस्त्र पक्ष्याप्रमाणे निकीफोरीच पोलीस माझ्या-भोवती घिरट्या घालू लागला. तो धिप्पाड, कणखर बांध्याचा म्हातारा होता. त्याचे रुपेरी केस आखूड कापलेले होते. त्याची रुंद दाढी नेहमी व्यवस्थित कातरलेली आणि विंचरलेली असे. नाताळमध्ये कापण्यासाठी एखादा हंस जसा खाऊ घालून खूप लठ्ठ करून ठेवावा, तशा नजरेने तो मला न्याहाळायचा.

"तुला वाचायचा खूप नाद आहे असं मी ऐकलं," तो संभाषण सुरू करायचा. "तुला कोणत्या प्रकारची पुस्तकं आवडतात? बायबल? किंवा संतांची चरित्रे?"

"होय. मला बायबल माहीत होते आणि दैनंदिन धडे सुद्धा ठाऊक होते." निकीफोरीचला ह्या गोष्टीचे आश्चर्य वाटायचे आणि त्याचा काहीसा गोंधळ उडायचा.

"हं. एकूण हे वाचन कायदेशीर आहे. आणि त्या काऊंट तल्स्तोयचं लिखाण कधी वाचलंस का?"

तल्स्तोयही मी वाचला होता. पण पोलीसाला ज्या पुस्तकांविषयी उत्सुकता होती ती पुस्तके मी वाचलेली नव्हती असे आढळून यायचे.

"बस्स, हीच पुस्तकं वाचलीस. ती तर सर्वसामान्य लेखकांसारखीच आहेत. पण त्याची आणखीही काही पुस्तकं आहेत. लोक खूप चर्चा करतात त्यांची. त्यात म्हणे त्यानं पाद्रयांवर टीका केलीय. ती पुस्तकं जरूर वाचली पाहिजेत!"

तो "दुसरा मसाला" सुद्धा मी वाचला होता. हेक्टोग्राफ प्रतींमधून. पण मला ती पुस्तके नीरस वाटली होती आणि पोलीसाशी चर्चा करण्याचा तो विषय नव्हता हे मला ठाऊक होते.

रस्त्यांमध्ये अशा काही त्रोटक संभाषणांनंतर, आपल्या घरी येण्याची निमंत्रणे द्यायला म्हातान्याने सुरुवात केली.

"माझ्या चौकीत ये. आपण थोडा चहा पिऊ."

तो कशाच्या मागे होता हे अर्थातच मला समजले होते. तरीही मला जावेसे वाटत होते. माझ्या उपदेशकांचा मी सल्ला घेतला. पोलीसाच्या आतिथ्याला टाळले तर बेकरीविरुद्धचे त्याचे संशय जास्तच बळावतील, असे सर्वांचे मत पडले.

तर मी निकीफोरीचच्या चौकीला भेट दिली. त्या सखल छोटया खोलीचा एक-तृतीयांश भाग रशियन चुलाण्याने व्यापला होता. दुसऱ्या एक-तृतीयांश भागात सुती पडद्यांमागे एक मोठा दुहेरी पलंग होता. त्यावर लालभडक आवरणाच्या उशांची प्रचंड उतरंड रचलेली होती. उरलेल्या भागात एक कपाट, एक मेज, दोन खुर्च्या व एका छोटया खिडकीशी एक लाकडी बाकडे होते. निकीफोरीच त्या बाकड्यावर बसला होता. आपल्या गणवेषाच्या जाकीटाची बटणे त्याने मोकळी टाकली होती. त्याच्या पाठीमुळे संपूर्ण खिडकी झाकली गेली होती. मी त्याच्या समोरच टेबलापलिकडे बसलो होतो. त्याच्या बायकोच्या शेजारी. भरदार वक्षस्थळांची, तांबूस गालांची, सुमारे विशीमधली ती तरुणी होती. तिच्या डोळ्यात एक मिस्कील आणि उपहासाची झाक होती. पाटीच्या दगडासारखा तिच्या डोळ्यांचा विचित्र करडा रंग होता. आपल्या रसरशीत ओठांना ती लहरीपणाने सारखी मुरड घालीत होती. तिच्या आवाजामधून दुष्टाव्याची शुष्क झाक जाणवत होती:

"मला असं समजलंय," पोलीस म्हणाला, "की माझी धर्माची मुलगी सेक्लेतेया तुझ्या बेकरीभोवती घोटाळत असते. कारटी चवचाल आणि दुष्ट आहे. सगळ्याच बायका दुष्ट असतात."

"सगळ्या?" त्याच्या बायकोने विचारले.

"अगदी प्रत्येक बाई!" निकीफोरीचने प्रत्येक शब्दावर जोर देत प्रत्युत्तर केले. द्वाड घोडा खोगीर चढविल्यानंतर जशी खळखळ करतो, तशी निकीफोरीचने आपल्या पदकांची खळखळ केली. बशीमधील चहाचा भुरका मारून समाधानाच्या आवाजात तो पुन्हा म्हणाला:

"दुष्ट आणि बदचाल असतात बायका! अगदी रस्त्यावरच्या रांडेपासून ते राजांच्या राण्यांपर्यंत! शेबा राणीनं दोन हजार वेर्स्ती वाळवटं तुडवलं ते राजा सालोमनशी व्यभिचार करण्यासाठी! आणि

आमची झारीना येकातेरीनासुद्धा... माणसं तिला "महान" वगैरे म्हणूं देत, पण..."

आणि मग त्याने राजवाड्यामधील एका सामान्य नोकराची कहाणी सांगितली. त्याने झारीनाबरोबर एक रात्र घालविल्यानंतर साध्या सार्जंट-पदापासून तो सेनापतीपदापर्यंत कसा चढत गेला त्याची कहाणी मिटक्या मारीत सांगितली. निकीफोरीचची बायको आपल्या नवऱ्याचे बोलणे लक्षपूर्वक ऐकत जिभल्या चाटत होती व त्याच वेळी टेबलाखाली माझ्या पायाला आपला पाय घासत होती. निकीफोरीच अत्यंत संथपणे, रक्षण-कर्त्याच्या भूमिकेतून बोलत होता. पण अगदी नकळतपणे त्याने संभा-षणाचा ओघ एकदम नव्या विषयाकडे वळविला.

"आता उदाहरणादाखल सांगायचं तर आमच्या रस्त्यावर एक विद्यार्थी आहे. विद्यापीठात पहिल्या वर्षात शिकतोय. त्याचं नांव प्लेतन्योव..."

त्याची बायको मध्येच उसासा टाकीत आसावलेपणाने उद्‌गारली:

"दिसायला चांगला नाही, पण छान आहे!"

"कोण छान आहे?"

"श्रीयुत प्लेतन्योव!"

"पहिली गोष्ट म्हणजे त्याला "श्रीयुत" म्हणू नकोस. त्याचं शिक्षण पुरं झालं म्हणजे तो "श्रीयुत" होईल. तोपर्यंत तो इतर कुठल्याही सर्वसामान्य विद्यार्थ्यांप्रमाणं एक विद्यार्थी आहे. तसे हजारो विद्यार्थी आहेत. आणि दुसरी गोष्ट—छान आहे म्हणजे काय म्हणायचंय तुला?"

"तो गंमत्या आहे. तरुण आहे."

"पहिली गोष्ट म्हणजे सर्कशीतला विदूषकसुद्धा गंमत्या असतो."

"विदूषकांना गंमत्ये राहण्याबद्दल पैसे देतात."

"चूप रहा! आणि दुसरी गोष्ट म्हणजे कुत्र्याचं पिल्लूसुद्धा लहानपणी गोंडस दिसतं!"

"विदूषक म्हणजे नुसती माकडं!"

"चूप रहा! तुला आठवत नसेल, तर पुन्हा एकदा सांगतो! ऐकलंस?"

"मी तुमचं ऐकतेय!"

"ठीक, तर..."

आणि बायकोला नरम करून निकीफोरीच पुन्हा माझ्याकडे वळला.

"तर मी काय म्हणत होतो—हा प्लेतन्योव मोठा स्वारस्यपूर्ण आहे. तू त्याच्याशी जरूर ओळख करून घे."

प्लेतन्योवला आणि मला निकीफोरीचने एकत्र पाहिले असल्याचा संभव होता हे जाणून मी म्हणालो:

"त्याची माझी ओळख आहे."

"असं? हं..."

त्याच्या स्वरात निराशा होती. अचानक त्याने बाकावर बसल्या बसल्या चुळबुळ केली. त्याची पदके खळखळली. मी खूपच सावध बसलो होतो. हेक्टोग्राफ यंत्रावर कुठलीतरी पत्रके प्लेतन्योव छापत असतो हे मला ठाऊक होते.

निकीफोरीचची बायको टेबलाखाली माझ्या पायाला पाय चिकटवून म्हाताऱ्याला चिडवीत होती. तो दिमाखात बोलत होता. मोराने आपला पिसारा फुलवावा त्याप्रमाणे स्वतःजवळील शब्दभांडार तो माझ्यापुढे उधळीत होता. पण त्याच्या बायकोच्या टेबलाखालील खोडचांमुळे मला त्याचे बोलणे लक्षपूर्वक ऐकणे जमत नव्हते. त्याने पुन्हा विषय बदलला तो क्षण माझ्या अवधानातून हुकला. आवाज खाली आणून आणि स्वराला वजन देऊन तो बोलू लागला.

"एक अदृश्य धागा—समजलास?" तो म्हणाला आणि आपल्या विस्फारलेल्या बटबटीत डोळयांनी माझ्या चेहऱ्याकडे टक लावून पाहू लागला. अचानक भीतीचा भाव त्याच्या नजरेत होता.

"सम्राटांना जर एक कोळी समजलं..."

"अय्या! हे काय भलतंच बोलता आहात?" त्याची बायको ओरडली.

"ए मूर्खे, तू जीभ आवर! अर्थ स्पष्ट व्हावा म्हणून तसं बोललो रांडे! निंदा करण्याच्या हेतूनं नव्हे! उचल इथला समोवार!"

भुवया आकुंचित करून आणि डोळे किलकिले करून त्याने ऐटीत आपले बोलणे पुढे चालू केले:

"एक अदृश्य धागा—कोळयाच्या जाळयासारखा! हा धागा येतो महाराजाधिराज, झार तिसरे अलेक्सांदर, सर्व रशियाचे सम्राट इ. इ. च्या अंतःकरणामधून. पुढं महाराजांच्या मंत्र्यांमार्फत, राजमान्य राज्यपालांमार्फत, खालच्या सर्व अधिकाऱ्यांमार्फत सरळ माझ्यापर्यंत

येतो, सैन्यातल्या अगदी सामान्य सैनिकापर्यंत पोहोचतो. तो धागा प्रत्येक गोष्टीपर्यंत पोहोचतो. प्रत्येक गोष्टीभोवती त्याचे वेढे पडतात. आणि त्या अदृश्य बळामार्फत झारचा अंमल शतकानुशतकं चालत आलाय. फक्त त्या धूर्त इंग्लिश राणीनं पोलिश लोकांना, यहुद्यांना आणि काही रशियनांना लाच चारली. म्हणून हा धागा जिथं तोडता येईल तिथं तोडायचा ते प्रयत्न करतात. पण लोकांच्या हितासाठी आपण तसं करतो असा उगीचच आव आणतात!"

माझ्या दिशेने तो टेबलावर ओणवा झाला आणि दबत्या, पण कडक आवाजात तो म्हणाला:

"समजलं? ठीक आहे! अशा पद्धतीनं मी तुझ्याशी का बोलतो असं वाटतं तुला? तुझा रोटीवाला तुझं कौतुक करतो, हुषार पोरगा आहे म्हणतो. तू प्रामाणिक आहेस आणि स्वकष्टानं जगतोस, असं म्हणतो. तुझ्या त्या बेकरीत हे विद्यार्थी घुटमळत असतात. सबंध रात्रभर देरेन्कोवाच्या खोलीत असतात. एखादाच तिथं असता तर समजण्यासारखं आहे. पण बरेच जण तिथं असतात. याचा अर्थ काय? आँ? विद्यार्थ्यां-विरुद्ध मी काहीही बोलत नाही. आजचा विद्यार्थी उद्या साहाय्यक प्रॉसीक्यूटर होऊ शकतो. विद्यार्थी–ते ठीकच आहेत. पण आयुष्यात प्रवेश करायची त्यांना फार घाई होते आणि झारचे शत्रू त्यांचा फायदा उचलतात! समजलं? आणखी तुला मी एक सांगतो..."

पण त्याने मला काही सांगण्यापूर्वीच धाडदिशी दार सताड उघडले गेले. एक म्हातारा आत आला. छोट्या चणीचा आणि लाल नाकाचा. त्याने आपले आखूड कुरळे केस कपाळावर एक चामडी वादी बांधून मागे धरले होते. त्याच्या हातात वोदकाची बाटली होती आणि अर्थातच त्याच्या पोटातही थोडी वोदका होती.

"बुद्धिबळाचा डाव टाकणार?" त्याने दिमाखात विचारले आणि पाठोपाठ विनोदी म्हणींची आतषबाजी केली.

"माझे सासरेबुवा," निकीफोरीच दुर्मुखलेपणाने म्हणाला. त्याला चीड आलेली स्पष्ट दिसत होती.

लौकरच मी त्यांची रजा घेतली. त्याच्या चावट बायकोने मला दाराशी निरोप देताना चिमटा घेतला आणि ती म्हणाली:

"ते ढग बघ! आग लागल्यासारखे लालभडक दिसताहेत!"

आकाश निरभ्र होते. फक्त एक सोनेरी छटेचा छोटासा ढग तरंगत होता.

माझ्या शिक्षकांचा अनादर करण्याची माझी मुळीच इच्छा नाही. पण मला कबूल केले पाहिजे की, सरकारी यंत्रणेचे अधिक ठळक आणि तपशीलवार चित्र त्यांच्यापेक्षा त्या पोलीसाने माझ्यापुढे उभे केले. कुठेतरी एक कोळी लटकत होता; आणि त्या कोळ्यापासून जीवनाच्या प्रत्येक अंगाला गुरफटून टाकणारे "अदृश्य धागे" निघत होते. लौकरच मला त्यांच्या चिवट वेढ्यांची सर्वत्र जाणीव होऊ लागली.

त्या दिवशी सायंकाळी दुकान बंद झाल्यानंतर उशीराच्या सुमाराला मारीया देरेन्कोवाने मला आपल्या खोलीत बोलाविले. तिने चटकन आणि थोडक्यात मला सांगितले की, माझे पोलीसाबरोबर झालेले संभाषण मी तिला ऐकवावे. इतरांनी ती कामगिरी तिच्यावर सोपविली होती.

मी संपूर्ण अहवाल दिला तेव्हा तिच्या तोंडून उद्‌गार बाहेर पडला: "अरे देवा!" एखाद्या पिंजऱ्यात सापडलेल्या उंदराप्रमाणे ती खोलीमध्ये अस्वस्थपणे येरझाऱ्या घालू लागली. निराशेने मानेला झटके देऊ लागली. "पण – रोटीवाल्याला तुझा कधी संशय आला? त्याची ती रखेली – ती त्या निकीफोरीचची कुणी नातेवाईक आहे ना? त्याचा आपल्याला काटा काढला पाहिजे."

दारात उभा राहून मी उदास मुद्रेने तिला न्याहाळत होतो. तिने "रखेली" हा शब्द अगदी सहजपणे उच्चारला होता. मला ते आवडले नव्हते. तसेच, रोटीवाल्याला कामावरून काढून टाकण्याचा तिचा निर्णयही मला आवडला नव्हता.

"पाहिलंस, तू खूप सावध आहेस," ती म्हणाली. आणि तिच्या टक लावण्यामुळे नेहमीप्रमाणे मी अस्वस्थ झालो. तिची नजर माझ्यापाशी कसलीतरी विचारणा करीत होती असे मला वाटायचे. पण ती कसली विचारणा हे मात्र समजत नव्हते. आता ती माझ्यासमोरच उभी राहिली. आपले हात तिने आपल्या पाठीशी धरले होते.

"तू नेहमी उदास का असतोस?"

"थोड्याच दिवसांपूर्वी माझी आजी वारली."

ह्या बातमीचे तिला नवल वाटलेले दिसले. स्मित करीत तिने विचारले:

"तिचा तुला खूप लळा होता?"

"होय. आणखी आपणाला काही विचारायचंय?"

"नाही."

मी तिथून निघून गेलो. मला आठवते की त्या रात्री मी लिहिलेल्या कवितांमध्ये एक हट्टी ओळ होती :

जसा दिसावास असं वाटतं तसा तू नाहीस!

विद्यार्थ्यांनी बेकरीपासून शक्यतो दूर रहावे असे ठरले. आता त्यांच्या क्वचित भेटी घडू लागल्या. त्यामुळे मी वाचलेल्या पुस्तकांमधील संदिग्ध गोष्टींचा खुलासा विचारण्याची संधीच मला मिळेनाशी झाली. मी वहीमध्ये माझे प्रश्न लिहून ठेवू लागलो. पण एक दिवस खूप दमलो असता, माझी वही तशीच उघडी ठेवून मी झोपलो आणि रोटीवाल्याने माझी टिपणे वाचली. त्याने मला जागे करून विचारले :

"हे तू काय नेहमी खरडत असतोस? 'गॅरीबाल्डीनं राजाला का हाकून लावलं नाही?' हा कोण गॅरीबाल्डी? राजाला हाकून लावणं शक्य आहे का?"

रागाने त्याने माझी वही पिठाच्या पेटीवर भिरकावून दिली आणि त्याने तोंड फिरविले. चुलाण्याजवळून तो माझ्यावर खेकसला :

"हुं! एखाद्याच्या इच्छेखातर राजाला म्हणे हाकून लावला पाहिजे! गंमतीची गोष्ट! असल्या विचारांना डोक्यातून काढून टाक. चार-पाच वर्षांपूर्वी सारातोवमध्ये तुझ्यासारख्या पुस्तकातल्या किड्यांची गुप्त पोलीस चांगली हजामपट्टी करीत होते. त्या निकीफोरीचशिवाय आधीच तुझ्यावर त्यांचा डोळा आहे. तुझ्या राजांना विसर! त्यांचा पाठलाग करायला ते काही कबूतरं नाहीत!"

तो चांगल्या हेतूने बोलत होता. पण मला हव्या त्या पद्धतीने मी त्याला उत्तर देऊ शकत नव्हतो. "धोक्याच्या विषयांवर" रोटीवाल्याशी बोलायला मला मनाई करण्यात आली होती.

एक सनसनाटी पुस्तक शहरात हस्ते-परहस्ते फिरत होते. सर्वत्र लोक ते वाचत होते आणि त्यावर कडाक्याने भांडत होते. पशुवैद्यकाचा अभ्यास करणाऱ्या लावरोवकडे मी त्या पुस्तकाची मागणी केली. पण तो निराशेने म्हणाला :

"नाही रे मित्रा! ती गोष्ट शक्य नाही. पण मला माहीत असलेल्या एका ठिकाणी त्याचं वाचन होणार असल्याचं नुकतंच समजलंय. बहुधा त्या तिथं मी तुला घेऊन जाईन."

गृहीत दिनाच्या मध्यरात्री गडद अंधारामधून आरस्कोये पोले

ओलांडीत लावरोवच्या अंधुक आकृती पाठोपाठ सुमारे पन्नास पावले अंतरावरून मी चाललो होतो. मैदान पूर्ण ओस होते. तरीही, लावरोवच्या सल्ल्यानुसार मी काही "सावधगिऱ्या" बाळगल्या होत्या. एखाद्या झिंगलेल्या कामगाराप्रमाणे शीळ घालीत, गाणी गात, अधूनमधून ठेचकाळीत मी चालत होतो. चिंध्या झालेले काळे मेघ डोक्यावरून सुस्तपणे सरकत चालले होते. चंद्राचा सोनेरी चेंडू त्यांच्यामधून गडगडत जात होता. मैदानावर ढगांच्या तिरप्या सावल्या पडत होत्या, प्रत्येक डबक्यात रुपेरी आणि पोलादी चमक उमटवीत होता. माझ्या पाठीशी शहरचा संतापी गोंगाट ऐकू येत होता.

माझा मार्गदर्शक धर्म प्रबोधिनीच्या पलिकडे कोठेतरी फळबागेच्या कुंपणापाशी थांबला. मी घाईने त्याला गाठले. गुपचुपपणे आम्ही कुंपणावर चढलो आणि तण वाढलेल्या, दुर्लक्ष केलेल्या फळबागेतून पुढे जाऊ लागलो. झाडांच्या खाली वाकलेल्या फांद्या आमच्या अंगांना घासत होत्या व त्यासरशी दंवाचे जड थेंब आमच्यावर शिडकावा करीत होते. आम्ही एका घरापाशी पोहोचलो. आणि एका बंद खिडकीच्या तावदानावर हलकेच टिचक्या वाजविल्या. खिडकीची फळी उघडली. एक दाढीवाला चेहरा बाहेर डोकावला. त्याच्यामागे – नुसता अंधार.

"कोण आहे?"

"याकोवचे मित्र."

"वर चढा."

त्या अभेद्य अंधारामध्येही मला इतर लोकांचे अस्तित्व जाणवले. कपड्यांची सळसळ आणि पावलांची चाळवाचाळव ऐकू येत होती. एक किंचित खोकणे व नंतर दबत्या आवाजातील संभाषण मी ऐकले. एक काडी पेटली आणि तिने माझा चेहरा उजळून टाकला. भिंतीशेजारी काळ्या आकृती मला ओझरत्या दिसल्या.

"सगळेजण आले?"

"हो."

"खिडकीत काहीतरी आडोसा टांगा, म्हणजे बाहेर उजेड जाणार नाही."

एका खणखणीत आवाजाने रागाने विचारले:

"ओसाड घरात जमायची कुणाची ही बुद्धिमान कल्पना?"

"एवढ्या मोठ्यांदा ओरडू नको."

दूर कोनाड्यात कुणीतरी एक छोटा दिवा पेटविला. खोली रिकामी होती. तिच्यात फर्निचर नव्हते. दोन खोक्यांवर आडव्या ठेवलेल्या एका फळीवर पाच माणसे ओळीने बसली होती. कुंपणावर बसणाऱ्या डोमकावळ्यांसारखी. टोक वर वळलेल्या दुसऱ्या एका खोक्याने दिव्याला आधार दिला होता. भिंतीलगत आणखी तीन माणसे खालीच बसली होती. खिडकीच्या चौकटीत एका लांब केसवाल्या, अत्यंत लुकड्या आणि फिकट तरुणाने बैठक मारली होती. हा तरुण आणि तो दाढी-वाला सोडून तेथे हजर असलेला प्रत्येकजण माझ्या परिचयाचा होता. दाढीवाल्याने खोल खर्जात जाहीर केले की, गिओर्गी प्लेखानोव ह्या "नरोदनाया वोल्या* च्या माजी अनुयायाची" 'आमचे मतभेद' नांवाची पुस्तिका तो वाचून दाखविणार होता.

भिंतीलगतच्या सावल्यांमधून कुणीतरी रेकत म्हणाला:

"आम्हाला ते सारं माहीत आहे!"

सर्व काव्यामध्ये सर्वांत रोमांचकारी अशा गूढ वातावरणामुळे निर्माण होणारी आल्हादक उत्तेजकता मला जाणवली. एखादा निष्ठावंत भक्त आपल्या देवाच्या मंदिरात पहाटेच्या पूजेला जातो तेव्हा त्याला जसे वाटत असावे तसे मला वाटत होते. मला आदि काळामधील गुंफा आणि ख्रिश्चनधर्मीय आठवले. तो घनगंभीर आवाज उमटत होता, प्रत्येक शब्द स्पष्ट उच्चारीत सर्व खोली भरून टाकीत होता.

पुन्हा कुणीतरी कोपऱ्यामधून कुरबुरले:

"छी:! फालतू गोष्टी!"

त्या कोपऱ्यातील आकृतींच्या वरती त्या अंधारामधून गूढपणे तांबे मंदपणे चमकत होते. मला ते पाहून रोमन योद्ध्याच्या शिरस्त्राणाची आठवण येत होती. पण थोड्या वेळाने माझ्या लक्षात आले की, चुला-ण्यातील विस्तव मंद करण्याच्या दांड्याची ती मूठ असावी.

खोलीमध्ये खालच्या सुरांमधील आवाज उमटत होते. हळूहळू त्यांचे गरमागरम वादाच्या गोंधळात रूपांतर झाले आणि कुणा एका वक्त्याचा आवाज ओळखणे अशक्य ठरले. तेवढ्यात खिडकीच्या चौकटीमधून, थेट माझ्या डोक्यावरून, कुणीतरी मोठ्या आवाजात उपरोधिक पृच्छा केली:

---

* रशियन क्रांती-चळवळीतील दहशतवादी संघटना — सं.

"आपण ती पुस्तिका वाचणार आहोत किंवा नाही?"

तो फिकट चेहऱ्याचा, लांब केसवाला तरुण बोलला होता. आवाज विरले आणि पुन्हा एकदा फक्त वाचकाचा घनगंभीर खर्ज आवाज ऐकू येऊ लागला. सिगारेटींचे झुरके मारले म्हणजे त्यांची जळती टोके क्षणभर लालभडक चमकत. अधूनमधून एखादी काडी फर्ररदिशी पेटायची व विचारमग्न चेहरे उजळून काढायची. त्या चेहऱ्यांवरील डोळे चिंतनामुळे किलकिले झालेले असत अथवा विस्फारलेले आणि टक लावलेले असत.

वाचन एवढ्या प्रदीर्घ वेळपर्यंत चालले की, ऐकण्याचा मला कंटाळा आला. मात्र पटणाऱ्या विचारांना साधेपणाने आणि सहजपणाने मांडणारे ते तीक्ष्ण, प्रक्षोभक शब्द मला आवडले होते.

मग अचानकपणे, अनपेक्षितपणे, वाचणारा थांबला. तात्काळ सबंध खोली संतापाच्या उद्‌गारांनी भरून गेली:

"विश्वासघातकी!"

"पोकळ दंगा!"

"आमच्या वीरांच्या रक्ताच्या शिंपणाला कलंक लावणारा!"

"गेनेरालोव, उल्यानोव यांचे वध झाल्यानंतर..."

आणि पुन्हा एकदा खिडकीच्या चौकटीमधून त्या तरुणाने विचारले:

"सद्‌गृहस्थहो! शिव्याशाप थांबवून आपण गंभीर चर्चा केली तर चालणार नाही का?"

मला युक्तिवाद आवडत नसत. त्यांना समजून घेणे मला ठाऊक नव्हते. उत्तेजित विचारांच्या स्वच्छंदी भराऱ्यांबरोबर जुळवून घेणे जड जाई. आणि वाद घालणाऱ्यांच्या नागव्या गर्वाची मला नेहमी चीड येई.

खिडकीच्या चौकटीतील तो तरुण पुढे झुकून मला म्हणाला:

"तू पेश्कोव ना? बेकरीतला? मी फेदोसेयेव. आपण दोघांनी एकमेकांची ओळख करून घेतली पाहिजे. हे बघ, आता इथं आपल्यासाठी काही काम उरलेलं नाही. हा गोंगाट पुढं कित्येक तासपर्यंत चालू राहील आणि त्यातून निष्पन्न काहीच होणार नाही. आपण इथून बाहेर पडू या का?"

फेदोसेयेवबद्दल मी याआधीच ऐकले होते. गंभीर प्रकृतीच्या तरुणांचे एक मंडळ त्याने स्थापन केलेले होते. त्याच्या खोल डोळ्यांकडे, त्याच्या फिकट, घाबरट चेहऱ्याकडे मी आकर्षित झालो होतो.

मैदानामधून आम्ही बरोबर चालत होतो तेव्हा त्याने माझ्या आयुष्याविषयी चौकशी केली ; कामकरी लोकांमध्ये माझ्या ओळखी होत्या का, कोणती पुस्तके मी वाचली होती, मला कितीसा मोकळा वेळ होता, वगैरे प्रश्न त्याने विचारले. इतर गप्पागोष्टींमध्ये तो म्हणाला :

"तुझ्या बेकरीबद्दल मी ऐकलंय. मूर्खपणात तू वेळ घालवावास याचं मला फार आश्चर्य वाटतं. तुला त्यात काय आढळतं?"

गेले काही दिवस मला स्वतःलाच जाणवू लागले होते की, माझ्या उपयोगाचे तेथे काहीही नव्हते. तसे मी त्याला बोललो तेव्हा तो खूप खूष झाला. निरोपाच्या वेळी त्याने मनःपूर्वक माझा हात हलविला आणि प्रसन्न, तेजस्वी स्मित केले. एक-दोन दिवसात तो शहर सोडून जाणार होता व सुमारे तीन आठवडे बाहेर राहणार होता, असे त्याने मला सांगितले. तो परत आल्यानंतर आम्ही कुठे आणि कसे भेटायचे हे तो मला कळविणार होता.

बेकरीचा धंदा खरोखरीच उत्तम चालला होता. पण दर दिवसागणिक माझे आयुष्य मात्र जास्त जास्त अवघड बनत चालले होते. आम्ही नव्या जागेत गेलो होतो आणि माझी कामे अधिकच वाढली होती. बेकरीत काम करण्याव्यतिरिक्त मला काही खाजगी घरांमध्ये बनपाव आणि सुरळ्या पोहोचत्या कराव्या लागत. शिवाय प्रबोधिनीमध्ये आणि "खानदान मुलींच्या" शाळेत जाऊन मालाची विक्री करावी लागे. माझ्या टोपलीतून बनपाव उचलून घेता घेता ह्या तरुण मुली हळूच चिठ्ठ्या टोपलीत सरकवीत. आणि आश्चर्य म्हणजे अनेकदा चांगल्या सुबक कागदावर त्यांनी कमालीचे निर्लज्ज शब्द बालिश अक्षरात खरडलेले मला आढळत. ह्या नितळ डोळ्यांच्या, निरागस तरुणींचा तांडा माझ्या टोपलीभोवती गोळा होई तेव्हा मला मोठे विचित्र वाटे. आनंदी बडबड करीत, चेहरे वेडेवाकडी करीत, आपल्या छोट्या गुलाबी तळव्यांमध्ये बनपाव उलटसुलट करून त्या निरखीत. मी त्यांना पहात उभा राही तेव्हा मनात नवल करीत असे की, तशा अश्लील, घाणेरड्या शब्दांमध्ये त्यांच्यापैकी कुणी मला धाडसी चिठ्ठ्या लिहिल्या असाव्यात? कदाचित त्या शब्दांचा खरा अर्थही त्यांना माहीत नसावा. आणि गलिच्छ "विसाव्याच्या घराची" आठवण होऊन मी स्वतःलाच प्रश्न करायचा :

"तशा अड्ड्यांमधून ह्या जागेपर्यंतही "अदृश्य धागा" पोहोचतो काय?"

भरदार स्तनांच्या, किंचित काळपट वर्णाच्या आणि पाठीवर काळ्या केसांची जाड वेणी सोडलेल्या एका तरुणीने एक दिवस हॉलमध्ये मला अडविले व घाईघाईने ती कुजबुजली:

"हे पत्र मी सांगत्ये तिथं नेऊन दिलंस तर मी तुला दहा कोपेक देईन."

तिच्या मृदु, काळया डोळयांमध्ये अश्रू दाटले होते. तिने आपला ओठ चावला. तिचा चेहरा आणि तिचे कान कमालीचे लाल झाले होते. मी स्त्रीदाक्षिण्याचा आव आणून दहा कोपेक नाकारले, पण तिची चिठ्ठी नेऊन पोहोचवली. तो एक कृश, उंच विद्यार्थी होता. त्याच्या गालांवर क्षयबाधेची लाली होती. वरिष्ठ न्यायालयामधील एका जज्जाचा तो मुलगा होता. काही न बोलता विमनस्कपणे तांब्याची नाणी मोजीत त्याने मला पन्नास कोपेक देऊ केले. जेव्हा मी त्याला पैसे नको म्हटले तेव्हा त्याला ती नाणी स्वत:च्या खिशात परत कोंबणे भाग पडले. पण त्याचा हात एवढा थरथर कापत होता की, ती नाणी खळाळदिशी खाली फरशीवर पडली.

खोलीभर ती नाणी घरंगळत जात असताना शून्य नजरेने त्यांना तो पहात राहिला. बोटांच्या सांध्याची हाडे कडाकडा वाजेपर्यंत त्याने आपले हात चोळले. मग एक दीर्घ उसासा टाकून तो पुटपुटला:

"मग आता काय करायचं? ठीक आहे अच्छा! मला विचार केला पाहिजे..."

त्याच्या विचारांमधून काय निष्पन्न झाले ते मला ठाऊक नाही. पण त्या तरुणीविषयी मला खूप वाईट वाटले. लौकरच ती नाहीशी झाली. त्यानंतर सुमारे पंधरा वर्षांनी पुन्हा तिची-माझी गाठ पडली तेव्हा क्रिमियातील एका शाळेत ती शिक्षिका होती. तिला क्षयाची बाधा झाली होती. आयुष्याने जिव्हारी घाव घातल्यामुळे जगातील प्रत्येक गोष्टीविषयी ती निष्ठुर दुष्टाव्याने बोलत होती.

माल पोहोचता करण्याचे काम संपवून नंतर मी थोडी झोप काढायचा. मग मध्यरात्रीला दुकानात गोडा माल तयार देण्यासाठी संध्याकाळी बेकरीत काम करायचा. कारण आता आमची जागा शहरातील थिएटरा-पाशी होती व नाटक संपल्यानंतर गरम गरम बनपाव खाण्यासाठी माणसे

येत. ते काम संपले म्हणजे सकाळच्या पावासाठी आणि सुरळ्यांसाठी मी पीठ मळायचा. आणि नुसत्या हातांनी पंधरा-वीस पूड पीठ मळायचे म्हणजे काही पोरखेळ नव्हता.

त्यानंतर पुन्हा दोन-तीन तास मी झोपू शके. मग नव्या दिवसाचा माल पोहोचता करायला माझी स्वारी बाहेर पडायची.

असे दिवसामागून दिवसपर्यंत चालले होते.

मला जे "शहाणपणाचे, योग्य, चिरंतन" वाटत होते त्याची बीजे पेरण्याच्या अदम्य इच्छेने हा सारा काळ मला झपाटले होते. चार लोकात मिळून मिसळून राहण्याचा माझा स्वभाव होता. उत्तम निवेदनशैली मला अवगत होती. वैयक्तिक अनुभवामधून आणि पुस्तकां-मधून, अशा दोन्ही बाजूंनी माझ्या कल्पनाशक्तीला चालना मिळत होती. अत्यंत छोट्या, सर्वसामान्य घटनेमधून मी मनोरंजक कथा बनवू शकत असे. "अदृश्य धाग्याचे" वेढे तिच्याभोवती गुंफू शकत असे. क्रेस्तो-वनिकोव आणि अलाफूझोव गिरण्यातील काही कामगार माझ्या ओळखीचे झाले होते. निकीता रूबत्सोव नांवाच्या एका म्हाताऱ्या विणकराकडे मी विशेष आकृष्ट झालो होतो. हा हुषार, अस्वस्थ आत्मा या ना त्या वेळेला रशियामधील जवळ जवळ प्रत्येक कापड गिरणीत काम करून आलेला होता.

"अरे माझ्या अलेक्सेई, माक्सीमिचा, माझ्या छोट्या काटेरी फुला, माझ्या नव्या कोऱ्या धोट्या, ह्या धरतीवर मी पन्नासावर सात वर्षं चालतोय," आपल्या घुसमटल्या आवाजात तो म्हणायचा. त्याच्या राखी रंगाच्या डोळ्यांमध्ये स्मित असायचे. काळ्या चष्म्यामागील त्याचे डोळे सदैव दुखरे असत. तांब्याच्या तारेने तो चष्मा त्याने कसाबसा अडकवलेला असे. त्याच्या नाकाच्या हाडावर आणि कानामागे चष्म्याच्या तारांच्या गंजाचे हिरवे पट्टे उमटलेले होते. बरोबरीच्या कामगारांमध्ये रूबत्सोवला "जर्मन" या नांवाने ओळखत, कारण त्याने आपले कल्ले छाटले होते, खालच्या ओठाखाली पांढऱ्या आखूड केसांचा एक दाट झुपका व कडक मिशी यांना राखले होते. त्याची छाती रुंद होती, उंची मध्यम होती. त्याच्या व्यक्तिमत्वामधून उल्हास प्रकट व्हायचा.

"मला सर्कस आवडते," स्वतःच्या डाव्या खांद्याला आपली टक्कलवाली, टेंगळांची कवटी टेकवीत तो म्हणायचा. "त्या घोड्यांना ते कसं काय शिकवतात? सरतेशेवटी जनावरं ती! निव्वळ पशू!

पण मी त्यांना मानतो! आणि मनाशी विचार करतो: माणसांनासुद्धा शिकवण्याच्या, त्यांनी आपले मेंदू कसे वापरावे त्याच्या तऱ्हा असल्या पाहिजेत. जनावरांना साखर चारून सर्कसवाले त्यांना आपलंसं करतात. आम्ही अर्थात वाण्याकडं स्वतःच साखर विकत घेऊ शकतो. आम्हाला वेगळ्या प्रकारच्या साखरेची गरज आहे–आत्म्यासाठी! आणि त्या साखरेचं नांव आहे–दयाळूपणा! तेव्हा तरुण मित्रा, दंडुक्याच्या मदतीनं नव्हे तर दयाळूपणानं गोष्टी साध्य कराव्या. पण आपल्या जगात अजून दंडुक्याचाच जास्त वापर होतो. होय की नाही?"

पण तो स्वतः मात्र दयाळूपणाने वागत नव्हता. लोकांशी उपहासाने, किंचित तिरस्काराने बोलण्याची त्याला सवय होती. वादविवाद घालताना त्रोटक, मर्मी टोमणे तो मारीत असे. प्रतिपक्षाचा अपमान करण्याचा त्यामागे त्याचा खास हेतू असायचा. त्याच्याशी माझी पहिली भेट झाली बीयर बारमध्ये. तेथील लोकांना त्याने खूपच डिवचले होते व सारेजण त्याला झोडपून काढण्याच्या मनःस्थितीत होते. एक-दोन दणके त्याला बसलेही होते. पण मी मध्यस्थी केली आणि त्याला तेथून बाहेर काढले.

"त्यांनी तुम्हाला खूप दुखापत केली का?" अंधारातून चालत आम्ही जात असताना मी त्याला विचारले. शरदामधील पावसाची झिमझिम चालू होती.

"मला दुखापत? ती कशी करायची ते त्यांना ठाऊक नाही!" बेफिकीरपणे तो उत्तरला.

आमच्या ओळखीचा आरंभ असा झाला होता. प्रथम प्रथम अत्यंत चातुर्याने आणि कुशलपणे त्याने माझी खूप थट्टा उडविली. पण "अदृश्य धागा" आमच्या आयुष्यांमध्ये कोणती भूमिका बजावीत होता याबद्दल मी त्याच्यापाशी तपशीलवार बोललो तेव्हा तो विचारमग्न होत उद्‌गारला:

"अरेच्चा! तसा तू मूर्ख नाहीस! छेः छेः! तू ज्या पद्धतीनं बोललास त्यावरून तू खुळा वाटत नाहीस!"

त्यानंतर तो माझ्याकडे पितृतुल्य वात्सल्याने पाहू लागला. माझ्या वडिलांच्या नांवासकट माझ्या संपूर्ण नांवाने हाक मारायलाही त्याने सुरुवात केली.

"माझ्या अलेक्सेई, माक्सीमिचा, तुझे विचार अगदी योग्य आहेत.

ते विचार बरोबर आहेत, पण कुणीही तुझ्यावर विश्वास ठेवणार नाही. त्यांचा काही उपयोग नाही."

"पण तुमचा तर माझ्यावर विश्वास बसतो ना?"

"मी काय रे, मी एक भटका कुत्रा! आणि शेपूटतुटका! पण बहुतेक लोक – ते घरचे पाळीव कुत्रे असतात, चांगला गुरगुर आवाज करत शेपट्या ताठ करून असतात! बायका, मुलं, दाग-दागिने, गाडी-घोडे! आणि त्यांच्यापैकी प्रत्येक कुत्रा आपल्या खुराड्याला जपतो. ते तुझ्यावर मुळीच विश्वास ठेवणार नाहीत. एकदा मोरोझोव गिरणीत आमचं काही काम होतं. जे मुसंडी मारून पुढं घुसले त्यांच्या टाळक्यांवर मार बसला. आणि तुमचं टाळकं म्हणजे तुमचा पुठ्ठा नव्हे! झालेली जखम लौकर विसरत नाही."

क्रेस्तोवनिकोव गिरणीत काम करणारा फिटर याकोव शापोश्नीकोव याच्याशी ओळख झाल्यानंतर रूबत्सोवची बोलण्याची तऱ्हा काहीशी बदलली. क्षयी याकोव, उत्तम गिटारवादक आणि बायबलपंडित याकोव, ज्या आवेशाने देवाचे अस्तित्व नाकारीत असे ते पाहून रूबत्सोव चकित झाला होता. फुफ्फुसामधील मृत मज्जातंतूंचे रक्तमाखले तुकडे थुंकीत याकोव अधीरपणे, आवेशाने युक्तिवाद करायचा:

"पहिली गोष्ट म्हणजे मी "देवाची प्रतिमा नव्हे आणि देवासारखा" घडलेलो नाही. तसं मुळीच काही नाही. बुद्धी? मला कसल्याही गोष्टीचा गंध नाही. सामर्थ्य? मला काहीही करता येत नाही. भलेपणा? मी भलाही नाही. छे: मुळीच नाही! दुसरी गोष्ट: आयुष्य माझ्याशी किती कठोरपणानं वागतंय हे एक तर देवाला माहीत नाही किंवा त्याला माहीत आहे, पण मला तो मदत करू शकत नाही; किंवा तो मला मदत करू शकेल, पण तसं करण्याची त्याची इच्छा नाही. तिसरी गोष्ट: देव सर्वबुद्धिमान नाही, सर्वशक्तिमान नाही, सर्वदयाळू नाही. तो मुळी अस्तित्वातच नाही. त्याच्याविषयी सगळा बनाव रचलेला आहे, सारं संपूर्ण खोटं आहे, आपलं सगळं आयुष्यच खोटं आहे. पण ते मला बनवू शकणार नाहीत!"

रूबत्सोव एवढा स्तंभित झाला होता की, आरंभी त्याच्या तोंडून शब्दच फुटेना. मग मात्र रागाने त्याचा चेहरा पांढराफरक पडला आणि त्याने त्वेषाने शिव्याशाप मोजायला सुरुवात केली. पण याकोवने बायबलमधील वचने म्हणून दाखविली. त्या पवित्र शब्दांपुढे रूबत्सोव

हतबल ठरला. मान खाली घालून शांतपणे विचार करणे त्याला भाग पडले.

ह्या लाखोल्या वाहात असताना शापोश्नीकोव फार भयानक वाटत असे. त्याचे रेखीव अवयव काळसर वर्णाचे होते. त्याचे केस जिप्सीं-प्रमाणे काळे आणि कुरळे होते. त्याचे निळसर ओठ मागे सरले म्हणजे त्याचे चमकणारे, लांडग्यासारखे दात दिसत. त्याचे काळे डोळे त्याच्या प्रतिस्पर्ध्याच्या डोळयांमध्ये तीक्ष्णपणे टक लावीत. त्याची ती जळती नजर त्याच्या प्रतिस्पर्ध्याला असह्य करी. त्याचे ते डोळे गौरवोन्मादाची बाधा झालेल्या वेडयाची मला आठवण करून देत.

याकोवकडून आल्यानंतर रूबत्सोव उदासपणे म्हणाला:

"माझ्यापाशी देवाविरुद्ध आजपर्यंत कुणीही कधीही बोललं नव्हतं. अनेक गोष्टी मी ऐकल्यात, पण असं कधीही ऐकलं नाही. अर्थात हा माणूस फारसा जगणार नाही. ही शरमेची बाब आहे! अगदी लालबुंद तापेपर्यंत त्यानं स्वतःला दमवून घेतलंय... बंधू, यात गंमत आहे, खरंच गंमत आहे."

याकोवचा त्याला फार चटकन जिव्हाळा लागला. त्या क्षयी फिटरच्या बोलण्यामुळे त्याला एक नवी उत्तेजना मिळाली. अंतर्यामीच्या उमाळयांमुळे तो आपले सुजरे डोळे सारखा चोळत राही.

"अस्सं–ऽऽ–तर!" तो हसून म्हणायचा. "म्हणजे देवाचा निकाल लागला, आँ? हं! आता झारबद्दल म्हणशील तर मला स्वतःला काही सांगायचंय: झारचा मला त्रास नाही. हे त्रास ह्या झारांकडून होत नाहीत, ते मालकांकडून होतात. कुठल्याही झारबरोबर माझं पटेल –अगदी 'क्रूर इवान'* बरोबरसुद्धा! बापडया झार, तुला सुख होत असेल तर खुशाल तुझ्या सिंहासनावर बैस आणि सत्ता गाजव! मात्र, माझ्या मालकाशी मी कसं वागायचं ते मला ठरवू दे! तसं करू दिलंस तर सोन्याच्या साखळयांनी त्या सिंहासनाला मी तुला बांधून ठेवीन. तुझी पूजा करीन!"

'भूक राजा' वाचल्यानंतर तो म्हणाला:

"अर्थात हे सारं खरं आहे."

शिळाछापावरील पुस्तिका पाहताच प्रथम त्याने विचारले होते:

---

*इवान ग्रोझ्नी – १६ व्या शतकातील क्रूर झार.

"कुणी लिहून दिलं तुला? किती सुंदर आणि स्पष्ट. माझ्या वतीनं त्यांचे आभार मान."

रूबत्सोवला ज्ञानाची अखंड तहान लागलेली होती. शापोश्नीकोवच्या हादरवून टाकणाऱ्या पाखंडी गोष्टींचा धागा तो उत्सुकतेने कान टवकारून ऐकत असे. आणि पुस्तकांविषयी मी बोलू लागलो म्हणजे तासन् तास ऐकत बसे. अशा वेळी आनंदाने डोक्याला मागे झटका देत खळाळून हसत तो उद्गारत असे:

"माणसाचं मन ही एक हुषार चीज आहे! खरंच हुषार!"

त्याच्या सुजऱ्या डोळयांमुळे वाचन करणे त्याला अवघड झाले होते. पण तरीही अनेक गोष्टी त्याला ठाऊक होत्या व अनेकवेळा अनपेक्षित माहिती सांगून तो मला चकित करायचा.

"जर्मनांमध्ये एक सुतार आहे. फार फार हुषार. त्याचा सल्ला घेण्यासाठी खुद्द राजा त्याला बोलावून घेतो."

काही प्रश्न विचारल्यानंतर माझ्या लक्षात आले की, बेबेल त्याला अभिप्रेत होता.

"त्याच्याबद्दल तुम्हाला कसं समजलं?"

"समजलं," आपली टेंगळांची कवटी खाजवीत मितभाषीपणे तो उत्तरला.

जीवनाच्या कष्टमय धांदलीत आणि गोंधळात शापोश्नीकोवला स्वारस्य नव्हते. देवाचे स्तोम नष्ट करण्यात आणि पाद्रयांची विटंबना करण्यात तो संपूर्ण मग्न होता. संन्याशांविषयी त्याला सर्वांत जास्त तिटकारा होता.

एक दिवस रूबत्सोवने गोडीत विचारले:

"याकोव, देवाविरुद्ध ओरडा करण्यापलिकडं दुसरं काहीच का करत नाहीस?"

त्यावर कधी नाही एवढ्या कडवटपणे तो ओरडला:

"माझ्या वाटेत आणखी दुसरं काय आडवं येतंय? दुसरं काय? जवळ जवळ वीस वर्षं मी त्याच्यावर श्रद्धा ठेवली, त्याची भीती मनात बाळगून जगलो. सारं सहन केलं, कारण प्रश्न विचारायला परवानगी नव्हती. सर्व काही वरून निश्चित झालेलं! साखळयांच्या बंधनात मी आयुष्य काढलं. आणि मग बायबल काळजीपूर्वक वाचलं. अन् माझ्या लक्षात आलं की, हा सारा बनाव रचलाय! निकीता, हा सारा बनावट मामला आहे!"

जणू "अदृश्य धागा" तोडून टाकण्यासाठी म्हणून त्याने हाताची जोरदार हालचाल केली. अश्रुभरल्या डोळ्यांनी तो पुढे म्हणाला:

"आणि त्या सर्व गोष्टींपायी मी आता अकाली मरतोय!"

माझ्या ओळखीचे असे इतर अनेक लोक होते. ते सगळे स्वारस्यपूर्ण होते. अनेकदा माझ्या पूर्वीच्या साथीदारांना भेटण्यासाठी मी सेम्योनोव बेकरीत डोकावीत असे. मला पाहताच त्यांना नेहमी आनंद होई आणि मी कशाबद्दल बोलतो ते ऐकायची उत्सुकता असे. पण रूबत्सोव ॲडमिराल्टी रस्त्यावर रहायचा आणि काबानपलिकडील तातार वस्तीत शापोश्नीकोव रहायचा. म्हणजे एकापासून दुसऱ्याकडे जाण्यासाठी पाच वेर्स्ता अंतर तुडवावे लागे. त्यामुळे त्यांना भेटणे क्वचितच शक्य होई. आणि त्यांनी माझ्या भेटीला येण्याचा प्रश्नच नव्हता, कारण त्यांचा पाहुणचार करायला माझी स्वतःची अशी जागाच नव्हती. शिवाय नवा रोटीवाला—सैन्यातून मुक्त झालेला सैनिक—गुप्त हेरांशी संधान बाळगून होता. आमच्या आवाराची सीमा गुप्तहेरांच्या मुख्य कचेरीच्या पिछाडीला टेकलेली होती. त्यामुळे भारदस्त "निळे कोट" वाले कुंपणावर चढून आमच्याकडे येत आणि त्यांच्या कर्नल गान्गार्दतसाठी ताज्या पावाच्या सुरळ्या व स्वतःसाठी काळा पाव घेऊन जात. मी स्वतःला "उजेडात आणू नये" आणि आमच्या बेकरीकडे कुणाचे अनावश्यक लक्ष वेधू नये, अशी मला ताकीद देण्यात आली होती.

माझ्या कामामागील सर्व उद्देश नष्ट होत होता, असे मला दिसत होते. व्यावहारिक विचार न करता माणसे गल्ल्यामधून अधिकाधिक मुक्तपणे पैशांची उचल करीत होती. ही स्वैरता एवढी वाढली होती की, पिठाची बिले भागविण्यासाठीसुद्धा पैसे शिल्लक नसत. वाकडे तोंड करून हसत, आपली दाढी खेचत देरेन्कोव म्हणायचा:

"आपलं दिवाळं निघणार!"

त्याचेसुद्धा आयुष्य अवघड झाले होते. कुरळ्या केसांची नास्त्या गरोदर होती आणि चिडलेल्या मांजरीप्रमाणे त्याच्यावर फिस्कारीत होती. साऱ्या जगाला आरोपी म्हणून धरल्यासारखे तिचे हिरवे डोळे सर्वत्र चिडून पहात होते.

आंद्रेईच्या अंगावर ती सरळ चालत जायची, जणू त्याला न पाहिल्याप्रमाणे! मग तोच अपराधी हसून तिच्या वाटेतून दूर व्हायचा. मग तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहून उसासा टाकायचा.

काहीवेळा तो माझ्यापाशी तक्रार करायचा :

"एकूण सगळाच पोरकटपणा चाललाय. प्रत्येकजण हाताशी मिळेल ते खेचतोय. काय अर्थ आहे त्यात? मी माझ्यासाठी मोज्यांच्या सहा जोड्या विकत आणल्या होत्या—आणि आणल्या त्याच दिवशी त्या सर्व गायब झाल्या!"

ती मोज्यांची कहाणी विनोदी होती. पण मी हसलो नाही. हा नि:स्वार्थी, निगर्वी माणूस त्याचा उपयुक्त उद्योग चालू ठेवण्यासाठी किती धडपडत होता ते मी पहात होतो. आणि त्याच्या भोवतालची माणसे त्याच्या उद्योगाला किती तुच्छतेने पहात होती, किती अविचारीपणाने तो नष्ट करीत होती, हेही मी पहात होतो. देरेन्कोव ज्यांची सेवा करीत होता, त्यांच्याकडून कृतज्ञतेची मुळीच अपेक्षा करीत नव्हता. पण त्याला त्यांच्याकडून जी वागणूक मिळत होती ती योग्य नव्हती. अधिक मित्रत्वाने, अधिक समजूतदारपणे त्या लोकांनी त्याच्याशी वागायला हवे होते. त्याच्या कुटुंबाची वेगाने धूळधाण होत चालली होती. धार्मिक भीतींनी ग्रासलेले त्याचे वडील एकलकोंडे बनले होते. धाकट्या भावाला बाई-बाटलीचा नाद लागला होता. बहीण परक्यासारखी वागत होती. तांबूस-पिवळट केसांच्या विद्यार्थ्याबरोबर तिचे अपयशी प्रेमप्रकरण चालू होते असे दिसत होते. रडून रडून तिचे डोळे सुजलेले असल्याचे अनेकदा माझ्या लक्षात येई. त्या विद्यार्थ्याचा मला तिटकारा वाटू लागला.

मारीया देरेन्कोवाच्या मी प्रेमात होतो असे मला वाटत होते. आमच्या दुकानात मदत करणाऱ्या नदेज्दा श्चेर्बातोवाच्याही मी प्रेमात होतो. गुबगुबीत अंगाची, लाल गालांची आणि रसरशीत ओठांची ती मुलगी नेहमी प्रेमळ स्मित करायची. एकूण मी प्रेमविव्हल अवस्थेतच वावरत होतो. माझे वय, माझा स्वभाव, माझे विस्कटलेले आयुष्य— ह्या सर्व गोष्टींमुळे स्त्रीच्या सहवासाची आत्यंतिक गरज निर्माण झाली होती. ही गरज अकाली लौकर निर्माण झालेली नव्हती, तर उलट उशीरा आली होती. स्त्रीच्या स्नेहाची, किमानपक्षी स्त्रीच्या सहानुभूती-पूर्ण मैत्रीची मला गरज होती. कोणताही आडपडदा न ठेवता माझ्या-विषयी मी मोकळेपणी बोलू शकेन असे मला कुणीतरी हवे होते. माझ्या मनात निर्माण झालेला असंबद्ध विचारांचा गुंता सोडविण्यास, विविध ठशांचा गोंधळ निस्तरण्यास, कुणीतरी मला मदत करणे आवश्यक होते.

मला जवळचे मित्र नव्हते. "संस्करण करण्यासाठी कच्चा माल"

म्हणून माझ्याकडे पाहणाऱ्या लोकांकडे मी आकर्षित होत नव्हतो. किंवा तेही मला फारसे विश्वासात घेत नव्हते. त्यांच्याच स्वारस्याच्या विशिष्ट विषयांपलिकडे मी बोलण्याचा प्रयत्न केला, तर ते तुटकपणे मला सल्ला देत:

"ते राहूं दे तूर्त बाजूला!"

गूरीय प्लेतन्योवला अटक झाली आणि त्याला बोटीमधून सेंट पीटर्सबुर्गच्या 'क्रेस्ती' कारागृहात पाठविण्यात आले. भल्या सकाळच्या प्रहरी रस्त्यात भेटलेल्या निकीफोरीचने मला ही बातमी सांगितली. आपली सर्व पदके छातीवर लटकावून सावकाश चालीने फूटपाथवरून तो माझ्या दिशेने येत होता. जणू काही कवायतीच्या मैदानावरून परतल्यासारखा त्याचा थाट होता. पोलीस विचारात गढलेला दिसला. आम्ही एकमेकांना सामोरे आलो तसे त्याने अभिवादनादाखल हात उचलून आपल्या टोपीला किंचित स्पर्श केला आणि एकही शब्द न बोलता तो पुढे निघाला. पण माझ्या माघारी थोड्याच अंतरावर तो थांबला आणि रुक्ष आवाजात म्हणाला:

"काल रात्री गूरीय अलेक्सांद्रोविचला अटक झाली."

त्याने रस्त्यावर एक वर-खाली कटाक्ष टाकला आणि निराशेने हात झटकीत खालच्या आवाजात तो म्हणाला: "बिचाऱ्या पोराचा आता सत्यानाश झाला!"

त्याच्या धूर्त डोळ्याच्या कोपऱ्यात अश्रुप्रमाणे काहीतरी चमकल्याचा मला भास झाला. मला ठाऊक होते की, प्लेतन्योव त्याच्या अटकेची अपेक्षा धरून होता. त्याने त्याबद्दल मला आधीच इशारा दिला होता व त्याच्यापासून दूर रहायला सांगितले होते. त्याचप्रमाणे रूबत्सोवलाही इशारा द्यायला मला सांगितले होते, कारण माझ्याप्रमाणेच तोसुद्धा रूबत्सोवशी खूप जीव लावून होता.

जमिनीवर डोळे लावून ढिल्या आवाजात निकीफोरीचने विचारले:

"तू माझ्याकडं कधी चक्कर का टाकत नाहीस?"

त्या संध्याकाळी मी त्याच्या चौकीत गेलो. तो झोपून नुकताच उठला होता. बिछान्यावरच बसूनक्वास* पीत होता. त्याची बायको खिडकीशी बसून त्याची फाटकी विजार शिवत होती.

---

*काळा पाव आंबवून तयार केलेले एक रशियन थंड पेय.—अनु.

"तर असं आहे," आपल्या छातीवरील केसांचे दाट जंजाळ कराकरा खाजवीत तो म्हणाला. काहीशा अपेक्षेने माझ्याकडे त्याने दृष्टिक्षेप टाकला. "ते त्याला घेऊन गेले. सम्राटाविरुद्ध पत्रकं छापण्यासाठी त्यानं तयार केलेल्या शाईचं भांडं मिळालं."

फरशीवर तो थुंकला आणि बायकोला गुरकावून म्हणाला:

"इकडं दे ती विजार!"

"आत्ता एका मिनिटात देते," डोके वर न उचलताच ती उत्तरली.

"त्याच्याबद्दल हिला वाईट वाटतंय," आपल्या बायकोकडे नजरेनेच खूण करीत म्हातारा मला म्हणाला. "सगळा दिवस रडतेय. हं, आता मलाही वाईट वाटतंय. पण-सम्राटाच्या सत्तेविरुद्ध एक विद्यार्थी काय करणार?"

कपडे अंगात चढवून तो म्हणाला:

"मी आत्ता परत येतो... अगं ए! समोवार गरम कर!"

खिडकीबाहेर टक लावून पहात त्याची बायको ढिम्म बसून राहिली. पण त्याने आपल्या माघारी दार बंद करताच वेगाने ती वळली आणि आपल्या हाताच्या मुठीला तिने रागारागाने हलविले. दात विचकून कडवट दुष्टाव्याने ती पुटपुटली:

"म्हातारा सैतान कुठला!"

रडून रडून तिचा चेहरा सुजला होता. तिचा डावा डोळा काळा-निळा पडला होता व जवळ जवळ मिटला होता. उठून ती चुलाण्यापाशी गेली. समोवारवर ओणवे होत ती संतापाने अस्पष्ट आवाजात म्हणाली:

"तरीसुद्धा अजूनही मी त्याला फसवीन! अशी फसवीन की, आख्खी रात्र लांडग्यासारखा विव्हळत बसेल! त्याच्यावर विश्वास ठेवू नकोस! त्याच्या एकाही शब्दावर तू विश्वास ठेवू नकोस! तुला पकडण्याचा तो प्रयत्न करतोय. त्याचं सगळं बोलणं अगदी खोटं आहे. त्याला कुणाबद्दलही कधीही वाईट वाटत नाही. तो शिकारीसाठी गळ टाकून बसलाय. तुझ्याबद्दल त्याला सारं माहीत आहे. माणसांची शिकार करूनच तर तो जगतो!"

ती माझ्या अगदी जवळ आली आणि एखाद्या भिकाऱ्याने भीक मागावी तशा अजीजीच्या सुरात मला म्हणाली:

"माझ्याशी तू चांगलं वागू शकत नाहीस का?"

ही बाई मला अप्रिय वाटायची. पण तिच्या माझ्याकडे वळलेल्या

एका डोळ्यात एवढी विलक्षण यातना प्रकटली होती, की न राहवून मी तिच्या अंगाभोवती हात टाकला आणि तिच्या विस्कटल्या केसांना कुरवाळू लागलो. तिचे केस खरबरीत आणि मेणचट होते.

"आता तो कुणाच्या पाठलागावर आहे?"

"रीब्नोऱ्यादस्कायावरच्या लॉजमध्ये राहणाऱ्या काही माणसांच्या!"

"काय नांव?"

स्मित करीत ती उत्तरली:

"आणि समज, तू काय विचारतोस ते मी त्याला सांगितलं तर? अरे, तो आलाच वाटतं! .. बिचाऱ्या गूरीयला ह्यानंच पकडून दिलं!"

आणि माझ्यापासून झटकन दूर होत ती परत चुलाण्यापाशी गेली.

निकीफोरीचने पाव, मुरंबा आणि वोदका ह्या वस्तू बरोबर आणल्या होत्या. आम्ही चहा प्यायला बसलो. मरीना माझ्या शेजारी बसली होती. अधिक सलगीच्या भावाने ती मला खाऊ घालीत होती. तिचा नवरा माझ्या हिताखातर उपदेशाचे पारायण लावीत होता तेव्हा आपल्या एका धड डोळ्याने ती माझ्याकडे ममतेने पहात होती.

"हा अदृश्य धागा लोकांच्या काळजात आहे, त्यांच्या हाडीमासी गुंतला आहे! प्रयत्नानं त्याला तोडून पहा! प्रयत्न करून त्याला उपटून टाका! लोकांच्या दृष्टीनं झार हा देवासमान आहे."

अचानक त्याने विचारले:

"तुला पुस्तकांची खूप माहिती आहे म्हणतोस: ख्रिस्त चरित्राचं निरूपण कधी वाचलं आहेस? होय? मग तुझं मत काय आहे? त्यात लिहिलेलं सगळं बरोबर आहे?"

"मला माहीत नाही."

"मला वाटतं की, त्यात अनेक अनावश्यक गोष्टी लिहिलेल्या आहेत. खूपच! उदाहरणादाखल, भिकाऱ्यांविषयी: गरीब भाग्यवान असतात! कसलं आलंय भाग्य त्यांचं? भलतंच काहीतरी! आणि एकूण गरीबांविषयी त्यात बरंचसं स्पष्ट नाही. गरीब आणि दरिद्री यांच्यातला फरक स्पष्ट केला पाहिजे. एखादा माणूस गरीब असला तर चांगला कसचा? पण तो दरिद्री असला तर, कदाचित केवळ त्याच्या कमनशीबामुळं. अशा दृष्टिकोनातून पाहिलं पाहिजे. तेच जास्त इष्ट ठरेल!"

"का?"

माझ्या चेहऱ्याकडे शोधकपणे पहात काही वेळ तो गप्प राहिला.

मग भारदस्तपणे आणि ठामपणे त्याने पुन्हा बोलायला आरंभ केला. त्याने व्यक्त केलेल्या कल्पनांवर खूप विचार केलेला होता असे स्पष्टपणे जाणवत होते.

"ख्रिस्त चरित्राच्या निरूपणात फार दया व्यक्त झालीय आणि दया ही हानीकारक बाब आहे. मी अशा दृष्टीनं पाहतो. दया करणं म्हणजे फालतू माणसांवर, काहीवेळा तर अपायकारक लोकांवर पैशाच्या अफाट रकमा खर्च करणं! धर्मादाय करणारी घरं, तुरुंग, वेड्यांची इस्पितळं! खरं म्हणजे बलवान माणसांना मदत केली पाहिजे, निरोगी लोकांना! म्हणजे त्यांना आपली ताकद व्यर्थ खर्ची घालावी लागणार नाही. पण तसं घडत नाही. आपण दुबळ्यांना मदत करतो. जणू काही दुबळ्यांना तुम्ही भक्कम बनवू शकता! आणि त्यातून निष्पन्न काय होतं तर, सामर्थ्यवान माणसं आपली शक्ती गमावतात आणि दुबळे त्यांच्यावर कुरघोडी करतात. ही खरी समस्या आहे. अनेक गोष्टींवर विचार करून त्यांच्यात सुधारणा करणं आवश्यक आहे. आपण आपल्या डोक्यात पक्कं बिंबवलं पाहिजे की, आयुष्य ख्रिस्त चरित्राच्या निरूपणापासून दूर गेलंय; खूप पूर्वीच ते दूर गेलंय! ते आपल्या स्वतःच्या मार्गानं जातंय. आता ह्या प्लेतन्योवचंच पहा. कोणत्या कारणावरून तो घसरला असं वाटतं तुला? दयेपोटी! आम्ही भिकाऱ्यांना भीक घालतो, पण विद्यार्थ्यांचा विचार करत नाही. खुशाल पडू देत त्यांना! यात कोणतं तर्कशास्त्र आहे बरं? आँ?"

असे विचार यापूर्वी मी ऐकलेले होते. वाटते त्यापेक्षा ते अधिक सातत्यशील आणि अधिक विस्तृतपणे फैलावलेले आहेत. पण एवढ्या मर्मभेदकपणे त्यांना व्यक्त केलेले मी यापूर्वी कधीही ऐकले नव्हते. यानंतर सुमारे सात वर्षांनी मी नीत्शे वाचत होतो तेव्हा कझानमधील पोलीसाच्या तत्त्वज्ञानाची मला ठळकपणे आठवण झाली. आणि जाता जाता मी असे म्हणेन: प्रत्यक्ष जीवनात ज्या विचारांशी माझी आधीच प्रत्यक्ष गाठ पडली नाही असे विचार क्वचितच मला पुस्तकांमध्ये आढळले आहेत.

"माणसांची शिकार" करणारा तो म्हातारा सतत बोलत राहिला. आपल्या शब्दांना ताल देण्यासाठी चहाच्या तबकाच्या किनारीवर तो बोटे आपटीत होता. त्याच्या रोड चेहऱ्यावर एक कडक आठी पडली होती. पण त्याचा चेहरा माझ्याकडे वळलेला नव्हता. चकचकीत

पुसलेल्या समोवारच्या तांब्याच्या आरशात तो टक लावून पहात होता.

"तुम्हाला आता जायला हवं," त्याच्या बायकोने त्याला दोनदा आठवण करून दिली. पण तिला उत्तर न देता आपल्या विचारांच्या धाग्यात तो शब्दावर शब्द गुंफीत राहिला. आणि अचानकपणे, कोणतेही दृश्य स्थित्यंतर न घडता त्याचे आख्यान एकदम नव्याच मार्गाकडे वळले.

"तू काही मूर्ख पोरगा नाहीस. सुशिक्षित आहेस. त्या बेकरीतलं काम तुझ्या लायकीचं आहे काय? त्यापेक्षा झारच्या साम्राज्यासाठी थोडं वेगळ्या प्रकारचं काम करून तेवढेच किंवा थोडे जास्त पैसे तू मिळवू शकशील..."

मी त्याचे बोलणे ऐकत होते. पण माझे मन मात्र दुसऱ्याच समस्येत गुंतले होते. निकीफोरीच ज्यांच्या मागावर होता त्या रीब्नोऱ्यादस्कायावरील अज्ञात माणसांना धोक्याचा इशारा कसा द्यावा याचा मी विचार करीत होतो. लॉजमध्ये सेर्गेई सोमोव नांवाचा एक माणूस होता. यालूतोरोवस्कमध्ये हद्दपारीची शिक्षा भोगून नुकताच तो परत आलेला होता. मी त्याच्याबद्दल बरेच काही ऐकले होते व ती सर्व माहिती खूपच रंजक होती.

"बुद्धी असलेल्या माणसांनी एकत्र राहिलं पाहिजे. पोळ्यामधल्या मधमाशांप्रमाणं किंवा घरट्यामधल्या गांधीलमाशांसारखं. झारचं साम्राज्य –"

"जरा घड्याळ बघा! एव्हाना नऊ वाजले," त्याची बायको म्हणाली.

"च्यायला!"

निकीफोरीच उडी मारून उठला आणि घाईघाईने आपल्या जाकीटाची बटणे लावू लागला.

"ठीक आहे, मी बग्गी करून जाईन. अच्छा, तरुण माणसा! केव्हाही येत जा."

त्याची चौकी सोडताना मी मनाशी निर्धार केला की, पुन्हा निकीफोरीचच्या भेटीला कधीही जायचे नाही. म्हातारा स्वारस्यपूर्ण होता, पण फार किळसवाणा होता. दयेमुळे घडणाऱ्या अपायांविषयीच्या त्याच्या बडबडीपायी मी फार अस्वस्थ झालो. ते शब्द माझ्या स्मरणात पक्के रुतून बसले. त्यांचा मला कधीही विसर पडणार नव्हता. त्या शब्दांमागे काही सत्याचा गाभा मला जाणवला, पण सत्य एका पोलीसाच्या मुखातून बाहेर पडावे हे विचित्र होते.

ह्या विषयावर वारंवार वादविवाद झडायचे. अशाच एका चर्चेने विशेषतः माझ्या मनाचा तोल अत्यंत क्रूरपणे बिघडविला होता.

एक "तल्स्तोयवादी" शहरात आला होता. या पंथाचा मला भेटलेला पहिलाच माणूस. उंच, हाडकुळा, काळसर वर्णाचा, काळ्या बोकडदाढीचा आणि नीग्रोप्रमाणे जाड ओठ असलेला. त्याला पोक काढायची सवय होती आणि त्यामुळे तो जमिनीवर टक लावून पाहतोय असे वाटायचे. पण वारंवार तो आपल्या अर्धटकल्या डोक्याला एकदम झटका देई आणि त्याच्या काळ्या, आर्द्र डोळ्यांमधील आवेगी चमक दुसऱ्याच्या काळजाचा ठाव घेई. त्याच्या भेदक नजरेत तिरस्कार धुमसत असायचा. विद्यापीठातील एका प्राध्यापकाच्या खोलीत बैठक भरली होती. अनेक तरुण मंडळी आली होती. त्यांच्यात एक सडपातळ अंगकाठीचा, झकपक पोषाखातील लहानसा पाद्री होता. त्याच्या देखण्या चेहऱ्याला त्याच्या अंगातील काळ्या रेशमी झग्याने अधिक उठाव आणला होता. त्याच्या थंडगार राखी डोळ्यांमध्ये एक गोठलेले स्मित उजळले होते.

ख्रिस्त चरित्राच्या निरूपणांमध्ये मांडलेल्या आश्चर्यकारक सत्यांबद्दल आणि त्यांच्या चिरंतन अस्तित्वाबद्दल तो तल्स्तोयवादी बराच वेळपर्यंत बोलत राहिला. त्याचा आवाज शुष्क होता, त्याची वाक्ये त्रोटक होती. पण त्याच्या शब्दांमधून त्याच्या मतांचा ठाम निर्धार उमटत होता. त्याचा केसाळ डावा हात पुनःपुन्हा जोरजोराने खाली-वर हालचाल करायचा; जणू काही तो घाव घालतो आहे असे भासायचे. त्याने आपला उजवा हात आपल्या खिशात कोंबला होता.

"नाटक्या आहे," माझ्यापासून जवळच कुणीतरी कोपऱ्यात कुजबुजला.

"खरंच, फार नाटकी वागतोय!"

त्यापूर्वी नुकतेच मी एक पुस्तक वाचले होते. मला वाटते ते ड्रेपरचे असावे. कॅथलिकवादाने विज्ञानाविरुद्ध केलेल्या लढ्याविषयीचे. आणि हा तल्स्तोयवादी मला तशा लोकांपैकी भासला—प्रेमाच्या शक्तीने सबंध जगाची मुक्ती घडविता येते अशी ठाम श्रद्धा असलेला! ही माणसे केवळ दयेपोटी आपल्या बरोबरीच्या लोकांचे तुकडे तुकडे करण्यास आणि त्यांना जाळण्यास तयार असतात!

त्याने अंगात रुंद बाह्यांचा पांढरा सदरा घातला होता व त्यावर एक घाणेरडा राखाडी अंगरखा चढविला होता. त्यामुळेही तो खोलीतील

इतरांपेक्षा वेगळा दिसत होता. आपल्या प्रवचनाच्या अखेरीस तो ओरडून म्हणाला :

"म्हणून मी विचारतो : तुम्ही ख्रिस्ताला अनुसरता, का डार्विनला?"

हे वाक्य त्याने खोलीच्या कोपऱ्यात एखाद्या दगडाप्रमाणे भिरकाविले. तेथे तरुण मंडळी दाटी करून बसलेली होती. त्या तरुण-तरुणींच्या विस्फारलेल्या डोळ्यांमध्ये भीती आणि उत्तेजकता चमकत होती. त्या तल्स्तोयवाद्याच्या भाषणाने प्रत्येकजण अवाक् झाल्यासारखे वाटत होते. विचारमग्नतेमुळे सर्वांची डोकी खाली झुकली होती. कुणीही बोलत नव्हते. जळजळत्या नजरेने सबंध खोलीभर पहात तो कणखरपणे पुढे म्हणाला :

"ह्या दोन दुराराध्य तत्त्वांना एकत्र जोडण्याचा प्रयत्न फक्त कर्मठ यहुदीच करू शकतात. आणि असा प्रयत्न करताना ते बेशरमपणे स्वतःची फसवणूक करून घेतात आणि आपल्या खोटेपणाने दुसऱ्यांना भ्रष्ट करतात."

तो छोटा पाद्री उठून उभा राहिला. आपल्या झग्याच्या बाह्या त्याने व्यवस्थितपणे मागे वळविल्या. नम्र स्मित करून त्याने आपले अस्खलित भाषण सुरू केले. त्या भाषणातील आदब कमालीची धोकेबाज होती.

"कर्मठ यहुद्यांविषयीचे अश्लील मत तुम्हाला मान्य आहे असे दिसते. हे मत केवळ असभ्यच नव्हे, तर संपूर्ण चुकीचे आहे..."

कर्मठ यहुदी हे यहुदी धर्माच्या लोकांच्या कायद्यांचे खरेखुरे व निष्ठावंत राखणदार आहेत, असे सिद्ध करण्याचा त्याने प्रयत्न केला तेव्हा तर मी कमालीचा चकित झालो. त्यांच्या शत्रूंविरुद्ध लोक नेहमीच गेले होते, असे पाद्रयाचे म्हणणे होते.

"उदाहरणार्थ, फ्लावियस जोसेफस वाचा..."

तल्स्तोयवादी ताडदिशी उभा राहिला आणि जोरजोराने हातवारे करीत जोसेफसचे खंडन करीत ओरडला :

"आत्तासुद्धा लोक आपल्या मित्रांविरोधी असलेल्या शत्रूंचे अनुसरण करतात. लोक स्वेच्छेने वागत नाहीत. त्यांच्यावर बळजबरी केली जाते. तुमच्या जोसेफसचा दिमाख मला कशाला दाखवता?"

पाद्रयाने आणि इतर वादपटूंनी मूलभूत प्रश्नाच्या चिंध्या चिंध्या केल्या. तो प्रश्नच चर्चेतून नाहीसा झाला.

"प्रेम हे सत्य आहे," तल्स्तोयवाद्यानं आपले मत मांडले. त्याच्या डोळ्यांमधून तिरस्कार आणि संताप चमकत होता.

शब्दांची मला एवढी झिंग चढली, की इतःपर त्यांचा अर्थच मला समजेनासा झाला. माझ्या पायांखालील जमीन हादरत होती. शब्दांच्या भिरभिऱ्यात मी गरगरत होतो. माझ्याएवढा मद्दड, मूर्ख माणूस ह्या पृथ्वीतलावर दुसरा कुणीही नसेल, असा निराश विचार माझ्या मनात पुनःपुन्हा दाटत होता.

आपल्या किरमिजी गालांवरील घाम पुशीत तो तल्स्तोयवादी चिडून ओरडला :

"ख्रिस्त चरित्राचं निरूपण बाजूला ठेवा! विसरून जा त्याला! मग तुम्ही खोटं बोलणार नाही! पुन्हा एकदा ख्रिस्ताला क्रूसावर चढवा! ते जास्त प्रामाणिकपणाचं ठरेल!"

एखाद्या कोऱ्या भिंतीप्रमाणे माझ्यासमोर प्रश्न उभा राहिला. हे कसे काय? जर आयुष्य म्हणजे ह्या पृथ्वीवरील सुखासाठी चाललेला सतत संघर्ष असेल, तर दया आणि प्रेम हे त्या संघर्षाच्या यशातील अडथळे आहेत काय?

त्या तल्स्तोयवाद्याचे नांव मी माहीत करून घेतले–क्लोपस्की. त्याचा पत्ता काढून दुसऱ्या दिवशी संध्याकाळी मी त्याला भेटायला गेलो. खेड्यातील जमीनदारांच्या दोन तरुण मुलींच्या घरी तो उतरला होता. बागेमध्ये लिंबोणीच्या एका जुन्या प्रचंड झाडाच्या सावलीत तो त्या तरुणींबरोबर बसलेला मला आढळला. त्या उंच, हाडकुळ्या, अणीदार माणसाने पांढरा पोषाख परिधान केला होता. त्याच्या खुल्या सदऱ्यामधून त्याची काळी, केसाळ छाती दिसत होती. घरदार नसलेल्या सुधारकाबद्दलची, सत्याच्या प्रचारकाबद्दलची माझ्या मनात जी कल्पना होती, तिच्याशी त्याची प्रतिमा अगदी तंतोतंत जुळत होती.

आपल्यासमोरील भांड्यातील रासबेरीची फळे आणि दूध चांदीच्या चमच्याने खाण्यात तो गुंतला होता. आपल्या जाडजूड ओठांनी मिटक्या मारीत तो चविष्टपणे खात होता. प्रत्येक चमच्यानंतर, आपल्या विरळ मिशांमधील अडकलेले दुधाचे थेंब तो फुंकरीने उडवून लावीत होता. दोघींपैकी एक बहीण त्याच्या सेवेसाठी तत्परतेने मेजापाशीच उभी होती. दुसरी झाडाला रेलून, हातांची घडी आपल्या छातीवर ठेवून, तापलेल्या धुळकट आकाशाकडे स्वप्नाळू डोळ्यांनी पहात होती. दोन्ही मुलींनी

हलके-फुलके फिकट जांभळ्या रंगाचे पोषाख केले होते. त्या खूपच एकसारख्या होत्या. त्यांच्यातील फरक ओळखणे जवळ जवळ अशक्य होते.

तो माझ्याशी आनंदाने आणि प्रेमळपणे बोलला. प्रेमाच्या निर्माणक्षम शक्तीविषयी बोलला. "जागतिक भावनेशी माणसाला जोडण्याची" क्षमता असलेली ही एकमेव शक्ती—हे प्रेम प्रत्येकाने आपल्या काळजात कसे निर्माण केले पाहिजे, त्याविषयी बोलला. जीवनामधून फैलावणाऱ्या प्रेमाशी माणसाला जोडणाऱ्या प्रेमाच्या शक्तीविषयी बोलला.

"एवढा एकच दुवा माणसाला बांधू शकतो! प्रेमाविना जीवनाचा अर्थ समजणं शक्य नाही. संघर्ष हा जीवनाचा कायदा आहे असं जे म्हणतात ते अंध आत्मे आहेत. त्यांचा हमखास नाश होणार. आगीनं आग विझत नाही. किंवा वाईट शक्तीनं वाईटावर मात करता येत नाही!"

त्या दोन तरुणी एकमेकींच्या कमरेभोवती हाताचा विळखा घालून बागेमधून घराच्या दिशेने निघून गेल्यानंतर मात्र, त्यांच्या पाठीमागे डोळे किलकिले करून पहात ह्या माणसाने मला विचारले:

"आणि तू कोण आहेस?"

माझ्याविषयीची माहिती मी त्याला सांगितली. नंतर टेबलावर आपल्या बोटांनी टिचक्या वाजवीत त्याने बोलायला सुरुवात केली: कुठेही असला तरी माणूस हा माणूसच कसा राहतो; माणसाने जीवनातील आपले स्थान उंचावण्याची आकांक्षा धरण्यापेक्षा मानवजातीच्या प्रेमाची शिस्त आपल्या आत्म्याला कशी लावावी, वगैरे.

"माणूस जेवढ्या खालच्या स्थानावर, तेवढा जीवनामधील सत्याच्या तो जास्त निकट असतो, जीवनाच्या अत्यंत पवित्र शहाणपणाच्या जास्त जवळ असतो."

ह्या "पवित्र शहाणपणाशी" त्याची कितपत जवळीक होती ह्याबद्दल मला शंका होती, तरी मी त्यावर काही भाष्य केले नाही. तो कंटाळल्याचे मला दिसत होते. त्याने माझ्याकडे एक तिरस्काराचा कटाक्ष टाकला, जांभई दिली, आपल्या डोक्यामागे हातांची जुडी धरली, पाय ताणून सरळ केले आणि जणू अर्धवट झोपेत असल्याप्रमाणे पापण्या मिटवून तो पुटपुटला:

"प्रेमाला शरण जाणं... हा जीवनाचा धर्म आहे..."

एकदम दचकून त्याने हात उडविले आणि हवेत काहीतरी पकडण्याचा प्रयत्न केला. मग सावधपणे माझ्याकडे टक लावून पहात तो म्हणाला :

"काय झालं? माफ कर, पण मी खूप थकलोय."

आणि त्याने पुन्हा आपले डोळे मिटले. जणू खूप वेदना झाल्याप्रमाणे आपले दात गच्च आवळले. त्याचा खालचा ओठ लोंबू लागला आणि वरचा ओठ वर ओढला गेला. त्यामुळे त्याच्या मिशांचे विरळ निळसर-काळसर केस पिंजारल्यासारखे दिसू लागले.

मी तेथून निघालो तेव्हा माझ्या मनात त्याच्याविषयी अढी बसली होती. त्याच्या प्रामाणिकपणाविषयी मला किंचित संदेह निर्माण झाला होता.

त्यानंतर काही दिवसांनी पुन्हा माझी क्लोपस्कीशी गाठ पडली. विद्यापीठात शिकविणाऱ्या माझ्या माहितीच्या एका दारुड्या, ब्रह्मचारी तरुणाकडे पाव पोचते करण्यासाठी मी भल्या सकाळीच निघालो होतो. तेथे मला क्लोपस्की भेटला. क्लोपस्की रात्रभर झोपला नसावा असे वाटत होते. त्याचा चेहरा ओढला होता, त्याच्या डोळ्यांच्या पापण्या लाल आणि सुजलेल्या होत्या. तो प्यायलेला होता अशी मला शंका आली. तुफान झिंगलेला जाड्या अध्यापक अंतर्वस्त्रांमध्येच जमिनीवर बसला होता. त्याच्या हातात गिटार होते. त्याच्या भोवती फर्निचर वेड्यावाकड्या अवस्थेत पडले होते, कपडे आणि बीयरच्या रिकाम्या बाटल्या विखुरल्या होत्या. पुढे-मागे डोलत तो गरजला :

"दया ऽऽ ..."

क्लोपस्की कठोरपणे, रागाने ओरडला :

"दया अस्तित्वात नाही! आपण प्रेमामधून विलीन होऊ किंवा प्रेमासाठी करण्याच्या संघर्षात चिरडून जाऊ. या ना त्या तऱ्हेनं आपण नष्ट होणारच!"

त्याने माझा खांदा पकडला आणि मला फरफटत, खेचत अध्यापकापाशी आणले.

"घे! विचार ह्याला – विचार, काय पाहिजे ह्याला! विचार – मानवजातीवर ह्याला प्रेम करावंसं वाटतंय?"

अध्यापकाने माझ्याकडे अश्रुभरल्या डोळ्यांनी पाहिले आणि तो हसला.

"हा बेकरीमधला आहे. ह्याला मी पैसे देणं लागतो."

झोकांड्या खात त्याने आपला हात खिशात खुपसला आणि एक चावी बाहेर काढून माझ्या हाती दिली.

"तिथून घे! असतील तेवढे सगळे घे!"

पण त्या तल्स्तोयवाद्याने चावी हिसकावून घेतली आणि हाताने मला झटकीत तो म्हणाला:

"चालता हो. पुढच्या वेळी तुला तुझे पैसे मिळतील."

मी आणलेले पाव त्याने कोचाच्या एका कोपऱ्यात फेकले.

त्याने मला ओळखले नव्हते आणि त्या गोष्टीचा मला आनंद होता. प्रेमामार्फत नष्ट होण्याची त्याची भाषा माझ्या स्मरणात राहिली. आणि माझ्या अंतःकरणात त्याच्याविषयी विलक्षण तिरस्कार राहिला.

त्यानंतर लौकरच मला समजले की, ज्यांच्या घरात तो रहात होता त्यांपैकी एका मुलीपाशी त्याने आपले प्रेम व्यक्त केले आणि त्याच दिवशी दुसऱ्या मुलीपाशीही तशीच प्रेमभावना व्यक्त केली. त्या दोघी बहिणींनी एकमेकींशी हितगुज केले तेव्हा त्यांना खरी परिस्थिती उमजून आली. त्यांच्या आनंदाचे पर्यवसान त्यांच्या प्रेमिकाविषयीच्या तिरस्कारात झाले. त्यांनी दरवानाकरवी त्या प्रेमवीराची घरामधून ताबडतोब हकालपट्टी केली. तो शहरामधून अदृश्य झाला.

प्रेम आणि दयेचा प्रश्न, मानवी जीवनामधील त्यांचे स्थान, एक गुंतागुंतीची आणि हताश करणारी ही समस्या—फार फार लौकर माझ्यासमोर उभी राहिली. आरंभी तिचे स्वरूप तीक्ष्ण, पण काहीसे अंतर्गत विसंवादाचे होते. पण पुढे स्पष्ट आणि निःसंदिग्ध प्रश्न उभा झाला:

"प्रेमाचे महत्त्व काय?"

जे काही मी वाचले होते ते सर्व ख्रिश्चन धर्माच्या, मानवतावादाच्या विचारांनी ठासून भरलेले होते. मानवतेविषयी दया दाखविण्याच्या करुण आवाहनांनी भरलेले होते. त्या काळात मी ज्या उत्तमोत्तम स्त्रीपुरुषांना भेटलो, त्या सर्वांनी हेच विचार आवेगपूर्ण वक्तृत्वामधून व्यक्त केलेले होते.

पण माझ्या भोवताली प्रत्यक्ष जीवनात मी पहात होतो त्या सर्व गोष्टी सहानुभूतीच्या विचाराशी हरतऱ्हेने परक्या होत्या. माझ्या दृष्टीने जीवन म्हणजे वैरांची आणि क्रौर्यांची अखंड मालिका होती; विविध क्षुद्र गोष्टींच्या प्राप्तीसाठी चाललेला दुष्ट आणि अखंड संघर्ष होता.

माझ्यापुरते सांगायचे तर मला फक्त पुस्तके पाहिजे होती. इतर सर्व गोष्टी माझ्या दृष्टीने कवडी-मोलाच्या होत्या.

आमच्या फाटकापाशी मी एक तासभर बसलो म्हणजे ही सगळी माणसे – गाडीवान, दरवान, कामगार, अधिकारी, व्यापारी – माझ्यापेक्षा आणि माझ्या आवडीच्या लोकांपेक्षा किती वेगळे जीवन जगत होती ते दिसून यायचे. त्यांच्या इच्छा वेगळ्या होत्या, त्यांची उद्दिष्टे वेगळी होती. आणि ज्या लोकांविषयी मला आदर वाटत होता, ज्या लोकांवर माझी श्रद्धा होती, ते विलक्षणरीत्या परके होते, एकाकी होते. अत्यंत क्षुद्र आणि धूर्त वृत्तीने वागणाऱ्या बहुसंख्य लोकांमध्ये ते नकोसे असणारे तिऱ्हाईत होते. ही बहुसंख्य माणसे वाळवीप्रमाणे धडपडत होती आणि जीवन नांवाचे एक वारूळ बांधण्यात गुंतली होती. मला हे जीवन अत्यंत मूर्खपणाचे भासत होते. त्यातून एक मृतवत कंटाळा उमटत होता. आणि अनेकदा मला असे आढळून आले होते की, जे लोक प्रेम आणि दयेची भाषा करीत, ते केवळ शब्द वापरण्यापुरते! प्रत्यक्ष, कृतीची वेळ आली म्हणजे अगदी अभावितपणे जीवनाच्या सर्वसामान्य प्रवाहात ते वाहवत जात.

ते सारेच फार अवघड होते.

पशुवैद्य लावरोवला जलोदराचा विकार जडला होता. त्याची कांती पिवळी पडली होती आणि त्याच्या अंगाला सूज आली होती. एक दिवस धापा टाकीत तो म्हणाला:

"लोकांना अगदी किळस येईपर्यंत सगळीकडं क्रौर्य वाढवलं पाहिजे. ह्या नतद्रष्ट शरदाच्या मोसमाचा जसा त्यांना तिटकारा वाटतो, तसा पृथ्वीवरच्या प्रत्येक माणसाला क्रौर्याचा तिटकारा वाटला पाहिजे!"

त्यावर्षी शरदाचा मोसम लौकर सुरू झाला होता. पाऊस कोसळत होता, थंडी जाणवत होती, रोगराईचे आणि आत्महत्यांचे थैमान चालू होते. सरतेशेवटी लावरोवनेही पोटॅशियम सायनाईड घेऊन स्वतःचा अंत केला. जलोदराची व्यथा त्याला सोसली नाही.

"गुरांचा डॉक्टर! गुरांना औषधं द्यायचा आणि स्वतः गुरासारखाच मेला!" मेदनीकोव शिंपी म्हणाला. लावरोव त्याच्या घरात रहात होता. हा शिंपी हडकुळा, लहान माणूस होता. फार धर्मपरायण होता. तो आपल्या मुलांना – सात वर्षांची एक मुलगी आणि अकरा

वर्षांचा एक मुलगा – नियमितपणे तिहेरी वादीच्या कातडी चाबकाने झोडपून काढायचा, तसेच बांबूच्या काठीने आपल्या बायकोच्या पोटऱ्यांवर सपाटून मारायचा. तो नेहमी तक्रार करी :

"शांततारक्षक अधिकाऱ्यानं मला दम भरला. म्हणाला की, ही माझी पद्धत मी कुणा चिन्यापासून उचललीय. पण आयुष्यात मी एकाही चिनी माणसाला अजून पाहिलेलं नाही. फक्त बोर्डावर रंगवलेल्या चित्रात पाहिलंय."

मेदनीकोवच्या दुकानात एक फेंगडचा पायांचा, दुर्मुखला कामगार होता. त्याला "दून्काचा नवरा" म्हणून सगळे ओळखीत. तो आपल्या मालकाला म्हणाला :

"दीनवाण्या आणि त्यातही धार्मिक वृत्तीच्या माणसांना घाबरून राहिलं पाहिजे. गुंड माणसं कसल्या उद्योगात आहेत ते पटकन समजतं आणि त्यांच्यापासून लपून रहायला नेहमी वाव मिळतो. पण दीनवाणी माणसं गवतातल्या सापाप्रमाणं गुपचूप आणि धूर्तपणानं सरपटत तुमच्यापाशी येतात आणि तुम्हाला कळायच्या आधीच तुमच्या मर्मस्थानी दंश करतात. ह्या अशा दीनवाण्या माणसांना मी फार घाबरतो."

"दून्काचा नवरा" स्वतः एक दीनवाणा आणि धूर्त खबऱ्या होता. मेदनीकोवच्या मर्जीतील माणूस होता. पण तो जे काही बोलला त्यात सत्य होते.

काहीवेळा मला वाटायचे की, दीनवाणी माणसे जीवनाच्या दगडी काळजावर शेवाळासारखी वाढत. त्याचा पोत ढिला करीत, त्याला मऊ करीत आणि अधिक सुपीक बनवीत. मात्र त्यांची विपुलता, नीच स्तराला चटकन जाण्याची त्यांची क्षमता, त्यांच्या आत्म्याची निसरडी चंचलता आणि लवचिकता, त्यांची बारीक आवाजामधील सततची पिरपिर – ह्या सर्व गोष्टी पाहिल्या म्हणजे गोमाशांच्या मोहोळात सापडलेल्या एखाद्या लंगड्या घोड्याप्रमाणे मी त्यांच्यात वावरतोय असे मला वाटायचे.

पोलीसाच्या चौकीहून घरी परतल्यानंतर ह्या विचारांनी माझे मन व्यापून गेले होते.

वारा उसासे टाकीत होता. त्यामुळे रस्त्यावरील दिव्यांच्या ज्योती थरथरत होत्या. आणि जणू काळे-राखाडी आकाश वर थरथरत होते व ऑक्टोबर महिन्यातील धूळभरला पाऊस पृथ्वीवर चाळून टाकीत

होता. एक ओलीचिप्प वेश्या रस्त्यावरून एका दारुड्या माणसाला हाताला धरून खेचत नेत होती. ती त्याला सारखी हिसके देत होती, तो विव्हळत होता, काहीतरी पुटपुटत होता. ती बाई ढाल्या आवाजात क्षीणपणे म्हणाली :

"हे नशीब बाबा!"

माझ्या मनात विचार आला : "माझीही अशीच परिस्थिती आहे. मीही फरफटला जात होतो, घाणेरड्या कोपऱ्यांमध्ये ढकलला जात होतो, घाणीला आणि दुःखाला, विलक्षण वेगवेगळ्या स्त्री-पुरुषांना मला सामोरे जावे लागत होते. ह्या सर्व गोष्टींनी मी थकून गेलो होतो."

नेमक्या ह्या शब्दांमध्ये नव्हे, पण अशा अर्थाचा विचार त्या नतद्रष्ट सायंकाळी माझ्या मनात आला होता. माझ्या मनाच्या थकलेपणाची त्यावेळी प्रथमच मला जाणीव झाली. माझ्या काळजाला कुरतडणाऱ्या दाहक बुरशीची पहिली जाणीव झाली. त्यावेळेपासून माझी मनःस्थिती जास्त जास्त बिघडत गेली. तिऱ्हाईताच्या नजरेने मी स्वतःकडे पाहू लागलो : थंड डोळ्यांनी, परकेपणाने, शत्रुत्वाने!

प्रत्येक मानवी मनामध्ये विसंगतींची थरथर आणि गोंधळलेली सहवस्ती मला जाणवू लागली. ह्या विसंगती केवळ शब्द आणि कृती यांच्यामधीलच नव्हत्या, तर भावनांमधीलही होत्या. त्यांच्या चंचल खेळाने मी अधिकच निराश झालो होतो. माझ्या स्वतःच्या मनातही हा खेळ चाललेला मला दिसायचा. आणि ते सर्वांत वाईट होते. मी सर्व दिशांकडे ओढला जात होतो : बायकांकडे आणि पुस्तकांकडे; कामकरी लोकांकडे आणि आनंदी विद्यार्थीगणांकडे. पण ह्या माझ्या एकाही आवडीचे समाधान करायला माझ्यापाशी वेळ नव्हता. एखाद्या भिरभिरणाऱ्या भोवऱ्याप्रमाणे मी एका गोष्टीपासून दुसरीकडे गिरक्या घेत जात होतो. आणि एक अज्ञात, पण न दिसणारा आणि बळकट हात, मला एका अदृश्य चाबकाने झोडपून काढीत होता.

याकोव शापोश्नीकोवला इस्पितळात नेल्याचे समजले तेव्हा त्याला भेटण्यासाठी मी तेथे गेलो. एक लठ्ठ, दुर्मुखली, चष्मेवाली बाई मला सामोरी आली. आपल्या लुळ्या, लाल, होरपळलेल्या कानांवर तिने पांढरा रुमाल बांधला होता. तुच्छ आवाजात ती मला म्हणाली :

"तो मेला!"

पण तेथून निघून न जाता मी शांतपणे तसाच तिच्या वाटेत आडवा

उभा राहिलो तेव्हा तिचा राग अनावर झाला आणि तिने खवटपणे विचारले :

"अच्छा ! आणखी काय ?"

आता मलाही राग आवरेनासा झाला आणि मी म्हणालो :

"तू महामूर्ख आहेस !"

"निकोलाय ! ह्याला फेकून दे बाहेर !"

तांब्याच्या सळयांना एका फडक्याने घासून चकचकीत बनविण्याच्या उद्योगात निकोलाय गुंतलेला होता. घसा खाकरीत त्याने एक सळई माझ्या पाठीवर ओढली. त्यासरशी त्याच्यावर झेप घेऊन मी त्याला माझ्या कवेत आवळले, दारापर्यंत ओढत नेले आणि इस्पितळाच्या पायऱ्यांजवळच्या एका डबक्यात बसविले. हा सर्व प्रकार त्याने शांतपणे सहन केला. जेथे मी त्याला ठेवले होते तेथेच एक-दोन क्षण तो बसून राहिला. एकही शब्द न बोलता त्याने माझ्याकडे टक लावून पाहिले. मग आपल्या पायांवर उठून उभे रहात तो म्हणाला :

"एख् ! * साला..."

मी देर्झाविन ** उद्यानात गेलो आणि कवीच्या पुतळ्याजवळच्या एका बाकावर बसलो. काहीतरी घाणेरडे वागावे, काहीतरी वाह्यातपणा करावा अशी जळजळती इच्छा मनात निर्माण होत होती. म्हणजे लोकांच्या जमावाने माझ्यावर हल्ला चढविला असता आणि त्यामुळे त्यांना उलट झोडपून काढायला मला निमित्त मिळाले असते. पण सुटीचा दिवस असूनही उद्यानात शुकशुकाट होता. भोवतालच्या रस्त्यांवर चिटपाखरू दिसत नव्हते. फक्त वाऱ्याचे झोत वाळक्या पानांना आपल्याबरोबर लोटत नेत होते आणि जवळच्या दिव्याच्या खांबाला चिकटविलेल्या पोस्टरच्या सुटचा कोपऱ्यांना घासत होते.

संधिप्रकाश दाटत होता. हवेत गारवा आला. आकाश गडद, पारदर्शी निळे बनले. एखाद्या प्रचंड ब्रॉंझ मूर्तीप्रमाणे तो पुतळा मला भासत होता. त्याच्याकडे वर टक लावून पाहताना मनात विचार आला : ह्या पृथ्वीवर याकोव नांवाचा एकाकी आत्मा देवाविरुद्ध प्राणपणाने

---

* एक रशियन उद्‌गार ! – अनु.

** पूश्कीनच्या आधीचा एक रशियन कवी. – सं.

लढत होता; आणि त्याला अगदी सर्वसामान्य मृत्यू आला. अगदी पूर्णतया सामान्य! ही फार उपेक्षेची बाब वाटत होती. हे सहन करणे फार कठीण होते.

आणि तो निकोलाय वेडा होता. त्याने माझ्याशी झुंजायला पाहिजे होते, किंवा पोलीसांना बोलावून मला तुरुंगात डांबायला पाहिजे होते.

मी रूबत्सोवला भेटायला गेलो. त्याच्या बिळासारख्या खोलीत टेबलाशी वाकून बसून छोटया दिव्याच्या प्रकाशात तो आपला कोट दुरुस्त करीत होता.

"याकोव वारला!"

म्हाताऱ्याने हात वर उचलला. त्याच्या हातात सुई तशीच धरलेली होती. क्रूसाने चिन्ह करण्याच्या तो बेतात होता, पण ती कृती त्याने अर्ध्यातच सोडली. त्याचा दोरा कशामध्ये तरी गुंतला आणि त्याने अगदी हळू आवाजात एक अश्लील शिवी हासडली.

थोडया वेळानंतर तो पुटपुटला:

"तसं पाहिलं तर काही काळानं आपण सारेच मरणार आहोत. लोकांना ही एक मूर्ख सवय आहे. असं घडतं खरं! याकोव ... वारला! इथं एक तांबट होता ... तोही गेला. मागच्या रविवारी. गुप्त पोलीस त्याला घेऊन गेले. गूरीयनं त्या तांबटाशी माझी ओळख करून दिली होती. मोठा हुषार माणूस! विद्यार्थ्यांशी खूप चांगला वागायचा. ते सध्या काहीतरी गोंगाट माजवत आहेत म्हणे! ऐकलंस त्याबद्दल? हा कोट जरा मला शिवून दे. मी काय करतोय ते मला दिसत नाही."

आपले फाटके कपडे, सुई-दोरा त्याने माझ्या हवाली केले व हात आपल्या पाठीशी धरून, खोकल्यांच्या उबळींदरम्यान पुटपुटत, खोलीत मागे-पुढे येरझाऱ्या घालायला आरंभ केला.

"अधूनमधून कुठंतरी एखादी ज्वाला भडकून उठते. मग सैतान तिच्यावर फुंकर घालून तिला विझवतो आणि पुन्हा एकदा पूर्वीचंच रटाळ रहाटगाडगं सुरू होतं. हे कमनशीबी शहर आहे. नदी गोठून बोटी बंद व्हायच्या आत मी इथून निघून जातोय."

तो एकदम येरझाऱ्या घालायचा थांबला आणि आपले टक्कल खाजवीत त्याने विचारले:

"फक्त प्रश्न आहे—कुठं जायचं? मी पाहिली नाही अशी जागा

नाही. एकही नाही. खरंच, खूप भटकंती करून मी स्वत:ला शिणवून घेतलंय. एवढंच माझं काय ते भलं झालंय!"

तो थुंकला आणि पुढे म्हणाला :

"काय सालं आयुष्य! जगा, राबा, ताण सहन करा! आणि पदरात काहीच पडलं नाही. ना मनाच्या ना देहाच्या!"

दाराच्या कोपऱ्याशी उभे राहून कसलातरी कानोसा घेत तो थोडा वेळ गप्प बसून राहिला. मग तरातरा चालत येऊन टेबलाच्या कडेवर त्याने माझ्यापाशी बैठक मारली.

"माझ्या अलेक्सेई माक्सीमिचा, मला हे सांगायचंय गड्याः याकोवनं आपलं थोर काळीज देवापायी घालवलं ही शरमेची बाब आहे. मी नाकारलं म्हणून देव सुधारणार नाही, किंवा झारही सुधारणार नाही. लोकांनी स्वत:चाच राग केला पाहिजे आणि ते जगत असलेल्या सडक्या आयुष्याला त्यांनी "नाही" म्हटलं पाहिजे. हे खरं तर घडायला हवं! एख्! मी म्हातारा माणूस. फार उशीरा जन्मलो. आता लौकरच मी ठार आंधळा होईन. बंधू, हे फार वाईट आहे. कोट शिवून झाला? उपकार झाले माझ्यावर... चल, चहाच्या दुकानात जाऊन चहा पिऊ."

चहाच्या दुकानाकडे जाताना वाटेत अंधारात तो अडखळत होता. माझ्या खांद्याला आधारासाठी धरून तो पुढे बोलू लागला :

"माझा शब्द लक्षात ठेव. एके दिवशी लोकांची सहनशक्ती संपेल. ते भडकून उठतील आणि प्रत्येक गोष्टीचा चक्काचूर करतील. सडलेल्या सर्व फालतू गोष्टींचा भुगा भुगा करून टाकतील. लोकांची सहनशीलता संपेल!"

आम्ही चहाच्या दुकानापर्यंत पोहोचलोच नाही. नदीवरच्या खलाशांचा एक जमाव आम्हाला वाटेत आडवा आला. एका कुंटणखान्याच्या दरवाजांभोवती त्यांनी वेढा घातला होता आणि आलाफूझोव गिरणीतील कामगार त्या दरवाजांचे रक्षण करीत होते.

"दर सुटीच्या दिवशी इथं मारामारी होते," कौतुकाच्या सुरात रूबत्सोव म्हणाला आणि त्याने डोळ्यांवरचा चष्मा काढला. रक्षक पथकात आपल्या मित्रांना पाहताच तो तात्काळ लढाईत सामील झाला. आपल्या मित्रांना त्याने ओरडून उत्तेजन दिले :

"विणकरांनो, थोपवून धरा! बेडकांना चिरडून टाका! चिंगळ्यांचा कपाळमोक्ष करा! ए ऽऽ ख्!"

ह्या चतुर म्हाताऱ्याचा उत्साह चकित करणारा होता. नदीवरील खलाशांच्या गर्दीतून मोठ्या कुशलतेने तो वाट काढीत होता. बुक्क्यांचा वर्षाव चुकवीत आणि खांद्याच्या वेगवान धक्क्यांनी प्रतिस्पर्ध्यांना खाली पाडीत तो पुढे घुसत होता. खलाशी गंमतीने, दुष्टावा न बाळगता लढत होते. तो सारा मजेचा मामला होता. उतू जाणाऱ्या शक्तीला वाट मोकळी करून देण्याची ती एक तऱ्हा होती. खलाशांच्या काळ्या शरीरांच्या झुंडीने गिरणी कामगारांना एवढे मागे रेटले, की फळकुटाची दारे तडकून करकरली. आनंदाच्या आरोळ्या उमटल्या :

"त्या टकल्या शिपायाला धरा!"

दोन योद्धे घराच्या छपरावर चढले आणि त्यांनी एक फक्कड गाणे सुरू केले :

ना आम्ही चोर, ना दरोडेखोर,<br>
नाही करीत आम्ही वाटमारी.<br>
ठोंब्यांची केवळ उडवतो भंबेरी<br>
मच्छीमार आम्ही छंदकरी!

पोलीसाची कर्कश्य शिट्टी घुमली आणि अंधारात तांब्याची बटणे चमकली. पायांखाली चिखल तुडविला गेला. छपरावरील गाणे चालूच होते :

ढोल्या मालदारांच्या घरांवरी,<br>
तुडुंब भरल्या तळघरांवरी,<br>
जाळी फेकतो भराभरी<br>
ओल नाही त्या किनारी!

"पकड! खाली पडलेल्या माणसाला मारू नको!"

"आजोबा! पळा, तिकडं!"

शेवटी रूबत्सोवला, मला आणि इतर पाच-सहा लोकांना पोलीस चौकीवर नेण्यात आले. शारदीय रात्रीच्या त्या नव्या शांततेमधून त्या गाण्याचे सूर आमच्यापाठी तरंगत येत होते :

ह्रेय! जाळयात आमच्या गावली रे ऽऽ<br>
खूप खूप मासळी धरली रे ऽऽ!

"वोल्गावरच्या माणसांचा पराभव करणं शक्य नाही!" रक्त थुंकीत, दुखावलेले नाक शिंकरीत रूबत्सोव उत्तेजित स्वरात उद्‌गारला. माझ्या कानात तो कुजबुजला: "तू यातून निसट! संधी बघ आणि पळ काढ! पोलीस कोठडीत कशाला अडकून पडतोस?"

बाजूच्या गल्लीत मी धूम ठोकली. एका लंबू खलाशाने माझेच अनुकरण केले. आम्ही एका कुंपणावरून उडी मारली, आणखी एक कुंपण ओलांडले आणि... आणि माझ्या हुषार, प्रेमळ मित्राला... निकिता रूबत्सोवला ... त्यानंतर मी कधीच पाहिले नाही!

माझे आयुष्य म्हणजे एक मोठी पोकळी बनत चालले होते. विद्यार्थ्यांची चळवळ सुरू झाली होती. तिचा अर्थ मला समजत नव्हता, तिची उद्दिष्टे अथवा कार्ये मला उमगत नव्हती. तिची मला गंमत वाटत होती, पण तिच्यामागे अस्सल संघर्ष दिसत नव्हता. मला वाटत होते की, विद्यापीठात शिकण्याचे भाग्य लाभण्यासाठी छळवादसुद्धा सोसता येईल. जर मला सांगितले असते:

"तू अभ्यास करायला हरकत नाही; पण त्याबद्दल दर रविवारी निकोलायेवस्काया चौकात तुला सोटचाने मारण्यात येईल"—तर कदाचित मी त्याला राजी झालो असतो!

सेम्योनोव बेकरीत मी डोकावलो तेव्हा तेथे मला समजले की, विद्यार्थ्यांना पिटून काढण्यासाठी विद्यापीठामध्ये जाण्याची कामगारांची योजना शिजत होती.

"आम्ही आमच्याबरोबर काही लोखंडी वजनं घेणार आहोत," बेकरीमधील कामगार दुष्ट आनंदाने म्हणाले.

मी त्यांच्याशी वाद घालायचा प्रयत्न केला. पण अचानक माझी मलाच भयानक जाणीव झाली की, विद्यार्थ्यांची बाजू घेण्याची मला मुळीच इच्छा नव्हती. त्यांचे समर्थन करण्यासारखे माझ्यापाशी काहीच नव्हते. मला आठवते की, अत्यंत वाईट मन:स्थितीत, धडपडत मी तळघरातून बाहेर पडलो. माझ्या अंत:करणात अदम्य, कमालीची विध्वंसक वेदना पीडा देत होती.

रात्री खूप उशीरापर्यंत काबान नदीच्या काठी मी बसून राहिलो होतो. काळ्या पाण्यात दगड फेकण्याचा चाळा करीत असताना एकच एक विचार, त्याच त्या शब्दांमध्ये अखंडपणे मनात उमटत होता:

"मी काय करायचे?"

पोकळी भरून काढण्यासाठी मी व्हायोलिन शिकायला सुरुवात केली. रात्रीच्या वेळी तारा छेडीत बसू लागलो. पहारेकऱ्याला आणि उंदरांना वैताग देऊ लागलो. मला संगीताची आवड होती. ह्या नव्या छंदाला मी स्वतःला पूर्णतः वाहून घेतले. पण एके रात्री, संगीताचा धडा घेत असताना, काही क्षणांपुरता मी दुकानाबाहेर गेलो. थिएटरच्या वाद्यवृंदात काम करणारा माझा व्हायोलिनवादक मास्तर आतच बसला होता. माझ्या त्या छोटया अनुपस्थितीत त्याने गल्ल्याचा खण उघडला. त्या खणाला कुलूप न लावताच मी बाहेर गेलो होतो. मी दुकानात परतलो तेव्हा आपल्या खिशांमध्ये पैसे कोंबण्यात तो गुंतला होता. दारात मी उभा असलेला त्याने पाहिले तेव्हा थप्पड खाण्यासाठी त्याने मुकाटपणे आपला भकास, तुळतुळीत दाढी घोटलेला चेहरा पुढे केला. शांतपणे तो म्हणाला :

"ठीक आहे. हाण मला!"

त्याचे ओठ थरथर कापत होते आणि त्याच्या रंगहीन डोळ्यांमधून अश्रुधारा वाहात होत्या. आश्चर्य म्हणजे अश्रूंचे थेंब कमालीचे मोठे होते.

त्याला तडाखा मारण्याची मला अतीव इच्छा झाली होती. पण ती ऊर्मी दाबण्यासाठी मी माझ्या मुठी अंगाखाली दाबून मटकन फरशीवर बसलो आणि पैसे परत खणात ठेवण्याची त्याला आज्ञा केली. त्याने आपले खिसे रिकामे केले आणि तो दरवाजाकडे निघाला. पण मध्येच थांबला आणि अत्यंत तारस्वरात, वेडयासारख्या भयानक आवाजात ओरडला :

"मला दहा रूबल दे!"

मी त्याला दहा रूबल दिले. पण माझे संगीताचे शिक्षण मी थांबविले.

डिसेंबरात मी आत्महत्या करण्याचा निर्धार केला. 'मकारच्या आयुष्यातील एक घटना' नांवाच्या कथेत ह्या निर्णयाची पार्श्वभूमी वर्णन करण्याचा मी प्रयत्न केलेला आहे. पण मला त्यात यश आलेले नाही. ती कथा अगदी बेंगरूळ, अनाकर्षक बनली. तिच्यात अंतर्गत सत्याचा लवलेशही राहिला नाही. पण तरीही मला असे वाटते की, ह्या अंतर्गत सत्याचा अभाव हाच त्या कथेचा मुख्य गुण ठरला आहे. वस्तुस्थिती प्रामाणिकपणे कथन केलेली आहे. पण त्यांचा लावलेला अर्थ माझा वाटत नाही. एकूण कथेचा माझ्याशी संबंध वाटत नाही. साहित्यिक मूल्याचा

प्रश्न बाजूला ठेवला, तरी ही कथा मला एक आनंद देते – स्वतःवर विजय मिळविल्याचा!

बाजारामध्ये मी चार काडतुसे भरलेले एक रिवॉल्वर विकत घेतले आणि एक गोळी स्वतःच्या छातीवर उडविली. ती हृदयावर मारण्याचा माझा उद्देश होता, पण फुफ्फुसाला टरकावण्यापुरतेच मला यश मिळाले. महिनाभरानंतर, स्वतःच्या मूर्खपणाची खूप शरम वाटून मी परत बेकरीत कामावर दाखल झालो.

मात्र तेथे फार काळ टिकलो नाही. मार्च महिन्याच्या अखेरचे दिवस. एका संध्याकाळी बेकरीत परतलो तेव्हा दुकानामागील खोलीच्या खिडकीत खोखोल बसलेला मला आढळला. तो एक जाडजूड सिगारेट ओढीत होता आणि त्याच्या भोवतालच्या धुराच्या दाट ढगाकडे विचारमग्न होऊन पहात होता.

"तुझ्यापाशी थोडा वेळ आहे?" कोणतेही अभिवादन न करता त्याने मला विचारले.

"वीस मिनिटं!"

"बैस. मला तुझ्याशी बोलायचंय!"

नेहमीप्रमाणे त्याने आपल्या जाडयाभरडया कापडाच्या कोटाची अगदी गळ्यापर्यंतची सर्व बटणे लावलेली होती. त्याची सोनेरी दाढी त्याच्या रुंद छातीवर पसरलेली होती व त्याच्या निग्रही कपाळावर बारीक कापलेले केस ताठ पिंजारून उभे होते. त्याने जाडजूड शेतकरी बूट पायांमध्ये चढविले होते. त्या बुटांना डांबराचा उग्र वास येत होता.

त्याने शांतपणे बोलायला सुरुवात केली. "माझ्या घरी यायला तुला आवडेल का? मी क्रास्नोविदोवो खेडयात राहतो. वोल्गाच्या खालच्या अंगाला पंचेचाळीस वेर्स्ता अंतरावर. तिथं माझं एक दुकान आहे. त्या दुकानात तू मला मदत करायची. त्यात तुझा फारसा वेळ खर्च होणार नाही. माझ्यापाशी खूप पुस्तकं आहेत आणि शिक्षण घेण्यात मी तुला मदत करीन. कबूल?"

"हो."

"शुक्रवारी सकाळी सहा वाजता कूर्बातोवच्या धक्क्यावर ये आणि क्रास्नोविदोवोच्या बोटीची तिथं चौकशी कर. तिचा मालक आहे वासिली

पान्कोव. अर्थात तुला कुणापाशी चौकशी करायची गरज पडणार नाही, कारण तुझ्याआधीच मी तिथं आलेला असेन. अच्छा, चलतो."

जाण्यासाठी म्हणून तो उठला आणि हस्तांदोलनासाठी त्याने आपला रुंद पंजा माझ्यापुढे धरला. नंतर आतील खिशामधून एक जड चांदीचे घड्याळ बाहेर काढून तो म्हणाला:

"फक्त सहा मिनिटं लागली आपल्याला. अरे हो—माझं नांव रोमास. मिखायलो आन्तोनोविच. ठीक?"

अजिबात मागे वळून न पाहता ठाम पावले टाकीत तो निघून गेला. त्याचा धिप्पाड, बळकट बांधा असूनही त्याची चाल चपळ होती.

त्यानंतर दोन दिवसांनी क्रास्नोविदोवोला मी जायला निघालो.

वोल्गा नदी नुकतीच बंधनातून मुक्त झाली आहे. गढूळ पाण्यामधून राखाडी रंगाचे बर्फाचे मोठमोठे तुकडे हेलकावीत खालच्या अंगाला वाहात चालले आहेत. आमची बोट त्या बर्फखंडांना मागे टाकते आहे. ते बोटीच्या कडांना घासत आहेत, त्यांचा कडकड आवाज ऐकू येत आहे. काही तुकड्यांवर बोट आपटली म्हणजे त्यांच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होत आहेत व धारदार बर्फकणांचा फवारा उडतो आहे. वारा जोरात वाहात आहे व त्यामुळे किनाऱ्यांवर खूप उंच लाटा उठत आहेत. सूर्याची चमकती किरणे बर्फखंडांच्या काचेसारख्या निळ्या कडांवर परावर्तित होत आहेत. खोकी, पिंपे, पोती यांनी खच्चून भरलेली बोट शिडावर वेगात चालली आहे. पान्कोवने सुकाणू धरले आहे. हा तरुण शेतकरी झकपक पोषाख करून सजला आहे. त्याच्या कमावलेल्या मेंढकातडी जाकीटावर छातीशी बहुरंगी पट्ट्या विणलेल्या आहेत.

पान्कोवचा चेहरा शांत आहे, त्याचे डोळे थंड आहेत. तो अलिप्त वागतो. त्याचे एकूण वागणे शेतकऱ्याशी साधर्म्य दाखविणारे नाही. बोटीच्या पुढील भागावर हातात वाकण धरून पान्कोवचा पगारी नोकर कुकूश्किन उभा आहे. ह्या अस्वच्छ, छोट्या चणीच्या माणसाने आपल्या फाटक्या कोटाभोवती दोरखंडाचा तुकडा पट्टा म्हणून बांधला आहे. त्याची चुरगळलेली टोपी एकेकाळी कुणा पाद्रयाची असावी. कुकूश्किनच्या चेहऱ्यावर कापलेल्या आणि खरचटलेल्या वाईट जखमा आहेत. आपल्या हातामधील लांब वाकणीने वाटेत आडवे येणारे बर्फाचे तुकडे बाजूला सारीत तो संतापून गुरकावतोय.

"दूर व्हा! कुठं चाललाय?"

शिडाखाली रचलेल्या पेटयांवर मी आणि रोमास बसलो आहोत. शांतपणे तो म्हणतोय :

"शेतकऱ्यांना मी आवडत नाही – विशेषेकरून श्रीमंतांना! अर्थात त्यांच्या नावडीचा काही वाटा आता तुलाही मिळेल!"

कुकूश्किनने आपली वाकण बोटीच्या नाळेवर आडवी ठेवली आणि आपला जखमी चेहरा आमच्याकडे वळवीत दात विचकीत म्हटले :

"आन्तोनिच, तो पाद्री सगळ्यात जास्त दुस्वास करतो तुमचा!"

"खरं आहे," पान्कोवने दुजोरा दिला.

"त्या देवीचे वणवाल्या नीच माणसाला तुम्ही घशात अडकलेल्या हाडकासारखे वाटता!"

"पण मला मित्रही आहेत. ते तुझेही मित्र बनतील," खोखोल पुढे म्हणाला.

हवेत गारठा आहे. मार्च महिन्यातील चकाकणारा सूर्य फारशी ऊब देत नाही. नदीकिनाऱ्यांवरील काळी, फांद्या नसलेली झाडे डोलत आहेत. अधल्या मधल्या चरांमध्ये किंवा उंच टेकाडाच्या किनाऱ्यांवरील झुडुपांच्या ओळींमध्ये मखमाली हिमाचे पट्टे अजून शिल्लक आहेत. नदीमधील वाहत्या बर्फखंडांचे ठिपके कुरणात चरणाऱ्या मेंढयांप्रमाणे भासत आहेत. मला स्वप्नात असल्याचा भास होत आहे.

कुकूश्किनने पाईपमध्ये तंबाखू ठाशीत तत्त्वज्ञान बोलायला सुरुवात केली :

"त्या पाद्रयाची तुम्ही काही बायको नव्हे, हे खरं! पण पुस्तकांमध्ये लिहिलंय त्याप्रमाणं सर्वांवर प्रेम करणं हे त्याचं काम आहे! होय की नाही?"

"तुझ्या चेहऱ्याची अशी दशा कुणी केली?" गालात हसत रोमासने त्याला विचारले.

"तशी विशेष कुणी नाही. काही भुरटया चोरांचा हा उद्योग आहे. मला त्याचं फारसं आश्चर्य वाटत नाही," संतापाने कुकूश्किन उत्तरला. मग पुढे तो अभिमानाने म्हणाला :

"एकदा काही तोफखान्यामधल्या शिपायांनी मला बदडलं. ती बाब वेगळी होती! त्यांच्या तडाख्यातून मी जिवंत कसा सुटलो कुणास ठाऊक!"

"कशाबद्दल त्यांनी तुला मारलं?" पान्कोवने विचारले.

"केव्हा – काल? का त्या तोफखान्याच्या शिपायांनी?"

“अं ... काल!”

“आता ते कशासाठी धावून आले हे कसं सांगणार? आपली माणसं म्हणजे माजाला आलेल्या बोकडांसारखी! अगदी लहान लहान गोष्टींसाठी शिंग रोखून धडक मारणार! जणू मुठींचा वापर करणं म्हणजे त्यांचा पिढीजाद धंदाच!”

“मला वाटतं, तुझ्या लांब जिभेपायी त्यांनी तुला चोपलं. तू आपली जीभ फार सैल सोडतोस,” रोमास म्हणाला.

“हेसुद्धा बरोबर. मी फार चौकस माणूस आहे. मला सवयच आहे—लोकांना नेहमी प्रश्न विचारायची. काही नवं ऐकायला मिळालं की, मला फार फार आनंद होतो.”

बोटीचे नाक एका बर्फखंडावर वेगात आपटले. दुसऱ्या एका बर्फखंडाने बोटीची कड घाशीत आम्हाला धडकी भरविली. कुकूश्किन क्षणभर हेलपाटला, पण तात्काळ त्याने वाकण हाती धरली. पान्कोव नाराजीच्या सुरात त्याला म्हणाला:

“स्तेपान, तुझ्या कामावर नीट लक्ष ठेव.”

“मग मला उगीच बोलण्यात गुंतवू नका,” बर्फ लोटीत कुकूश्किन पुटपुटला. “एकाच वेळी काम करणं आणि तुमच्याशी गप्पा मारणं मला जमत नाही.”

त्यांनी एकमेकांची थट्टामस्करी सुरू केली. रोमास माझ्याकडे वळून म्हणाला:

“युक्रेनमधल्या माझ्या जन्मगावापेक्षा इथली माती फार वाईट आहे. पण माणसं चांगली आहेत. गुणी आहेत, समर्थ आहेत.”

मी मोठ्या आनंदाने ऐकतोय. त्याचे शांत वागणे, त्याचे साधेच पण प्रभावी बोलणे मला आवडते आहे. हा खूप शिकलेला माणूस आहे अशी मला जाणीव होतेय. ह्या माणसाने आपल्या बरोबरीच्या माणसांशी कसे वागायचे त्याची एक तऱ्हा ठरवून टाकलीय. शिवाय, मी आत्महत्येचा प्रयत्न का केला ह्याबद्दल तो मुळीच चौकशी करीत नाही, हे फार छान आहे. त्याच्या जागी दुसऱ्या कुणाही माणसाने हा प्रश्न केव्हाच मला विचारला असता; आणि ह्या प्रश्नाचा मला इतका विलक्षण कंटाळा आलाय! त्याचे उत्तर देणेही तेवढे सोपे नाही. मला आत्महत्या का करावीशी वाटली ते फक्त सैतानालाच ठाऊक! जर खोखोलने मला हा प्रश्न केला असता, तर मी त्याला काहीतरी लांबलचक मूर्ख उत्तर दिले असते. आणि आता त्याविषयी विचार

करण्याची माझी मुळीच इच्छा नाही. वोल्गा इतकी छान आहे, तेजस्वी आहे, अफाट आहे!

उंच किनाऱ्याच्या आडोशाला आम्ही आमची बोट उभी केली आहे. माझ्या डाव्या अंगाला नदीचा भव्य विस्तार आहे. समोरच्या सखल तीराच्या वाळूवर नदीच्या पात्राने आक्रमण केले आहे. नदीचे पात्र फुगताना मी पाहतोय. पाणी फुटून वाळूपलिकडील झुडुपांवर आदळते आहे. आणि त्या पाण्याला भेटण्यासाठी, जमिनीतील प्रत्येक खाचखळग्यांमधून खळखळ करीत वसंतामधील उसळते पाणी धावते आहे. सूर्य स्मित करतोय आणि त्याच्या किरणांमध्ये पिवळ्या चोचीचे डोंबकावळे उजाळा दिलेल्या पोलादासारखे निळे-काळे दिसताहेत. आपली घरटी बांधण्यासाठी त्यांची धांदल चालू आहे. उघड्या मैदानाच्या पट्ट्यांमध्ये गवताचे हिरवेगार कोंब ताठ मानेने धीटपणे सूर्याकडे पहात आहेत. माझे सारे अवयव गोठून गेलेत, पण माझ्या काळजात मात्र एक मूक आनंद भरून राहिलाय, चमकदार आशेचे कोवळे अंकुर फुटू लागले आहेत. वसंतामध्ये पृथ्वी हे एक रम्य ठिकाण आहे.

दुपारच्या प्रहरी आम्ही क्रास्नोविदोवोला पोहोचलो. एका उंच, सपाट टेकाडावर निळ्या घुमटाचे चर्च उभे होते. आणि त्या चर्चपासून टेकाडाच्या किनारीने शेतकऱ्यांची भरभक्कम, दणकट घरे उभी होती. कुणाच्या पातळ फळीच्या छपरावर सूर्याची पिवळसर किरणे चमकत होती, तर कुणाचे शाकारलेले छप्पर झळाळत होते. सारे काही साधे, नजरेला सुखावणारे.

वोल्गावरून आगबोटींमधून जाताना ह्या खेड्याकडे मी अनेकदा कौतुकाने पाहिलेले होते.

कुकूश्किनने आणि मी बोटीमधील माल उतरविण्यास आरंभ केला. एका बाजूने पोती माझ्या हाती खाली देताना रोमास उद्गारला :

"तू खरंच दणकट आहेस रे!"

आपल्या हाती धरलेल्या पोत्यावर नजर रोखीत त्याने विचारले :

"तुझ्या छातीत दुखत नाही?"

"मुळीच नाही."

प्रश्न विचारण्याची त्याची खुबी माझ्या अंतःकरणाला एकदम भिडली. माझ्या आत्महत्येच्या प्रयत्नाची बातमी शेतकऱ्यांना कळू नये अशी माझी फार इच्छा होती.

"खरंच, तू खूप दणकट आहेस. अगदी कामाला पुरून उरणारा आहेस," कुकूश्किन वाचाळपणे म्हणाला. "पोरा, कोणत्या गुबेर्नियातला तू? नीझ्नी-नवगोरोद? त्या पाणी पिणाऱ्यांपैकी का तू? मग – तुम्हाला लोक याच नांवानं ओळखतात! नीझ्नीवाल्यांना! किंवा विचारतात, 'आज समुद्रपक्षी कुठं उडाले माहीत आहे?'"

सुती सदरा आणि विजार घातलेला, कुरळ्या दाढीचा आणि दाट तांबड्या केसांचा एक उंच शेतकरी लांब ढांगा टाकीत वेगाने उतारावरून खाली आला. ओलसर चिकणमातीवर त्याची अनवाणी पावले घसरत होती आणि असंख्य ओहोळांची रुपेरी चमचम विस्कटत होती.

तीरावर पोहोचताच तो स्पष्ट आवाजात प्रेमळपणे म्हणाला: "यावं, यावं, आपल्या घरी यावं!"

आमच्या कामावर त्याने एक कटाक्ष टाकला. चटकन खाली वाकून त्याने दोन जाड बांबूचे खांब उचलले आणि किनाऱ्यापासून बोटीच्या कडेपर्यंत आडवे टाकले. मग बोटीत चढून येत त्याने हुकूम ठोकला:

"पिंपांसाठी तयार व्हा! ए पोरा, इकडं ये आणि मदत कर!"

तो खूपच देखणा होता आणि बळकट होता. त्याचे फिकट निळे डोळे खंबीरपणे चमकत होते; गाल लाल होते आणि सरळ, प्रचंड नाक होते.

"इझोत, तुला थंडी बाधेल," रोमास त्याला म्हणाला.

"कुणाला, मला? मुळीच घाबरू नका!"

रॉकेलचे एक पिंप आम्ही गडगडत किनाऱ्यावर नेले. इझोतने मला आपादमस्तक न्याहाळीत विचारले:

"दुकानात मदत करायला आलास?"

"त्याच्याशी कुस्ती खेळ," कुकूश्किन म्हणाला.

"तू पुन्हा आपलं थोबाड फोडून घेतलेलं मी पाहतोय."

"तशा माणसांशी काय करणार?"

"कशा?"

"थोबाड फोडणाऱ्या!"

"हं!" उसासा टाकून इझोत उद्गारला. रोमासकडे वळून तो म्हणाला: "आता गाड्या येतील. नदीवरून तुम्ही येत होता तेव्हाच मी पाहिलं होतं. छान वेळात आलात. आन्तोनिच, तुम्ही घरी जा. इथली व्यवस्था मी पाहतो."

रोमासशी त्याचे वागणे उघड उघड मित्रत्वाचे होते, काळजी घेणारे होते. रोमास जरी त्याच्यापेक्षा सुमारे दहा वर्षांनी मोठा होता, तरी रोमासचा तो रक्षणकर्ता वाटत होता.

अर्ध्या तासानंतर खेड्यातील एका नव्याने बांधलेल्या घरात मी प्रवेश केला. घरात अद्याप राळेचा आणि तागाचा वास येत होता. बैठकीची खोली स्वच्छ आणि आरामशीर होती. तीक्ष्ण डोळ्यांची एक शेतकरी बाई झटपट काम करीत होती, जेवणाचे टेबल मांडीत होती. उघड्या ट्रंकेमधून खोखोल पुस्तके बाहेर काढीत होता आणि चुलाण्या-जवळच्या फडताळांवर रचून ठेवीत होता.

"तुझी खोली पोटमाळ्यावर आहे," तो म्हणाला.

माझ्या पोटमाळ्यावरील खिडकीतून मला खेड्याचा काही भाग दिसत होता. आमच्या घरासमोर दाट झुडुपे माजलेली एक घळ होती. तिच्यात अधून मधून बाऱ्यांची छपरे डोकावीत होती. घळीपलिकडे फळबागा आणि काळी शेते दूर क्षितिजाजवळच्या जंगलाच्या निळ्या रेषेपर्यंत पसरली होती. बाऱ्याच्या छपरावर आपले पाय फाकून निळ्या कपड्यांमधील एक शेतकरी बसला होता. त्याच्या हातात कुऱ्हाड होती. आपल्या डोळ्यांवर हाताचा आडोसा धरून तो वोल्गा नदीकडे टक लावून पहात होता. गाड्यांच्या चाकांची खडखड ऐकू येत होती. एक गाय जोरात हंबरत होती. पाण्याच्या खळखळ आवाजाने वातावरण भरून गेले होते. संपूर्ण काळे कपडे ल्यायलेली एक म्हातारी फाटकामधून आत आली आणि मागे वळून पहात तिने जोरात शिवी हासडली:

"तळपट होवो तुमचं मेल्यांनो!"

दगडांच्या आणि चिखलाच्या साह्याने एका ओहोळाला बांध घालण्याच्या उद्योगात गुंतलेली दोन लहान मुले तिच्या आवाजासरशी दचकली आणि शक्य तितक्या वेगाने त्यांनी धूम ठोकली. म्हातारीने लाकडाचा एक ढलपा उचलला, त्यावर ती थुंकली आणि तिने तो ओहोळात टाकला. मग त्या मुलांनी बांधलेल्या धरणावर तिने आपला अवजड पुरुषी बुटांमधील पाय ठेवून ते चेचले आणि उतारावरून ती वोल्गाच्या दिशेने निघाली.

माझ्या वाट्याला येथे कोणत्या प्रकारचे आयुष्य वाट पहात होते?

जेवणासाठी मला बोलावणे आले. खालच्या मजल्यावर इझोत टेबलाशी पाय पसरून बसलेला मला आढळला. त्याचे अनवाणी पाय

निळसर लाल रंगाचे होते. तो रोमासबरोबर बोलत होता. पण मी खोलीत जाताच त्याने एकदम आपले बोलणे थांबविले.

"अरे, काय झालं?" रोमासने तोंड वाकडे करीत विचारले. "बोल पुढं!"

"बस्स, एवढंच! मग ठरलं तर. आपण आपली व्यवस्था बघायची. तुम्ही एक रिवॉल्वर जवळ बाळगा, नाही तर चांगला जाडजूड सोटा घेऊन बाहेर जात जा. बारीनोव भोवती असेल तेव्हा फार बोलू नका. त्याची आणि त्या कुकूश्किनची – दोघांच्या जिभा बायकांप्रमाणे लांब आहेत. ए पोरा, तुला मासे पकडायला आवडतं का?"

"नाही."

फळांची पैदास करणाऱ्या छोटचा शेतकऱ्यांना संघटित करण्याच्या गरजेबद्दल, मोठचा खरेदीदारांच्या कचाटचातून त्यांना मुक्त करण्याच्या आवश्यकतेबद्दल बोलायला रोमासने सुरुवात केली. इझोत लक्षपूर्वक ऐकत होता. शेवटी तो म्हणाला:

"ढेरपोटे तुम्हाला मुळीच शांतता लाभू देणार नाहीत."

"बघू या."

"माझे शब्द लक्षात ठेवा!"

इझोतला पाहताना माझ्या मनात आले:

"अशा शेतकऱ्यांवरून कारोनिन आणि झ्लातोव्रातस्की आपल्या कहाण्यांमधील पात्रे रंगवीत असले पाहिजेत."

खरोखरच येथे मी खात्रीलायक संपर्कात आलो असणे शक्य होते का? काहीतरी घडविणाऱ्या लोकांबरोबर मी आता काम करणार होतो का?

आपले जेवण संपवीत इझोत म्हणाला:

"मिखायलो आन्तोनोविच, गोष्टींची घाई करू नका. चांगली गोष्ट कधीही लौकर घडत नाही. तुम्हाला सावकाशीनंच घेतलं पाहिजे."

तो निघून गेल्यानंतर रोमास चिंतनपर सुरात म्हणाला:

"हा मोठा हुषार माणूस आहे. आणि प्रामाणिक. दुर्दैवानं निरक्षर आहे. जेमतेम वाचायला येतं. पण शिकण्याची धडपड खूप करतो. त्याला त्यात तू मदत करू शकशील."

दुकानामधील मालाच्या किंमती ठरविण्यात आम्ही संध्याकाळपर्यंत गुंतलो. रोमास मला म्हणाला:

"इथल्या दुसऱ्या दोन दुकानदारांपेक्षा मी जास्त स्वस्त विकतो आणि अर्थातच त्यांना हे आवडत नाही. मला ते हरतऱ्हांनी त्रास देतात. आता मला बदडून काढण्याचा त्यांचा बेत शिजतोय. इथं मी काही व्यापाराच्या किंवा नफा मिळवण्याच्या लालचीनं राहिलो नाही. त्याला दुसरी कारणं आहेत. तुझ्या त्या बेकरीसारखंच हे माझं दुकान आहे."

मी ही गोष्ट तर्काने एव्हाना जाणल्याचे त्याला सांगितले.

"अर्थात. लोकांना काहीही करून शिकवलं पाहिजे! होय की नाही?"

आम्ही दुकानाला कुलूप घातले होते आणि झडपा खाली ओढून घेतल्या होत्या. हातात दिवा घेऊन आम्ही एका फडताळापासून दुसऱ्या फडताळापर्यंत जात होतो. आणि दुकानाबाहेर, आमच्या हालचालींचा कानोसा घेत कुणीतरी आमच्या पाठोपाठ फिरत होते. चिखलात दबल्या जाणाऱ्या सावध पावलांचा आवाज आम्हाला ऐकू येत होता. किंवा व्हरांड्यात जोराने दणदण पाय वाजत होते.

"हे बघ, ऐकलंस त्याला? हा मिगुन आहे. एकटा आहे. ना जमीन ना नातेवाईक. अगदी दुष्ट पशू आहे. सुंदर पोरीला रंगढंग करायला जसं आवडतं, तसं वाईट गोष्टी करायला ह्याला आवडतं. त्याच्याशी बोलताना काळजी घेत जा. आणि केवळ त्याच्याशीच नव्हे, तर सगळ्यांशी!"

नंतर रोमासने पुन्हा बैठकीच्या खोलीत आरामशीर आसन ठोकले. चुलाण्याला आपली रुंद पाठ टेकवून त्याने आपला पाईप पेटविला. आपल्या दाढीत धुराचे छोटे पुंजके सोडीत, विचारमग्न होऊन डोळे किलकिले करीत, हळूहळू शब्द जमवून स्पष्ट व साध्या भाषणाला त्याने आरंभ केला. तो म्हणाला की, मी माझे तारुण्य कसे वाया घालवीत होतो हे तो खूप काळापासून पहात होता.

"तुझ्यात धमक आहे आणि चिकाटी आहे. तुझ्या ध्येयांचं कौतुक केलं पाहिजे. फक्त तुला अभ्यास करण्याची गरज आहे. मात्र त्या अभ्यासामुळं तुझ्यात आणि तुझ्या भोवतालच्या लोकांमध्ये पुस्तकं ही अडथळा ठरू नयेत. एकदा एका म्हाताऱ्या सांप्रदायिकानं अगदी सार्थपणं म्हटलं होतं: 'शिकविण्यात आणि शिकण्यात येणारी प्रत्येक गोष्ट माणसापासून निर्माण होते.' पुस्तकांपेक्षा माणसं जे शिकवतात ते फार

वेदनादायी असतं. ते शिकवणं फार कठोर असतं. पण त्या पद्धतीनं शिकलेल्या गोष्टी डोक्यात घट्ट मूळ धरतात."

शेतकऱ्यांना सर्वप्रथम जाग आणली पाहिजे हा परिचित विचार त्याने नंतर व्यक्त केला. पण ह्या परिचित शब्दांमध्ये आता मला नवे आणि सखोल महत्त्व जाणवले.

"तुझे ते शहरातले विद्यार्थी... लोकांवर प्रेम करण्याबद्दल बरीच बडबड करतात. पण मी त्यांना सांगतो, की तसं करणं शक्य नाही. लोकांवर प्रेम करणं शक्य नाही. असलं प्रेम म्हणजे निव्वळ बकबक आहे."

माझ्याकडे चौकस कटाक्ष टाकून तो गालातल्या गालात हसला. आता त्याने खोलीत येरझाऱ्या घालायला आरंभ केला. कळकळीने, प्रभावीपणे तो पुढे बोलू लागला:

"प्रेम म्हणजे काय: एकमत होणं, लीनपणं वागणं, दुर्लक्ष करणं, क्षमा करणं. बाईवर तुम्ही प्रेम करता तेव्हा ह्या सगळ्या गोष्टी छान आहेत. पण लोकांच्या बाबतीत कसं शक्य आहे? लोकांच्या अज्ञानाकडं आपण दुर्लक्ष करू शकतो? त्यांच्या भ्रमांशी सहमत होऊ शकतो? त्याच्या प्रत्येक क्षुद्रतेविषयी लीनपणा धरू शकतो? त्यांच्या पाशवी वर्तनाला क्षमा करू शकतो? हे आपण सारं करू शकतो?"

"नाही."

"अर्थातच नाही! शहरातले तुझे मित्र फक्त नेक्रासोव* वाचतात, नेक्रासोव गातात. पण मी एवढंच म्हणू शकतो की, नेक्रासोव फार काळ पुरणार नाही. आपण शेतकऱ्याला सांगणं भाग आहे–'हे बघ बंधू, तसा तू काही वाईट माणूस नाहीस. पण तू जे आयुष्य जगतो आहेस ते वाईट आहे. आणि ते अधिक सोपं, अधिक चांगलं कसं करावं, याची तुला अजिबात माहिती नाही. आपल्या गरजा अधिक सुजाणपणं कशा भागवायच्या हे तुझ्यापेक्षा जंगली जनावराला सुद्धा जास्त कळतं. तुझ्यापेक्षा ते आपलं संरक्षण अधिक चांगलं करतं. आणि तरीही शेतकऱ्यांनो, साऱ्या गोष्टींचा उगम तुमच्यात आहे. उमराव, पाद्री, पंडित, झार–पूर्वी हे सगळे शेतकरीच होते. पाहिलंत? स्पष्ट समजलं? ठीक तर, आता अशा रीतीनं जगायला शिका, की कुणी तुम्हाला पायदळी तुडवू शकणार नाही!'"

---

*प्रख्यात रशियन कवी.

तो स्वयंपाकघरात गेला आणि त्याने समोवार गरम करायला सांगितले. मग परत खोलीत येऊन त्याने मला आपली पुस्तके दाखवायला आरंभ केला. बहुतेक पुस्तके या ना त्या शास्त्रावरील होती. बोकल, ल्यायेल, हार्टपोल, लेकी, ल्येबॉक, टेलर, मिल, स्पेन्सर, डार्विन हे लेखक तेथे होते. रशियन लेखकांमध्ये पीसारेव, दब्रोल्यूबोव, चेर्नीशेवस्की, पूश्कीन, नेक्रासोव यांचा समावेश होता. गोन्चारोवचे 'फ्रिगेट पाल्लादा' होते.

अनेक मांजरीची पिल्ले कुरवाळावी त्याप्रमाणे रोमास आपल्या रुंद पंजाने त्या पुस्तकांची वेष्टणे प्रेमळपणे कुरवाळीत होता. तो पुटपुटला:

"सगळी छान पुस्तकं आहेत! हे बघ, खूप दुर्मीळ आहे. हे जाळून टाकायचा सेन्सॉरचा हुकूम होता. शासनसंस्था म्हणजे खरोखर काय हे तुला समजावून घ्यायचं असेल तर हे वाच."

हॉब्जचे 'लेवियाथान' त्याने माझ्या हवाली केले.

"हेसुद्धा शासनसंस्थेविषयी आहे. पण जरा हलकंफुलकं आहे, मनोरंजक आहे."

ते मनोरंजक पुस्तक म्हणजे मॅकियाव्हिलीचे 'ला प्रिन्सिप' होते.

चहा पिताना रोमासने थोडक्यात स्वतःबद्दल माहिती सांगितली. चेर्नीगोवच्या लोहाराचा तो मुलगा होता. कीव्ह रेल्वे स्टेशनवर तारेची गुंडाळी वाहून नेण्याचे काम करीत असताना तो क्रांतिकारकांच्या सहवासात आला. तेथे त्याने कामगारांचा अभ्यास गट स्थापन केला. नंतर त्याला अटक झाली आणि दोन वर्षे तुरुंगात काढल्यानंतर, दहा वर्षांसाठी याकूत्स्क प्रदेशात हद्दपार करण्यात आले.

"सुरुवातीला मला वाटलं की, त्या याकूत उलसवस्तीत माझी अखेर होणार! तिथला हिवाळा एवढा भयंकर होता की, माणसाचा मेंदू त्याच्या डोक्यातच गोठतोय असं वाटायचं. आणि एकूण तिथं मेंदूला फारशी किंमतच नव्हती. पण नंतर मला आढळलं की, या ना त्या उलसमध्ये काही रशियन होते. त्यांची संख्या अगदी थोडी होती आणि खूप दूर दूर अंतरावर ते होते हे खरे असले, तरी ते तेथे होते हे महत्त्वाचं! जास्त जास्त लोकांना तिकडं हद्दपार करण्यात येऊ लागलं, तसं आम्हाला एकाकी वाटेनासं झालं. फार छान माणसं होती! व्लादीमिर कोरोलेन्को नांवाचा एक विद्यार्थी होता. माझ्यानंतर लौकरच त्याचीही मुदत संपली. काही काळ आम्ही चांगले मित्र होतो, पण

नंतर आमच्यात दुरावा आला. अनेक बाबतीत आमच्यात साम्य होतं आणि साम्यावर आधारलेली मैत्री फार काळ टिकत नाही, असं दिसतं. पण तो नेक आहे, चिकाटीचा आहे. कुठल्याही कामात हुषार आहे. पुतळ्या रंगवण्याचं सुद्धा त्यानं काम केलं. मला ते आवडलं नाही. असं म्हणतात की, आता तो साहित्यिक मासिकांसाठी लिहितो आणि चांगलं लिहितो!"

त्या संध्याकाळी रोमास खूप वेळपर्यंत बोलत होता. मध्यरात्रीपर्यंत. माझे स्थान त्याच्या शेजारी होते हे आरंभापासूनच ठामपणे माझ्या ध्यानात यावे, हा त्याचा हेतू स्पष्ट दिसत होता. मैत्रीचा एवढा गहिरा आनंद यापूर्वी मी अनुभवला नव्हता. माझ्या आत्महत्येच्या प्रयत्नानंतर, माझे स्वतःचेच स्वतःविषयीचे मत वाईट बनले होते. मी स्वतःला रेम्याडोक्या, क्षुद्र प्राणी समजू लागलो होतो. अपराधी भावना मला खात होती आणि जगण्याची लाज वाटत होती. हा रोमास अंतर्ज्ञानी असावा. आपले स्वतःचे आयुष्य खुबीने माझ्यापुढे खुले करून त्याने माझ्या मनाचा तोल पुन्हा सावरला होता. एक अविस्मरणीय दिवस!

रविवारी चर्चमधील प्रार्थना संपल्यावर आम्ही दुकान उघडले आणि लोकांची आमच्या व्हरांड्यात ताबडतोब गर्दी जमू लागली. सर्वांत प्रथम अवतरला मत्वेई बारीनोव. घाणेरडा, विस्कटलेला अवतार. माकडासारखे लांब हात आणि देखण्या, बायकी डोळ्यांमध्ये हरवलेपणा.

"शहरची काय नवी खबर?" रोमासला अभिवादन केल्यानंतर त्याने विचारले आणि उत्तराची वाट न पाहता समोरून येणाऱ्या कुकूश्किनला त्याने साद घातली.

"स्तेपान, तुझ्या मांजरांनी आणखी एक कोंबडा मारला!"

दुसऱ्याच क्षणी तो आम्हाला माहिती सांगत होता की, गव्हर्नर कझानहून सेंट पीटर्सबुर्गला गेला होता. सर्व तातारांना कॉकेशसमध्ये आणि तुर्कस्तानमध्ये हलविण्याचा हुकूम मिळविण्यासाठी गव्हर्नर झारला भेटणार होता. "हुषार माणूस! स्वतःचं काम उत्तम जाणतो."

"तुझ्या डोक्यातून निघालंय हे सगळं," रोमासने शांतपणे त्याला सांगितले.

"माझ्या? केव्हा?"

"ते मला ठाऊक नाही."

"आन्तोनिच, अर्थात तुमचा माणसावर कधीच विश्वास बसत नाही,"

रोषाने मान हलवीत बारीनोव म्हणाला. "मला तर तातारांबद्दल खूप वाईट वाटतं. कॉकेशसमध्ये राहणं सोपं नाही."

एक सडपातळ, लहान चणीचा माणूस अंग चोरीत अदबीने वर आला. त्याच्या अंगात चिंध्या झालेला कोट होता. तो कोट कुणा मोठ्या शरीरवाल्या माणसाचा असावा हे उघड दिसत होते. त्याच्या शुष्क चेहऱ्याला घाबरट दचकण्यामुळे एक विरूपता आली होती. त्याच्या जाड विलग ओठांमधून केविलवाणे स्मित उमटले होते. त्याचा डावा डोळा सतत उघडझाप करीत होता आणि दरवेळी त्या डोळ्यावरील जखमेची खूण असलेली पांढरी भुवई थरारत होती.

"अरेच्चा, हा तर मिगुन आला!" बारीनोव उपहासाने म्हणाला. "काल रात्री काय चोरलंस?"

"तुझे पैसे!" मिगुनने स्पष्ट, खणखणीत आवाजात प्रत्युत्तर केले व टोपीला बोट टेकवून रोमासला अभिवादन केले.

आमचा घरमालक आणि शेजारी पान्कोव बाहेर आला. त्याने अंगात शहरी धाटणीचा कोट चढविला होता, गळ्याभोवती लाल रुमाल बांधला होता, पायात चकचकीत बूट चढविले होते. लगामाच्या जोडी-एवढ्या लांबीची चांदीची साखळी त्याच्या छातीवर रुळत होती. मिगुनला कठोर नजरेने आपादमस्तक न्याहाळून तो म्हणाला:

"पुन्हा माझ्या भाजीच्या वाफ्यांमध्ये घुसलास तर तुला दांडक्यानं तिंबून काढीन म्हाताऱ्या सैताना!"

"नेहमीचंच आहे," शांतपणे मिगुन उद्गारला आणि सुस्कारा टाकून पुढे म्हणाला, "कुणाची तरी खोपडी फोडली नाही, तर तुम्हाला आयुष्य नीरस वाटतं!"

पान्कोव त्याच्यावर रागाने ओरडू लागला, पण मिगुन पुढे म्हणाला:

"आणि मी म्हातारा आहे असं कोण म्हणतं? आँ? शेहेचाळीस — म्हणजे म्हातारा?"

"गेल्या नाताळात तुझं वय त्रेपन्न होतं," बारीनोव ओरडला. "तू स्वतःच म्हणाला होतास की, त्रेपन्न वर्षांचा आहेस! खोटं कशाला बोलतोस?"

सूस्लोव* आला. प्रतिष्ठित, दाढीवाला म्हातारा. मग इझोत

---

*शेतकऱ्यांची आडनांवे मला स्पष्ट आठवत नाहीत. कदाचित मी त्यांचा गोंधळ केलाय किंवा त्यांच्यात फरक केलाय. — लेखक.

मच्छीमार आणि इतर काही मिळून सुमारे दहा लोक आले. खोखोल व्हरांड्यात दुकानाच्या दाराशी बसून पाईप ओढीत शांतपणे शेतकऱ्यांचे संभाषण ऐकू लागला. व्हरांड्यातील पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंच्या बाकड्यांवर शेतकरी मंडळींनी बैठका मारल्या होत्या.

तो थंड, चित्रविचित्र दिवस होता. निळ्या आकाशामधून ढग वेगाने जात होते. हिवाळी थंडीनंतर अजून ते वितळले नव्हते असे भासत होते. डबक्यांमध्ये आणि ओहोळांमध्ये ऊन-सावलीचा मजेदार खेळ चालला होता. कधी डोळे दिपून जात, तर कधी डोळ्यांना मखमाली स्पर्शाचे सुख लाभे. सणासुदीचे रंगीत कपडे घालून मुलीबाळी रस्त्यावरून तरंगत तरंगत वोल्गाकडे चालल्या होत्या. डबकी ओलांडताना त्या आपले लांब झगे वर उचलत होत्या आणि कडक, जाड कातड्याचे त्यांचे बूट त्यावेळी उघडे पडत होते. खांद्यांवर वेड्यावाकड्या गळाच्या छड्या टाकून छोटी मुले धावत होती. मंद चालीने जाणारे शेतकरी आमच्या दुकानाबाहेरील घोळक्याकडे तिरपे कटाक्ष टाकीत होते आणि आपल्या टोप्या अथवा जाड नमदी टोप्या किंचित उचलून अभिवादन करीत होते.

मिगुन आणि कुकूश्किन यांच्यात एका अनिर्णित प्रश्नावर गंमतीचा वाद सुरू होता: व्यापारी जास्त जोरात मारतात, का जमीनदार? कुकूश्किन व्यापाऱ्यांची बाजू घेत होता, तर मिगुन जमीनदाराचा कैवार घेत होता. त्याच्या खणखणीत आवाजाने कुकूश्किनच्या चाचरत्या बोलण्यावर मात केली होती.

"श्रीमान फिन्गेरोवच्या पिताजींनी नेपोलियन बोनापार्टचे कल्ले खेचले होते. आणि श्रीमान फिन्गेरोव कुणाही दोन माणसांना कोटाच्या कॉलरना धरून खेचत, त्यांना झटका देऊन बाजूला करत आणि दोघांची टाळकी एकमेकांवर आपटत! ओंडक्यासारखे खाली पडायचे दोघे! समजलं महाराजा!"

कुकूश्किन त्याच्याशी सहमत झाला. पण पुढे म्हणाला: "पण काही झालं तरी व्यापारी हा एखाद्या सभ्य माणसापेक्षा जास्त खातो."

वरच्या पायरीवर बसलेला देखणा म्हातारा सूस्लोव कुरबुरला: "मिखायलो आन्तोनोविच, शेतकऱ्यांच्या पायांखालचा आधार निसटतोय. जमीनदारांच्या अमदानीत कुणाला स्वस्थ आळसानं बसायला मिळत नव्हतं, प्रत्येकाला काम होतं आणि त्याला ते करावं लागायचं."

"भूदासपद्धती परत आणा, असा तक्रारअर्ज का नाही पाठवत?" इझोतने टोमणा मारला. रोमासने त्याच्याकडे एक मूक कटाक्ष टाकला आणि कठड्यावर आपला पाईप हलकेच आपटायला सुरुवात केली.

तो बोलायला केव्हा आरंभ करतो याची मी वाट पहात राहिलो. शेतकऱ्यांचे ते असंबद्ध बोलणे ऐकत असताना, खोखोल त्यावर काय म्हणेल याचा मी तर्क बांधू लागलो. संभाषणात भाग घेण्याच्या अनेक संधी त्याने एव्हाना गमावल्या होत्या असे मला वाटले. पण तो तटस्थपणे गप्प होता. मूर्तीप्रमाणे स्तब्ध बसून होता. डबक्यांमधील पाण्याला सोसाटयाचा वारा किंचित डहुळत होता आणि आकाशात ढगांना पळवून त्यांचा एक मोठा काळा पुंजका बनवीत होता, तिकडे पहात होता. खाली नदीवर एका आगबोटीने शिटी मारली. अॅकॉर्डियनच्या साथीवर उंच स्वरात गाणाऱ्या मुलींचे आवाज उतारावरून वर तरंगत आले. एक दारूडा उचक्या देत आणि आरडाओरड करीत रस्त्यावरून येत होता. त्याचे हातवारे जोरजोरात चालू होते आणि त्याचे पाय चमत्कारीक-पणे वाकत होते. डबक्यांमध्ये तो ठेचकाळत होता. शेतकऱ्यांचे बोलणे खालच्या आवाजांमध्ये चालू होते. त्यांच्या शब्दांमधून भयाण खिन्नता उमटत होती. मलासुद्धा आतून विषण्णपणा आला होता. त्याचे कारण थंडावल्या आकाशातून कोणत्याही क्षणी पावसाच्या सरी कोसळण्याची शक्यता होती आणि माझे मन शहरामधील अखंड आवाजांच्या कल्लोळाकडे मागे भरकटत चालले होते; शहरचे विविध आवाज, माणसांची रस्त्यांमधील लगबग, जलद भाषा, विचारप्रक्षोभक शब्दांचे वैपुल्य – ह्या साऱ्या साऱ्या गोष्टी आठवीत होते.

चहाच्या वेळी मी खोखोलला विचारले: "तुम्ही शेतकऱ्यांशी केव्हा बोलणं करता?"

"बोलणं? कशाबद्दल?"

माझा खुलासा अत्यंत लक्षपूर्वक ऐकल्यानंतर तो म्हणाला: "त्याचं असं आहे – ह्या गोष्टी मी त्यांच्याशी बोललो आणि तेसुद्धा भर रस्त्यात, तर मला पुन्हा एकदा याकूत लोकांबरोबर रहायला पाठवतील."

त्याने पाईपमध्ये तंबाखू भरली, तो पेटविला आणि त्याच्याभोवती धुराची दाट वलये निघेपर्यंत तो झुरके मारीत राहिला. मग त्याने शांतपणे, अविस्मरणीयपणे बोलायला आरंभ केला. तो म्हणाला की, शेतकरी हा सावध आणि संशयी असतो. तो स्वतःवर विश्वास ठेवीत

नाही, शेजाऱ्यांवर विश्वास टाकीत नाही आणि अनोळखी माणसावर तर मुळीच विश्वासत नाही. त्याला स्वातंत्र्य मिळून अजून तीस वर्षे पूर्ण झालेली नाहीत. चाळीशीचा प्रत्येक शेतकरी हा भूदास म्हणून जन्माला आला होता व त्याची त्याला आठवण आहे. हे स्वातंत्र्य म्हणजे काय ते कळणे फार कठीण आहे. जर त्याकडे साध्या दृष्टिकोनातून पाहिले तर वाटते: मला आवडते तसा मी जगतो! पण कुठेही जा, तुम्हाला अधिकाऱ्यांना, सत्ताधाऱ्यांना तोंड द्यावे लागते. आणि तुमच्या मनाप्रमाणे जगण्याच्या वाटेत ते अडथळा आणतात. झारने शेतकऱ्यांना जमीनदारांपासून दूर खेचून नेले. म्हणून झार हाच आता सबंध शेतकरीवर्गाचा एकमेव मालक आहे असे वाटेल. पण पुन्हा – ह्या स्वातंत्र्याचे काय? एखादा दिवस अनपेक्षितपणे असा उजाडेल, त्या दिवशी झार त्याचा अर्थ सांगेल. सर्व भूमीचा आणि सर्व संपत्तीचा एकमेव मालक असलेल्या झारवर शेतकऱ्याची अपार श्रद्धा आहे. झारने शेतकऱ्यांना जमीनदारांपासून हिसकावून घेतले; आणि व्यापाऱ्यांकडून जहाजे व दुकाने तो हिसकावून घेण्याची शक्यता आहे. शेतकरी हा झारवादी आहे. त्याला वाटते: अनेक मालक असणे वाईट; एक मालक म्हणजे त्यापेक्षा कमी वाईट. स्वातंत्र्याचा खरा अर्थ झार आपल्याला एक दिवस समजावून देईल म्हणून तो वाट पहात आहे. तोवर प्रत्येक माणूस जमेल तेवढे ओरबाडून घेत आहे. प्रत्येकजण त्या दिवसाची उत्सुकतेने वाट पहात आहे आणि तरीही प्रत्येकाला त्या दिवसाची भीती वाटते आहे. सार्वत्रिक फेरवाटपाचा तो निर्णायक दिवस चुकणार तर नाही ना, अशा गुप्त हुरहुरीत प्रत्येकजण जगत आहे. आणि प्रत्येकाचा आपल्या स्वतःच्या क्षमतांवर विश्वास नाही. त्याला खूप हवे आहे आणि घेण्यासारखे खूप आहे. पण तो घेणार कसा? प्रत्येकाला नेमक्या ह्याच गोष्टी हव्या आहेत. म्हणून कुठेही वळा, अखंडपणे अधिकारी समोर ठाकतात. शेतकऱ्याशी ते उघड वैराने वागतात आणि हो, झारशी सुद्धा! पण अधिकाऱ्यांविना तुमचे चालतही नाही. लोक एकमेकांची नरडी धरतील.

वसंतामधील पावसाचे जोरदार सपकारे वाऱ्यामुळे आमच्या खिडक्यांच्या तावदानांवर आपटत होते. बाहेरचे जग भुरकट काळोखाने दाटून गेले होते. माझ्या अंतःकरणात भयाण उदासीनता भरली होती. रोमासचा गंभीर, शांत आवाज पुढे उमटत होता:

"झारची सत्ता हळू हळू, टप्प्या टप्प्यानं आपण हाती घ्यायला शिकलं पाहिजे, हे शेतकऱ्याला समजावून द्या. आपल्यामधूनच आपले अधिकारी निवडून देण्याचा हक्क लोकांना असला पाहिजे, हे त्याला समजावून सांगा. आपले स्तानोवोय,* आपला गव्हर्नर आणि झारसुद्धा निवडण्याचा लोकांना हक्क पाहिजे..."

"तसं घडायला शंभर वर्षं लागतील!"

"मग तुला काय वाटलं–त्रिमूर्ती रविवारला घडेल?" खोखोलने गंभीरपणे विचारले.

सायंकाळी तो कुठेतरी बाहेर गेला होता. रात्री अकराच्या सुमाराला अगदी घराजवळच, रस्त्यावर गोळी उडाल्याचा आवाज मी ऐकला. पावसात आणि अंधारातच मी बाहेर धावलो. फाटकामधून मिखायलो आन्तोनोविच आत येत असलेला मी पाहिला. वाटेत आडवे येणारे पाण्याचे ओहळ काळजीपूर्वक चुकवीत, धीमेपणाने त्याची धिप्पाड, काळी आकृती येत होती.

"बाहेर कशासाठी आलास? बार ऐकून? मी उडवली ती गोळी!"

"काय झालं?"

"खाली रस्त्यावर काही माणसं सोटे घेऊन मला मारायला आली. मी त्यांना म्हटलं–सोटे खाली टाका, नाही तर गोळी झाडीन. पण त्यांनी ऐकलं नाही. म्हणून मी वर हवेत एक बार उडवला. हवेला काही तुम्ही जखमी करू शकत नाही!"

आपले ओले कपडे काढण्यासाठी तो दारातच थांबला. त्याने आपली दाढी पिळली, डोके गदगदा हलविले व घोड्यांप्रमाणे फुर फुर आवाज काढला.

"माझ्या बुटांना भोकं पडलेली दिसतात. बदलले पाहिजेत. तुला रिवॉल्वर साफ करता येतं? मग माझ्यावर उपकार कर. त्याला गंज चढायच्या आत रॉकेल माख."

त्याच्या राखाडी डोळ्यांमधील ह्या शांत निर्मळतेचे, मुग्ध निग्रहाचे मला खूप कौतुक वाटले. आम्ही आत गेलो. आरशासमोर उभे राहून आपली दाढी विंचरीत असताना त्याने मला इशारा दिला:

---

*स्तानोवोय–स्तानमधील (ऊयेझ्द अथवा पेठेतील उपविभाग) प्रमुख पोलीस अधिकारी.–अनु.

"घराबाहेर, विशेषत: संध्याकाळचा आणि सणासुदीला सावध रहा. तुलासुद्धा चोपण्याचा त्यांचा इरादा असावा. मात्र हातात काठी घेऊन फिरू नको. अशा गोष्टी गुंडांची माथी आणखी भडकवतात. आणि तू घाबरलास असा त्यांचा त्यामुळं समज होईल. खरं म्हणजे घाबरण्यासारखं काहीही नाही. ते लेकाचे भित्रे आहेत!"

एका प्रसन्न आयुष्याची माझ्या दृष्टीने सुरुवात झाली. प्रत्येक दिवस काही ना काही नवे व महत्त्वाचे घेऊन येत होता. निसर्गशास्त्रांवरील पुस्तके अधीरपणे वाचण्यात मी गढून गेलो. कारण रोमासने सल्ला दिला होता:

"माक्सीमिच, हे सर्वांत प्रथम तू माहीत करून घेतलं पाहिजे. सर्व उत्तम गोष्टींना. माणसाच्या सर्वोत्तम तर्कशक्ती ह्या शास्त्रांपायी खर्ची पडल्या आहेत."

आठवड्यातून तीन संध्याकाळी मी इझोतला लिहा-वाचायला शिकवीत होतो. प्रथम माझ्याविषयी तो संशयाने वागत होता. माझ्या सूचना काहीशा उपहासाने स्वीकारीत होता. पण काही धड्यांनंतर मात्र तो गंमतीने म्हणाला:

"पोरा, या कामात तू तरबेज आहेस. तू मास्तर व्हायला पाहिजेस!"

अचानकपणे त्याने सुचविले: "तू तर चांगला भक्कम दिसतोस. खेचाखेचीचा खेळ खेळू या?"

स्वयंपाकघरातून आम्ही एक काठी पैदा केली. एकमेकांच्या पायाला पाय लावून फरशीवर बसलो आणि प्रत्येकाने दोन्ही हातांनी काठी गच्च पकडली. थोडा वेळपर्यंत आम्ही एकमेकाला फरशीवरून उचलण्याचा निष्फळ झगडा केला. खोखोल गालातल्या गालात हसून आम्हाला चिथावत होता:

"हं! शाब्बास! उचल त्याला!"

शेवटी इझोतने मला वर खेचले. त्यामुळे तो अधिकच माझा कैवारी बनला.

"काही हरकत नाही," तो मला म्हणाला. "तू चांगला बळकट आहेस. तुला मासे धरायला आवडत नाही हे फार वाईट. नाहीतर माझ्याबरोबर वोल्गावर आला असतास! रात्रीच्या वेळी वोल्गावर राहणं म्हणजे स्वर्ग आहे स्वर्ग!"

तो मन लावून अभ्यास करीत होता आणि त्याची चांगली प्रगती

होत होती. स्वतःच्या ज्ञानाविषयी त्याचे त्यालाच आश्चर्य वाटू लागले होते. काहीवेळा धडा चालू असतानाच अचानकपणे तो उडी मारून उठायचा, फडताळांमधले एखादे पुस्तक काढायचा, आपल्या भुवया कमानदार करून, आवाज कष्टाने ताणून त्या पुस्तकामधील दोन-तीन ओळी मोठ्यांदा वाचायचा. मग एकदम लाजायचा आणि माझ्याकडे वळून चकित सुरात म्हणायचा:

"मला वाचता येतं! हे असलं कधी तू ऐकलंयस?" आणि मग डोळे मिटून तो त्या ओळी पुन्हा म्हणायचा:

> सपाट मैदानी पाणलाव्या
> पक्षी करतो भयाण कंठशोष,
> जसं मातेचं काळीज लाडक्या
> बाळाच्या थडग्याशी करतं आक्रोश...

"कसं काय वाटलं तुला?"

काही वेळा अस्फुट आवाजात सावधपणे त्याने मला विचारले: "बंधू, हे तू मला समजावून देशील का? हे कसं काय होतं? माणूस ह्या छोट्या वेड्यावाकड्या रेषा बघतो आणि त्यांचे शब्द बनतात! आणि हे शब्द मला ठाऊक आहेत! आपण नेहमी वापरतो तेच शब्द! पण ते मला कसे ठाऊक झाले? कुणीही माझ्या कानात त्यांना हळूच सांगितलं नाही. ही चित्रं असती तर बाब वेगळी! मी त्यांना समजू शकलो असतो. पण हे म्हणजे... जणू काही कुणाचे विचार मी इथं ह्या पानावर छापलेले पाहतोय. हे कसं काय घडतं?"

मी त्याला काय उत्तर देणार? "मला माहीत नाही" असे मी म्हटले की, त्याला खूप दुःख होई.

"जादूटोणा आहे!" तो उसासा टाकून म्हणायचा आणि छापील पाने उजेडात धरायचा.

एखाद्या लहान मुलाप्रमाणे त्याच्यात प्रसन्न, भावस्पर्शी भाबडेपणा होता. एक प्रकारचे पारदर्शीपण होते. त्याला पाहिले म्हणजे पुस्तकांमध्ये वाचनात आलेल्या काल्पनिक शेतकऱ्याची मला फार फार आठवण यायची. बहुतेक मच्छीमारांप्रमाणे ते मनाने कवी होता. वोल्गावर त्याचे प्रेम होते. रात्रीची स्तब्धता, एकाकीपण आणि चिंतनशील जीवन, यांची त्याला आवड होती.

आकाशामधील ताऱ्यांकडे नजर टाकीत त्याने मला प्रश्न केला :

"खोखोल म्हणतात की, इथल्याप्रमाणं तिथंही माणसं असण्याची शक्यता आहे. खरंच तसं असेल असं वाटतं तुला? त्यांना कुणी संदेश देऊ शकत असेल तर विचारायला सांग—ते कसे राहतात? आम्हा बहुतेकांपेक्षा जास्त चांगलं? जास्त आनंदी?"

मुळामध्ये तो आपल्या आयुष्यात समाधानी होता. तो अनाथ होता, अविवाहित होता. आपल्या शांततामय आणि अत्यंत प्रिय व्यवसायात—मासे मारण्यात—संपूर्ण स्वतंत्र होता. पण त्याच्या बरोबरीची गावची माणसे त्याला आवडत नव्हती. त्यांच्याविरुद्ध त्याने मला सावध केले होते :

"त्यांच्या मऊ मऊ बोलण्याला फसू नको. ते सगळे लबाड कोल्हे आहेत. त्यांच्यावर विश्वास ठेवू नको. आज एक वागतील, तर उद्या दुसरंच करतील. त्यांच्यापैकी कुणालाही दुसऱ्याची काळजी नाही, सर्वांच्या कल्याणाची चाड नाही. जो तो आपला स्वार्थ पाहतो."

खेड्यातील "ढेरपोट्यां" विषयी तो विलक्षण तिरस्काराने बोलायचा. एवढ्या प्रेमळ माणसाकडून तसे बोलणे ऐकायला विचित्र वाटायचे.

"बाकीच्यांपेक्षा ते जास्त श्रीमंत कसे बनले? कारण ते जास्त हुषार आहेत. पण ते जर एवढे हुषार असले तर एक गोष्ट त्यांना समजली पाहिजे. शेतकऱ्यांनी कुठलीही भांडणं न करता गुण्यागोविंदानं एका कळपात राहिलं पाहिजे. त्या मार्गानं शेतकरी भक्कम राहतील. पण त्या ऐवजी ते खेड्यात दुही माजवतात. पेटत्या आगीत लाकूड सारल्याप्रमाणं! स्वतःच स्वतःचे शत्रू बनतात. महा हलकट माणसं आहेत. खोखोलना किती त्रास देतात ते पाहतोसच ना!"

तो खूप देखणा आणि दमदार होता. त्याच्याविषयी बायकांना विलक्षण आकर्षण होते व त्यांच्याविषयीचे विचार त्याला स्वस्थ बसू देत नसत.

"त्यांनी मला बिघडवलंय हे खरं आहे," तो मनमोकळेपणाने कबूल करायचा. "नवरे मंडळींना हे आवडत नाही. आणि मी त्यांच्या जागी असतो तर मलाही ते आवडलं नसतं! पण बाईशी चांगलं नाही वागायचं, हे कसं शक्य आहे? बाई म्हणजे तुमचा दुसरा आत्मा. कसलं आयुष्य जगते ती! गंमत नाही, प्रेम नाही. नुसतं घोड्यासारखं राबायचं! नवऱ्यांना प्रेमासाठी वेळ नाही—पण मी वाऱ्यासारखा

स्वच्छंद! लग्न होऊन एक वर्ष उलटायच्या आतच बायकांना आपल्या नवऱ्यांच्या लाथा-बुक्क्यांचा प्रसाद मिळायला सुरुवात होते. हो, त्या बायकांशी मी प्रेमचाळे करतो. मला मान्य आहे. पण मी त्यांना एकच सांगतो: 'एकमेकींचा राग करू नका. तुम्हा सगळ्याजणींची मी काळजी घेऊ शकेन. एकमेकींचा हेवा करू नका. तुम्ही सगळ्या मला सारख्याच आहात. मला प्रत्येकीबद्दल दया वाटते!'"

काहीशा शरमिंद्या चेहऱ्याने तो पुढे म्हणाला:

"एकदा तर एका थोराघरच्या बाईशी तर मी जवळजवळ पाप केलं होतं. शहरातून एक बाई इथं उन्हाळ्यापुरती रहायला आली होती. फार सुंदर होती. दुधासारखी कांती आणि आंबाडीसारखे केस. डोळे निळे निळे आणि प्रेमळ. मी तिच्याकडं मासे विकायला जायचा आणि दरवेळी तिच्यावरून नजर बाजूला काढणं अवघड जायचं. 'तुझं काय बिनसलंय?' तिनं विचारलं. 'तुम्हाला ठाऊक आहे,' मी म्हणालो. 'ठीक आहे,' ती म्हणाली. 'आज रात्री मी तुझ्याकडं येईन. माझी वाट पहा!' आणि खरंच ती आली. फक्त डासांचा तिला खूप त्रास झाला. तिला डास खूप चावले. आणि आमचं काही जमेना. 'मला सहन होत नाही डासांचं चावणं,' असं म्हणून ती रडायलाच लागली. दुसऱ्या दिवशी तिचा नवरा आला. कुणी जज्ज होता. तर बायका अशा असतात," काहीशा रोषाने इझोत सरतेशेवटी म्हणाला. "डासांपायी आपलं आयुष्य बिघडवू देतात!"

कुकूश्किनचे त्याने फार कौतुक केले.

"त्याच्याकडं लक्ष दे. फार चांगल्या अंतःकरणाचा माणूस आहे. लोकांना तो आवडत नाही. पण ते चुकतात! अर्थात तो तसा वटवटचा आहे. पण तसा कोण सर्वगुणसंपन्न असतो?"

कुकूश्किनची स्वतःच्या मालकीची जमीन नव्हती. पान्कोवसाठी तो मजुरीवर राबत होता. त्याची बायकोही मोलमजुरी करीत होती. ती दारूडी बाई होती. चणीने लहान, पण खूप भक्कम आणि चपळ होती. तिचा स्वभाव रागीट होता. आपले स्वतःचे घर त्यांनी लोहाराला भाड्याने दिले होते आणि घळीमधील बाऱ्यामध्ये ती दोघे रहात होती. कुकूश्किनला नवनव्या बातम्यांचा फार नाद होता. आणि जेव्हा बातमी मिळत नसे तेव्हा तो स्वतःच काहीतरी बातमी रचायचा. त्याच्या रचलेल्या बातम्या नेहमी एकाच छापाच्या असत.

"ऐकलंत का मिखायलो आन्तोनोविच? तीन्कोवोचा ऊर्यादनीक* आपलं काम सोडून संन्यासी व्हायची शपथ घेतोय. तो म्हणतो: 'शेतकऱ्यांचा आणखी छळ करणं आपल्याला जमणार नाही. झालं एवढं खूप झालं!'"

खोखोलने गंभीर चेहरा ठेवून म्हटले:

"अरेच्चा! जर असंच होत गेलं तर लौकरच आपले सगळे अधिकारी आपण गमावून बसणार!"

आपल्या न विंचरलेल्या केसांमधून गवत, वाळक्या काड्या आणि कोंबडीची पिसे उपसून काढीत कुकूश्किनने त्यावर विचार केला.

"सगळेच आपलं काम सोडून संन्यासी बनतील, असं मी म्हणणार नाही. फक्त ज्यांना सदसद्विवेकबुद्धी आहे, त्यांना आपली नोकरी करणं जड जातंय. आन्तोनिच, तुमचा सदसद्विवेकबुद्धीवर विश्वास नाही. मला दिसतंय, नाही तुमचा विश्वास! पण त्याशिवाय माणूस राहू शकत नाही. मग तो किती का हुषार असेना! बरं का, एक थोराघरची बाई होती..."

आणि कुणा एका "भयानक हुषार" जमिनदारीणीबद्दलची कहाणी सांगायला त्याने आरंभ केला.

"ती एवढी दुष्ट क्रूर होती की, खुद्द गव्हर्नर आपला मोठा हुद्दा आणि आपलं काम बाजूला ठेवून तिला भेटायला गेला. तो तिला म्हणाला, 'बाईसाहेब, जरा जपूनच वागा! कारण तुमच्या दुष्ट वागण्याबद्दलच्या बातम्या थेट सेंट पीटर्सबुर्गपर्यंत पोचल्या आहेत!' अर्थात तिनं गव्हर्नराला दारू-बिरू पाजून त्याची योग्य ती सरबराई केली, पण नंतर त्याला म्हणाली: 'तुम्ही आपले शांतपणं परत जा! मी काही माझा स्वभाव बदलू शकणार नाही!' त्यानंतर तीन वर्षं आणि एक महिना उलटला. अचानक त्या बाईनं आपल्या सगळ्या शेतकऱ्यांना एकत्र बोलावलं आणि म्हणाली: 'ही घ्या माझी सगळी जमीन तुम्हाला! मी तुमचा निरोप घेते. मला क्षमा करा. मी चालले...'"

"जोगिणींच्या मठात," खोखोल मध्येच म्हणाला.

---

*ऊर्यादनीक – ऊयेझ्दमधील (विभागीय) पोलीस – अनु.

कुकूश्किनने खोखोलचा चेहरा बारकाईने न्याहाळत संमतीदर्शक मान हलविली.

"बरोबर. माताजींकडं! तुम्हीसुद्धा तिच्याबद्दल ऐकलंय वाटतं?"

"नाही. असलं काही मी कधीच ऐकलेलं नाही."

"मग तुम्हाला कसं माहीत?"

"मी तुला ओळखतो."

मानेला झटके देत तो स्वप्नाळू माणूस पुटपुटला:

"तुमचा माणसावर कधी विश्वासच बसत नाही."

तर अशा रीतीने त्याच्या गोष्टींमधील दुष्ट, क्रूर लोकांना हमखास उपरती व्हायची आणि ते "अदृश्य" व्हायचे; अथवा अनेकदा, कचरा पेटीत फेकून द्यावा त्याप्रमाणे त्यांना तो एखाद्या मठात पाठवून द्यायचा!

अत्यंत विचित्र, अनपेक्षित कल्पना त्याच्या डोक्यामध्ये निर्माण होत. कपाळाला आठ्या घालीत एकदम तो जाहीर करायचा:

"आपण तातारांना जिंकायला नको होतं. तातार आपल्यापेक्षा जास्त चांगले लोक आहेत."

आणि हे तो बोलायचा जेव्हा कुणीही तातारांविषयी बोलत नसताना! फळांची पैदास करणाऱ्या बागवानांची सहकारी संस्था निर्माण करण्याविषयी चर्चा चालू असताना!

किंवा सैबेरियाबद्दल आणि तेथील श्रीमंत शेतकऱ्यांविषयी रोमास बोलत असे व अचानक कुकूश्किन गंभीरपणे पुटपुटायचा:

"दोन-तीन वर्षं जर कुणीही हेरिंग मासे पकडले नाही, तर समुद्रांमध्ये त्यांची खूप गर्दी उसळेल आणि नवा महापूर येईल! ह्या माशाची पैदास फार जोरात होते!"

कुकूश्किन हा अगदी उथळ आणि कुचकामी माणूस होता, असे सबंध खेड्याचे मत होते. त्याच्या कथा आणि त्याच्या कल्पना ऐकून शेतकरी चिडत. पण जरी त्याला ते शिव्यागाळी करीत असले आणि त्याची थट्टा उडवीत असले, तरी त्याचे बोलणे मात्र लक्षपूर्वक ऐकून घेत. जणू त्याच्या कल्पनांच्या भराऱ्यांमध्ये काही सत्य सापडेल अशा आशेने!

"बाताड्या" असे प्रतिष्ठित लोकांनी त्याला नांव ठेवले होते. फक्त अक्कडबाज पान्कोव गंभीरपणे म्हणायचा:

"स्तेपान कोड्यात बोलतो!"

कुकूश्किन हा कामाला खंबीर होता. तो पिंपे बनवायचा, विटांचे चुलाणे बांधायचा. मधमाशा पाळायची कला त्याला अवगत होती. कोंबड्यांची पैदास कशी करायची ते बायकांना शिकवायचा. सुतारकामात तो कसबी होता. जरी तो आळशीपणाने आणि कुरकुरत काम करायचा, तरी तो जे काम हाती घेई ते काम नेहमी फत्ते व्हायचे. त्याला मांजरांची खूप आवड होती आणि चांगली दहा मांजरे त्याने आपल्या बान्यामध्ये पाळली होती. त्यांना कावळे आणि डोमकावळे खायला घालून त्याने मांजरांना पक्षी-आहाराची सवय लावली होती. त्यामुळे गावकऱ्यांचा त्याच्याविषयीचा संताप आणखीच वाढला होता. कारण त्याची मांजरे शेजाऱ्यांची कोंबडीची पिले व कोंबड्या मटकावीत. बायका नेहमी स्तेपानच्या ह्या 'जंगली पशूंना' निर्दयपणे झोडपून काढीत. त्याच्या बान्यात बायकांच्या संतापी तक्रारी वारंवार घुमत. पण त्यांचा स्तेपानवर काहीही परिणाम घडत नसे.

"मूर्ख लेकाचे! मांजरं म्हणजे शिकारी पशू! कुत्र्यांपेक्षा चांगली! पक्ष्यांची शिकार कशी करायची हे मी त्यांना शिकवलं म्हणजे अशी शेकडो मांजरं पैदा करून विकता येतील. मग नुसता पैसाच पैसा! येडपट कुठले!"

एके काळी तो लिहा-वाचायला शिकला होता. पण ह्या कला आता त्याला आठवत नव्हत्या आणि आपल्या स्मरणशक्तीला उजाळा देण्याची त्याची इच्छाही नव्हती. बुद्धिमत्तेची उपजत देणगी त्याला लाभली होती. त्यामुळे खोखोलच्या बोलण्यामधील महत्त्वाच्या मुद्द्यांचा अर्थ इतरांपेक्षा लौकर त्याच्या लक्षात येई.

"अस्सं," कडू औषध घेतल्यानंतर लहान मूल वाकडा चेहरा करते तसा चेहरा करीत तो म्हणायचा, "तर क्रूर इवान हा छोट्या माणसांचा शत्रू नव्हता!"

कुकूश्किन, इझोत, पान्कोव हे लोक संध्याकाळीच यायचे आणि अनेकदा खूप उशीरा रात्रीपर्यंत बसून खोखोलचे विश्वाच्या रचनेविषयीचे बोलणे ऐकायचे. परदेशांमधील आयुष्याविषयी, लोकांच्या क्रांतिकारक उठावांविषयी खोखोल माहिती सांगायचा. पान्कोवला फ्रेंच क्रांती आवडायची.

"ते खरं आयुष्यातलं मोठं वळण होतं," तो मान डोलवीत म्हणायचा.

याच्या आधी सुमारे दोन वर्षांपूर्वी पान्कोवने आपल्या वडिलांपाशी पिढीजात इस्टेटीमधील स्वतःचा वाटा मागितला होता. त्याचे वडील एक श्रीमंत शेतकरी होते. त्यांच्या गळयाखालील कातडी खूप लांब लोंबत असे आणि त्यांचे डोळे भयानक बटबटीत होते. पान्कोवने "प्रेमाखातर" एका अनाथ मुलीशी – इझोतच्या पुतणीशी लग्न करून आपला स्वतंत्र संसार थाटला होता. त्याने आपल्या बायकोला कडक जरबेत ठेवले होते. पण तिला पोषाख मात्र शहरी थाटाचा करून दिला होता. पान्कोवचे वडील त्याच्या बंडखोरीबद्दल शिव्याशाप घालीत आणि दरवेळी आपल्या मुलाच्या नव्या घरावरून जाताना संतापाने थुंकत. खेडयातील श्रीमंत लोकांच्या इच्छेविरुद्ध पान्कोवने रोमासला आपले घर भाडयाने दिले होते व शिवाय दुकान टाकायला जागा दिली होती. ह्याबद्दल ते श्रीमंत लोक पान्कोवचा तिटकारा करीत. पण पान्कोव त्यांच्या तिटकाऱ्याकडे संपूर्ण दुर्लक्ष करायचा. त्यांच्याबद्दल चिडून बोलायचा. त्यांच्याशी उद्धटपणे आणि उपहासाने बोलायचा. त्याला खेडयातील जीवन आवडत नसे.

"मला जर धंदा येत असता, तर मी शहरात जाऊन राहिलो असतो."

त्याचा बांधा भक्कम होता आणि त्याचा पोषाख नेहमी व्यवस्थित असे. त्याचे वागणे संयमित होते आणि आपल्या प्रतिष्ठेला तो फार जपायचा. त्याच्या मनाची घडण सावध आणि संशयी होती.

"या अशा धंद्यात तुम्ही कसे पडलात? काळजाचं ऐकून? का डोकं वापरून?" त्याने रोमासला विचारले.

"तुम्हाला काय वाटतं?"

"मला माहीत नाही. तुम्हीच सांगा."

"कोणता मार्ग जास्त बरा वाटतो तुम्हाला?"

"मला माहीत नाही. तुम्हाला कोणता वाटतो?"

खोखोल हट्टीपणे वागत होता. सरतेशेवटी त्याने त्या शेतकऱ्याला बोलते केले.

"अर्थात विचार करून – डोकं वापरून! तोच मार्ग जास्त चांगला! माणसाचं डोकं माणसाला फायद्याशिवाय काम करू देत नाही. आणि जिथं काही लाभ होतो तो खरंच सणसणीत असतो. पण काळजाची हाक ऐकलीत, की निकाल लागला! माणसाचं काळीज फार वाईट

सल्लागार आहे. मी माझ्या अंतःकरणाला वाटतं त्याप्रमाणं वागलो तर संपलाच कारभार! त्या पाद्रयाच्या घराला प्रथम पेटवून देईन. नको तिथं नाक खुपसू नये असा त्याला धडा शिकवीन!"

चिंचुद्रीसारख्या निमुळत्या टोकदार चेहऱ्याच्या पाद्रयाने, त्या दुष्ट म्हाताऱ्याने, पान्कोवच्या आणि त्याच्या वडिलांच्या भांडणात नाक खुपसले होते. त्यामुळे पान्कोवला पाद्री आवडत नव्हता.

आरंभी पान्कोव माझ्याशी अत्यंत तुसडेपणाने वागला होता. तो सरळ माझ्या अंगावर ओरडत असे. पण त्याचे तसे वागणे लौकरच थांबले. तरीही माझ्याकडे तो गुप्त संशयाने पहात होता असे मला जाणवायचे. आणि मीही त्याच्या नावडीची सव्याज परतफेड करीत होतो.

नुसत्या लाकडाच्या ओंडक्यांच्या भिंती असलेल्या त्या नेटक्या खोलीमधील संध्याकाळी मला अविस्मरणीय वाटतात. खिडक्यांवरील झापडे बंद केलेली. कोपऱ्यातील टेबलावर दिवा पेटलेला. आणि त्या दिव्यामागे भरदार दाढीचा व भव्य कपाळाचा माणूस बोलतोय:

"माणसानं पशूच्या पलिकडं जास्त जास्त प्रगती करणं ही आयुष्यातली मुख्य बाब आहे..."

आणि तीन शेतकरी त्याचे बोलणे लक्षपूर्वक ऐकत बसलेले. त्यांचे डोळे स्वच्छ नितळ, त्यांचे चेहरे बुद्धिमत्तेने चमकत असलेले. इझोत नेहमी अगदी स्तब्ध बसायचा. जणू फक्त त्यालाच ऐकू येईल असा अतिदूरचा आवाज तो ऐकतोय असे भासायचे. कुकूश्किनची सारखी चळवळ चालायची. डासांनी चावून बेजार केलेल्या माणसासारखी. पान्कोव आपली आखूड, सोनेरी मिशा कुरवाळीत खूप विचारांती शांतपणे एखादेवेळी शेरा मारायचा:

"म्हणजे वर्गांमध्ये वेगळं व्हायची गरज लोकांना जाणवायला लागली होती तर!"

पान्कोवच्या एका गोष्टीचे मला खूप कौतुक वाटत होते. आपल्या मजुराबरोबर, कुकूश्किनबरोबर, तो कधीही उर्मटपणे वागत नसे. उलट कुकूश्किनच्या कल्पनांच्या भराऱ्या तो अत्यंत लक्षपूर्वक ऐकत असे.

सायंकाळच्या चर्चेनंतर मी माझ्या पोटमाळ्यावरील खोलीत चढून जाई आणि थोडा वेळ उघड्या खिडकीपाशी बसून राही. खिडकीमधून झोपलेले खेडे आणि दूरची शेते दिसत. तेथे अभंग स्तब्धतेचे साम्राज्य पसरलेले असे. चमकणारे तारे रात्रीच्या अंधाराला फाडत असत.

माझ्यापासून ते जेवढे अधिक दूर तेवढे पृथ्वीपासून अधिक जवळ भासत. त्या गंभीर स्तब्धतेत माझे काळीज संकोचून जाई. आणि आमच्या खेड्या-प्रमाणेच नीरव अशा पृथ्वीच्या सपाट पृष्ठभागाशी लगटलेल्या हजारो खेड्यांवरील अनंत अवकाशावरून माझे विचार भराऱ्या घेऊ लागत. सर्वत्र निःश्चलता आणि शांतता!

अंधारी पोकळी आपल्या उबदार बाहुपाशात मला लपेटून घेई. माझ्या आत्म्याला हजार अदृश्य जळवांप्रमाणे चिकटे. सरतेशेवटी मला मंद ग्लानी येऊ लागे आणि एक अंधुक हुरहुर माझ्या काळजात हळूच सरपटत प्रवेश करी. आपल्या ह्या पृथ्वीवर मी खूप लहान, अगदी नगण्य भासू लागे...

खेडेगावचे जीवन अगदी नीरस भासत असे. पण शहरापेक्षा खेडेगावातील जीवन अधिक रसरसलेले आणि आनंदी असते, असे पुस्तकांमधून मी वारंवार वाचले होते. शेतकरी अखंडपणे आणि अमानुष कष्टांमध्ये गुंतलेले मी पहात होतो हे खरे! अनेक शेतकरी आजारी होते. अतीव कष्टांपायी अनेक अपंग बनले होते. त्यांच्यामध्ये आनंदी चेहरा अभावानेच पहायला मिळायचा. शहरामधील कामगार आणि कारागीर तेवढेच राबत होते, पण ते आपले जीवन अधिक आनंदाने जगत. ह्या दुर्मुखल्या खेडुतांप्रमाणे आयुष्याच्या रटाळ, उदास अस्तित्वा-विषयी ते तक्रारी करीत नसत. शेतकऱ्याचे आयुष्य सोपे होते असे मला वाटत नव्हते. त्याला जमिनीकडे सतत लक्ष द्यावे लागे आणि आपल्या बरोबरीच्या माणसांबरोबर धूर्त हुषारीने वागावे लागे. ह्या बुद्धीहीन अस्तित्वात आनंदी असे काहीही नव्हते. आंधळ्या प्राण्यांप्रमाणे सर्व गावकरी आयुष्यातून चाचपडत जात असलेले मी पहात होतो. ते सर्व कशाला तरी भीत होते. प्रत्येकाचा दुसऱ्यांवर अविश्वास होता. त्यांच्यात लांडग्याशी साधर्म्य असलेली काहीशी प्रवृत्ती होती.

खोखोल, पान्कोव आणि "आमची सर्व माणसे" तर्काला धरून आपले जीवन उभारू पहात होती. पण ह्या सर्वांचा गावकरी दुस्वास करीत होते. त्या दुस्वासाचे कारण समजून घेणे मला कठीण होते.

शहरचे फायदे मला स्पष्ट दिसत होते. तेथे सुखाची अधीर इच्छा होती; स्वभाव धीट आणि चौकस होता; उद्दिष्टे आणि समस्या यांची संख्या भरपूर होती. अशा रात्री मला नेहमी शहरच्या दोन माणसांची आठवण यायची:

"फ. कालूगिन आणि झे. नेबेई

घड्याळे दुरुस्त करणारे, तसेच विविध साधनांची, शल्योपकरणांची, शिवणयंत्रांची, कोणत्याही बनावटीच्या संगीत पेट्यांची आणि इतर गोष्टींची दुरुस्ती करणारे."

ही पाटी एका छोट्या दुकानाच्या धुळकट खिडक्यांमध्ये अरुंद दारात लटकावलेली होती. एका खिडकीमागे फ. कालूगिन बसायचा. भक्कम बांध्याचा, गोल चेहऱ्याचा, जवळ जवळ सतत स्मित करणारा. त्याच्या पिवळ्या टकलावर एक टेंगूळ होते आणि त्याच्या डोळ्यावर नेहमी भिंग चढविलेले असायचे. सुरेख लहान चिमट्यांनी घड्याळाची ठाकठोक करताना तो गाणे म्हणायला काहीवेळा सुरुवात करी. त्याच्या पांढऱ्या, कडक मिशांखाली त्याचे ओठ दडलेले असत. दुसऱ्या खिडकीपाशी झे. नेबेई बसायचा. हा सडपातळ, काळसर वर्णाचा, छोट्या चणीचा माणूस त्याच्या कडक कुरळ्या केसामुळे, टोकदार दाढीमुळे, प्रचंड बाकदार नाकामुळे व आलुबुखारसारख्या मोठ्या, काळ्या डोळ्यांमुळे काहीसा सैतानासारखा भासायचा. तोसुद्धा नेहमी कामात असायचा. वेगवेगळी नाजुक यंत्रे सुटी करण्यात किंवा जोडण्यात गुंतलेला असायचा. आपल्या घनगंभीर खर्जे सुरात तो अधूनमधून अचानक गर्जायचा:

"ट्रा-टा-टाम्, टाम्, टाम्!"

त्यांच्या पाठीमागे जमिनीवर खोकी, यंत्रे, सुटी चाके, संगीत पेट्या, शाळेमधील पृथ्वीचे गोल वगैरे गोष्टी अस्ताव्यस्त अवस्थेत पसरलेल्या माझ्या नजरेला पडत. अत्यंत विविध आकाराच्या धातूच्या वस्तू फडताळावर उभ्या असत. आणि हलणाऱ्या लंबकांच्या घड्याळांची ओळच्या ओळ भिंतीवर टांगलेली असे. दिवसचे दिवसपर्यंत तेथे उभे राहून त्या लोकांना काम करताना पहात बसावेसे मला वाटे. पण माझ्या लंबू आकृतीमुळे उजेड अडला जाई. त्यामुळे घड्याळजी रागीट चेहरा करून हातवाऱ्यांनीच मला तेथून जाण्याच्या खुणा करीत. तेथून काढता पाय घेताना मी असूयेने विचार करी:

"सर्व काही करू शकणारी माणसं किती सुखी!"

ह्या घड्याळजींविषयी मला आदर वाटायचा. सर्व यंत्रांची आणि उपकरणांची गुपिते त्यांना माहीत होती, पृथ्वीवरील कोणतीही वस्तू

ते दुरुस्त करू शकतील, असा मला गाढ विश्वास वाटायचा. ही खरी माणसे होती!

पण खेड्यातील आयुष्य मला आवडत नव्हते. शेतकऱ्यांना जाणून घेणे मला कठीण जाई. बायका तर आपल्या वाईट प्रकृतीबद्दल अखंड तक्रारी करीत. आत्ता "काळीज लकलकलं," तर आत्ता "छातीत दडपल्यासारखं वाटतंय" आणि "पोटात मुरडा येणं" ही तर नेहमीची बाब होती. रविवारी किंवा सणाच्या दिवशी वोल्गाच्या किनारी अथवा आपल्या घरांशेजारच्या बाकड्यांवर बसण्यासाठी गावातील बायका जेव्हा एकत्र जमत, तेव्हा हे विषय मोठ्या चवीने चर्चिले जात. सगळे शेतकरी कमालीचे त्रासलेले असत आणि प्रत्येक क्षुल्लक बाबतीत संतापून शिवीगाळी करीत. मातीच्या एका फुटक्या सुरईवरून तीन कुटुंबांनी लाठ्याकाठ्या घेऊन भांडण केले. ती सुरई नवी होती तेव्हा तिची किंमत अवघी बारा कोपेक होती. भांडण मिटविण्यापूर्वी त्यांनी एका म्हातारीचा हात मोडला व एका पोराचे डोके फोडले. अशा भांडणाविना एकही आठवडा पार पडत नसे.

तरुण पुरुष मुलींशी आडदांड लघळपणा करीत. अत्यंत वाह्यात खोड्या काढीत. एखाद्या मुलीला शेतामध्ये एकटे गाठून तिचा परकर उलटा करून तिच्या डोक्यावर गुंडाळीत आणि तागाच्या दोरीने त्याला बांधीत. "फुलाप्रमाणं तिला बांधलं" असे ह्या प्रकाराला म्हणत. कमरेपासून खाली नागड्या झालेल्या त्या मुली किंचाळत, शिव्या देत. पण तरीही, हा खेळ त्यांना अगदीच अप्रिय वाटत नव्हता असे भासायचे. परकराला बांधलेली दोरी सोडायला त्या जरूरीपेक्षा थोडा जास्तच वेळ लावीत. चर्चमध्ये संध्याकाळच्या प्रार्थनेच्या वेळी मुलींच्या ढुंगणांना चिमटे काढण्यात तरुण पुरुष गुंतलेले असत. तेवढ्याचसाठी ते चर्चला येत असे वाटायचे. रविवारी पाद्रीबुवा ह्या मंडळीची निर्भत्सना करीत:

"पशूंनो! तुमच्या अश्लीलतेला दुसरीकडं कुठं जागा सापडत नाही?"

रोमास म्हणाला होता: "युक्रेनमध्ये माणसं धार्मिक बाबतीत अधिक काव्यात्म आहेत. इथं देवावरच्या विश्वासामागं मला फक्त भीतीच्या आणि लोभाच्या बटबटीत प्रवृत्ती दिसतात. ह्या लोकांना देवाविषयी मनापासून प्रेम वाटत नाही. देवाच्या सामर्थ्याविषयी आणि सौंदर्याविषयी नवल वाटत नाही. कदाचित हे चांगलं आहे. त्यामुळे ह्यांची धर्मातून

सहज मुक्तता होऊ शकेल. मी तुला सांगतो, हा धर्म म्हणजे फार अपायकारी खोटा ग्रह आहे."

तरुण लोक घमेंडखोर होते, पण भित्रे होते. एव्हाना तीन वेळा, रात्रीच्या समयी त्यांनी मला रस्त्यात अडविले होते आणि बदडण्याचा प्रयत्न केला होता. पण त्यात त्यांना नेहमीच अपयश आले होते. फक्त एकदाच एक लाठी माझ्या पायावर सणाणून बसली होती. अर्थात ह्या घटनांविषयी रोमासजवळ मी मुळीच बोललो नव्हतो. पण काठीच्या त्या तडाख्यामुळे मी किंचित लंगडू लागलो आणि काय घडले असावे ते रोमासने तर्काने जाणले.

"प्रसाद मिळाला वाटतं? तरी मी तुला जपून रहायला सांगितलं होतं!"

रात्र झाल्यानंतर खेडचात भटकायला मी जाऊ नये, असा रोमासने मला सल्ला दिला होता. पण तरीही काही वेळा परसदारामधून गुपचुप सटकून मी वोल्गाच्या किनारी जायचा आणि वाळुंजीच्या झाडांखाली बसून रात्रीच्या झिरझिरीत बुरख्यामधून समोरचा सखल कुरणाचा तीर न्याहाळीत बसायचा. मंद आणि भव्य वोल्गा माझ्यापुढे पसरलेली असायची. अदृश्य सूर्याचे किरण चंद्राच्या मृत पृष्ठभागावरून परावर्तित होऊन वोल्गाच्या पाण्याला दाट मुलामा चढवायचे. मला चंद्र आवडत नसे. तो मला अमंगळ वाटायचा. चंद्राच्या प्रकाशात मला एखाद्या कुत्र्याप्रमाणे कमालीचे बेचैन वाटायचे आणि भयाण आरोळी ठोकण्याची इच्छा व्हायची. चंद्राचा प्रकाश स्वतःचा नव्हता हे जेव्हा मला समजले तेव्हा मी खूप खूष झालो. चंद्रावर वस्ती नाही, तेथे सजीव सृष्टी असण्याची शक्यता नाही, हे ऐकून मला बरे वाटले होते. पण हा शोध लागण्यापूर्वी माझा असा समज होता की, चंद्रावर तांब्याच्या माणसांची वस्ती होती. ही माणसे त्रिकोणांच्या आकारांची होती आणि आपल्या लांब, कंपास पायांवर चालत होती. चालताना त्यांचा लेंटमधील चर्चच्या घंटांप्रमाणे खणाखणा आवाज येई. चंद्रावरील सर्व गोष्टी तांब्याच्या होत्या आणि भाजीपाला, प्राणी, सर्व गोष्टी अखंडपणे खणखणा वाजत होत्या. हे सर्व पृथ्वीला अनिष्ट होते. चंद्रावरील प्रत्येक गोष्ट पृथ्वीविरुद्ध प्रचंड कारस्थान रचण्यात गुंतली होती. चंद म्हणजे आकाशामधील एक नगण्य बाब आहे असे मला समजले तेव्हा छान वाटले. पण त्याहीपेक्षा एखाद्या प्रचंड उल्केने चंद्रावर आघात केला असता, असा प्रचंड आघात केला

असता की त्यामधून चंद्रावर ज्वाला पेटल्या असत्या आणि पृथ्वीवर त्याने आपला स्वतःचा प्रकाश पाठविला असता, तर जास्त बरे झाले असते.

चांदण्याची नक्षीदार महिरप मंद लाटांनी हिंदकळत असे. अंधुक दूर अंतरावरून त्या लाटा येत आणि उंच किनाऱ्याच्या काळ्या सावलीत अदृश्य होत. हा देखावा पहात असताना मला एक नवा मानसिक जोम जाणवू लागे. एक नवी स्पष्ट दृष्टी लाभे. शब्दांमध्ये व्यक्त करणे अशक्य असलेल्या विचारात माझे मन सहज विहार करू लागायचे. माझ्या दिवसभरातील जीवनाशी त्या विचारांचा मुळीच संबंध नसायचा. पाणी अजिबात आवाज न करता वाहात असायचे. एखादी वाफेची बोट विस्तीर्ण, काळ्या प्रवाहावर अंगार फुललेल्या पिसांच्या अद्भुत पक्ष्या-प्रमाणे खाली-वर होताना दिसायची. आणि प्रचंड पंखांची मखमाली सळसळ त्या बोटीच्या पाठोपाठ वाऱ्यावरून तरंगत ऐकू यायची. किंवा कुरणाच्या तीरावर एक दिवा चमकायचा आणि त्याची लांब किरमिजी किरणे पाण्यावर पसरायची. खरे म्हणजे एखाद्या कोळ्याच्या हातामधील ती मशाल असे, पण आकाशामधून खाली आलेल्या एखाद्या घर नसलेल्या ताऱ्याचा भास होई. अग्निफुलाप्रमाणे नदीवर तो प्रकाश तरंगत राही.

पुस्तकात वाचलेल्या गोष्टींचे विलक्षण अद्भुत कल्पनांमध्ये रूपांतर होई. अतुलनीय सौंदर्याच्या दृश्यांची मालिका कल्पनाशक्ती जोडू लागे. त्या रात्रीच्या तरल वातावरणात, नदीपाठोपाठ मीही तरंगत जात असल्याचा भास होई.

काही वेळा इझोत मला या ठिकाणी भेटायचा. रात्रीच्या वेळी तो अधिक उंच, अधिक प्रसन्न भासायचा.

"पुन्हा तू बाहेर पडलास?" तो विचारायचा आणि माझ्या शेजारीच बैठक मारून प्रदीर्घ काळपर्यंत विचारात गढून गप्प रहायचा. अशा वेळी त्याची नजर नदीवर किंवा आकाशाकडे खिळलेली असे. आपली रेशमी, तांबूस-सोनेरी दाढी तो कुरवाळीत राही.

काहीवेळा त्याचे उघड स्वप्नरंजन चाले:

"मी थोडं ज्ञान मिळवीन, सगळ्या प्रकारची पुस्तकं वाचून काढीन आणि मग प्रत्येक नदीचा मागोवा घेत जाईन. पाहिलेली प्रत्येक गोष्ट मला समजेल. मी दुसऱ्या लोकांना शिकवीन. खरंच शिकवीन. आपलं काळीज मोकळं करणं ही फार छान गोष्ट आहे बंधू! एवढंच नाही तर

काही बायकासुद्धा, जर तुम्ही त्यांच्याशी अंतःकरणापासून बोललात, तर तुम्हाला समजून घेतात. त्या दिवशी अशीच एक बाई माझ्याबरोबर बोटीत होती. आपण मेल्यानंतर आपलं काय होतं याबद्दल तिला उत्सुकता होती. ती म्हणाली, 'माझा नरकावर विश्वास नाही, किंवा स्वर्गावरही नाही.' कसं वाटलं हे ऐकून? बंधू, कधी कधी बायकासुद्धा..."

शब्द शोधण्यासाठी तो थांबला आणि मग म्हणाला:

"खरंच, त्यांचे आत्मेसुद्धा जिवंत असतात!"

इझोत हा निशाचर होता. त्याला सौंदर्याची फार चांगली जाण होती आणि एखाद्या स्वप्नाळू मुलाप्रमाणे मऊ मऊ शब्दांमध्ये सौंदर्याविषयी बोलण्याची त्याची प्रसन्न रीत होती. देवावर त्याचा विश्वास होता. पण देवाबद्दल त्याला भीती नव्हती. मात्र चर्चची देवाविषयीची कल्पना तो मानून होता. देव म्हणजे एक मोठा, देखणा म्हातारा होता. पृथ्वीवरील एक शहाणा आणि दयाळू धनी होता. वाईटावर मात करणे त्याला जमत नाही त्याचे केवळ कारण "प्रत्येक गोष्टीला त्याला वेळ सापडत नाही. आपण माणसं खूप आहोत ना! पण तरीही तो जमवील. जरा थांबा आणि तुम्हाला दिसेलच! फक्त ख्रिस्ताबद्दल मला काही समजत नाही. एकदम तो कुठून येतो तेच मला दिसत नाही. देव आहे ना? मला तेवढंच पुरे! पण नाही! ते आणखी एकाला घेऊन येतात. देवाचा मुलगा असं म्हणतात. आणि देवाचा मुलगा असला तर काय बिघडलं? देव अजून मेलेला नाही हे मला ठाऊक आहे."

पण अनेकवेळा इझोत माझ्या शेजारी मुकाट बसून रहायचा. स्वतःच्या काही विचारांमध्ये गुंतलेला असायचा. फक्त अधूनमधून निःश्वास टाकून तो म्हणायचा:

"खरंच, असं आहे तर..."

"काय?"

"काही नाही. मी स्वतःशीच बडबडत होतो."

पुन्हा एक सुस्कारा टाकून दूरवरील धूसर दृश्याकडे टक लावीत म्हणायचा:

"जीवन ही एक मोठी छान गोष्ट आहे."

मी त्याच्याशी सहमत होई: "होय. जीवन फार छान आहे."

काळपट पाण्याचा मखमाली पट्टा आमच्यासमोर प्रचंड उसळत असायचा. त्यावर आकाशगंगेचा रुपेरी पट्टा कमान टाकून असे. काळ्या

आकाशात मोठमोठे तारे लटकलेले असायचे. सोनेरी, चमकत्या चंडोलांसारखे. जीवनातील गुपितांविषयीची अतर्क्य बढाईखोर गाणी काळीज हळूच गाऊ लागायचे.

दूर कुरणांपलिकडे लालसर ढगांमधून अधीर किरणे बाहेर फुटू लागायची. लौकरच सूर्य आपला मोरपिसारा आख्ख्या आकाशभर फुलवायचा.

"सूर्य म्हणजे एक चमत्कार आहे," आनंदाने स्मित करीत इझोत तोंडातल्या तोंडात पुटपुटायचा.

सफरचंदाच्या झाडांना फुलवा आला होता आणि गुलाबी ढगांमध्ये खेडे गुरफटले होते. सर्वत्र एक कडवट वास पसरला होता. त्यात डामर आणि शेणाचे दर्प बुडून गेले होते. घरे आणि शेते यांच्या दरम्यान सरळ रांगांमध्ये शेकडो झाडे ताठ उभी होती. रेशमी पाकळ्यांच्या उत्सवी गुलाबी रंगात ती माखून निघाली होती. चांदण्या रात्री जेव्हा मंद वारा सुटे आणि फुलांनी लगडलेल्या फांद्या डुलू लागत, तेव्हा त्यांची किंचितशी सळसळ ऐकू यायची आणि असे भासायचे की, खेड्यावर प्रचंड, निळसर-सोनेरी लाटा उसळत होत्या. बुलबुल पक्षी न दमता, आवेगाने गाणी गात रहात. सबंध दिवसभर छोट्या पाखरांची किलबिल चाले आणि अदृश्य चंडोल आपल्या मधुर, अखंड गीतांची धरतीवर बरसात करीत रहात.

सणावारी संध्याकाळी मुली आणि तरुण बायका रस्त्यावरून खाली-वर चकरा मारीत रहात. गाणी गाताना पाखरांच्या पिलांप्रमाणे त्याची तोंडे वासलेली असत. मंद, धुंद स्मितांनी त्यांचे डोळे मऊ बनलेले असत. इझोतही धुंद स्मित करीत असायचा. त्याचे वजन घसरले होते आणि त्याचे डोळे खोल, काळ्या खळग्यांमध्ये आत गेले होते. त्याच्या चेहऱ्या-वरील रेषा अधिक गहिऱ्या आणि देखण्या बनल्या होत्या. त्याच्या चेहऱ्याला जास्त साधुपण लाभले होते. सबंध दिवसभर तो झोपून रहायचा आणि केवळ संध्याकाळ दाटू लागली म्हणजे गंभीर, विचारमग्न चेहऱ्याने खेड्यात यायचा. कुकूश्किन त्याची रांगडी चेष्टा करायचा. पण तिच्या-मध्ये दुष्टावा नसे. शरमिंदे हसत इझोत त्याला म्हणायचा:

"आता चूप बसतोस की नाही? माणूस काय करू शकतो?"

आनंदून तो उद्‌गारायचा:

"खरंच, आयुष्य मोठं गोड आहे! जरा पहा तरी — आयुष्यात

किती प्रेमळ दयाळूपणा असू शकतो! एकमेकांच्या काळजांना ऊब द्यायला माणसांना सगळे चांगले शब्द सापडतात. त्यांपैकी काही शब्दांचा तर मरणापर्यंत तुम्हाला विसर पडणार नाही आणि मरणानंतर तुम्ही उठाल तेव्हा सर्वांत प्रथम त्यांचीच तुम्हाला आठवण होईल."

"सांभाळून! अजून तुला नवरे लोक चोपून काढतील," प्रेमळपणे गालातल्या गालात हसत खोखोलने त्याला इशारा दिला.

"खरंच, तसं कारण आहे," इझोतने कबुली दिली.

जवळ जवळ दररोज रात्री, बुलबुलांच्या संगीतामधून, अंतःकरण हेलावणाऱ्या मिगुनच्या उंच स्वरलहरी ऐकू यायच्या. फळबागांमधून, किंवा शेतांमधून, अथवा नदीतीरावरून त्याची ही गाणी ऐकू येत. त्याचे गाणे विलक्षण सुंदर होते आणि त्याच्या गाण्यांपायी शेतकरीसुद्धा त्याच्या अनेक पापांना क्षमा करीत.

शनिवारी संध्याकाळी आमच्या दुकानापाशी जास्त जास्त खेडुत जमू लागले. म्हातारा सूस्लोव, बारीनोव, क्रोतोव लोहार आणि मिगुन यांची हमखास हजेरी असायची. गंभीरपणे बोलत ते बसून रहात. एखादा जायचा, तेवढ्यात दुसरा यायचा आणि मध्यरात्रीपर्यंत ही अशी जा-ये चालायची. काहीवेळा एखादा दारूडा दंग्याला आरंभ करायचा. इतरांपेक्षा माजी सैनिक कोस्तिनला ही सवय सर्वांत जास्त होती. हा एकाक्ष, डाव्या हाताची दोन बोटे तुटलेला माणूस, झुंजीच्या कोंबड्या-प्रमाणे, आपल्या बाह्या वर सरसावून, जोरजोराने मुठी उडवीत दुका-नापाशी यायचा. घोगऱ्या, पिचक्या आवाजात आरोळी ठोकायचा:

"खोखोल! अरे ए दुष्ट जातीच्या, अरे तुर्का! सांग आम्हाला: तू चर्चला का जात नाहीस? का? ए पाखंड्या! दंगेखोरा! सांग आम्हाला: तू कोणत्या प्रकारचा माणूस आहेस?"

माणसे त्याची थट्टा करू लागत:

"मीश्का! तुझी बोटं कशानं तुटली? तुर्कांना तू घाबरला होतास?"

ह्या क्षणाला तो लढाई सुरू करायचा. पण शेतकरी त्याला पकडायचे आणि ओरडत, मोठमोठ्याने हसत, घळीच्या टोकाशी त्याला नेऊन गडगडत खाली सोडून द्यायचे. तो असह्य किंचाळ्या फोडीत उतारावरून गडगडत खाली जायचा:

"खून! खून! धावा!"

मग, पायांपासून डोक्यापर्यंत धुळीने माखलेल्या अवतारात तो घळ

चढून वर यायचा आणि वोदकाच्या एका पेल्याचे पैसे खोखोलपाशी मागायचा.

"कशाबद्दल?" खोखोल विचारायचा.

"करमणूक केल्याबद्दल!" कोस्तिन उत्तर देई आणि शेतकरी पोट धरधरून हसत.

एका सणादिवशीची सकाळ. स्वयंपाकीणबाईने चुलाणा पेटविला आणि ती बाहेर आवारात गेली होती. मी दुकानात काम करीत होतो. घरामधून फुस्स असा जोरदार आवाज झाला. सबंध दुकान गदागदा हादरले. फडताळावरून टॉफीचे डबे गडगडत खाली पडले. काचा फुटल्याचे आवाज झाले. फरशीवर वस्तू पडल्याचे आवाज ऐकू आले. घाईघाईने मी स्वयंपाकघराकडे धावलो. तेथून धुराचे काळे लोट बाहेर पडत होते आणि त्या धुरामागे काहीतरी फुस्कारे व कडकड आवाज ऐकू येत होते. खोखोलने माझा खांदा पकडला.

"थांब!"

बाहेर दाराशी स्वयंपाकीणबाईने गळा काढला.

"मूर्ख बाई आहे!"

रोमास धुरातून आत घुसला. स्वयंपाकघरात त्याने काहीतरी खुडबूड केली. त्याने मोठ्यांदा एक शिवी हासडली व तो ओरडला:

"ते रडणं थांबव आणि थोडं पाणी आण!"

लाकडी ओंडके जमिनीवर धुमसत पडले होते. विटांचे आणि जळक्या ढलप्यांचे तुकडे इतस्ततः विखुरले होते. चुलाण्याचे काळे तोंड रिकामे होते. धुरातून चाचपडत मी पाण्यापाशी गेलो आणि जमिनीवरील आगीवर पाण्याची बादली उपडी केली. नंतर लाकडाचे तुकडे परत चुलाण्यात भरण्यास मी आरंभ केला.

"जपून!" खोखोल मला म्हणाला. त्या सगळ्या गोंधळामधून स्वयंपाकीणबाईच्या हाताला धरून तो तिला बाहेर नेत होता. बैठकीच्या खोलीत तिला ढकलीत त्याने आज्ञा केली:

"जा आणि दुकानाला कुलूप घाल!" आणि माझ्याकडे वळून तो म्हणाला: "माक्सीमिच, जरा सांभाळून! आणखी काही स्फोट होण्याची शक्यता आहे."

चवडयांवर खाली बसून फरशीवर पडलेला प्रत्येक गोल, चकचकीत ओंडका तो काळजीपूर्वक निरखून पाहू लागला. मग तो चुलाण्यापाशी गेला आणि नुकतीच मी आत भरलेली लाकडे त्याने पुन्हा बाहेर काढायला सुरुवात केली.

"तुम्ही काय करताय?"

"इकडं ये, हे पहा!"

त्याने माझ्यापुढे धरलेला ओंडका विचित्रपणे फुटला होता. मी अधिक बारकाईने पाहिले तेव्हा त्या ओंडक्याला गिरमिटाने एक भोक पाडलेले असल्याचे व त्या भोकाच्या आतील बाजू काजळीने माखल्याचे माझ्या ध्यानात आले.

"पाहिलंस? कुणा सैतानानं यात बंदुकीची दारू ठासली होती. मूर्ख कुठले! एवढ्याशा दारूच्या भुकटीनं काय नुकसान होणार?"

त्याने ओंडका दूर ठेवला आणि हात धुवायला सुरुवात केली. तो पुढे म्हणाला: "आक्सीन्या खोलीच्या बाहेर होती हे बरं झालं! नाही तर तिला काहीतरी इजा झाली असती!"

झोंबणारा धूर नाहीसा झाला होता. आता खोलीतील दृश्य स्पष्ट दिसत होते. फडताळांवरील बशांच्या ठिकऱ्या उडाल्या होत्या. खिडक्यांची तावदाने नाहीशी झाली होती. चुलाण्याच्या तोंडाभोवतालच्या अनेक विटा निखळून पडल्या होत्या.

त्या क्षणाचे खोखोलचे वागणे मला आवडले नव्हते. ह्या मूर्ख करामतीचा त्याला मुळीच राग नव्हता अशा थाटात तो वागत होता.

बाहेर पोरे धावपळ करीत होती. आवाज उमटत होते: "आग! आग! खोखोलला आग लागली!"

एक बाई किंचाळली. बैठकीच्या खोलीमधून आक्सीन्या घाबरून ओरडली:

"मिखायलो आन्तोनिच! ते दुकान फोडताहेत!"

"चूप! मी आलोच!" आपली ओली दाढी कोरडी करीत खोखोल म्हणाला.

बैठकीच्या खोलीच्या उघड्या खिडक्यांमधून भीतीने आणि संतापाने वेडेवाकडे बनलेले केसाळ चेहरे आत टक लावून पहात होते. धूर झोंबत असल्यामुळे त्यांनी डोळे किलकिले केले होते. कुणीतरी कर्कश्यपणे, उत्तेजित स्वरात ओरडले:

"खेड्यातून बाहेर हाकला त्यांना! ह्यांच्या दंग्यांना काही अखेर नाही!"

एक लहान लालकेशा माणूस खिडकीमधून आत चढून येण्याचा प्रयत्न करीत होता. प्रत्येक प्रयत्नापूर्वी क्रूसचिन्ह करून तो काहीतरी पुटपुटत होता. पण आत चढून येणे त्याला जमत नव्हते. त्याचा उजवा हात कुऱ्हाड पकडण्यात गुंतला होता आणि डाव्या हाताची खिडकीच्या चौकटीशी पुरेशी पकड बसत नव्हती.

पोकळ ओंडका हातात धरून रोमासने त्या माणसाला विचारले: "तुझा काय बेत आहे?"

"आग विझवायचा!"

"पण तिथं मुळी आग लागलेलीच नाही!"

त्या शेतकऱ्याने आश्चर्याने आ वासला व क्षणात तो नाहीसा झाला. रोमास बाहेर दुकानाच्या व्हरांड्यात गेला. हातात ओंडका धरून तो लोकांच्या जमावाला उद्देशून म्हणाला:

"तुमच्यापैकी एकानं ह्याच्यात बंदुकीची दारू भरली होती आणि आमच्या सर्पणात हा तुकडा मिसळून ठेवला होता. पण नुकसान करण्या-इतपत त्यात पुरेशी दारू नव्हती!"

खोखोलच्या मागे उभे राहून मी समोरच्या जमावाकडे पहात होतो. हातात कुऱ्हाड धरलेला तो शेतकरी घाबऱ्याघुबऱ्या चेहऱ्याने आपल्या शेजाऱ्यांना सांगत होता:

"हा तुकडा त्यानं माझ्याकडं अस्सा भिरकावला म्हणून सांगू..."

सैनिक कोस्तिन एव्हाना थोडासा झिंगलेला होताच! तो मोठ्यांदा बरळला:

"ह्या पाखंड्याला हाकलून लावा! कोर्टात खेचा!"

पण बहुसंख्य लोक गप्प होते. रोमासकडे टक लावून पहात होते आणि त्याचे बोलणे संशयाने ऐकत होते.

"घर उडवून देण्यासाठी खूप दारू लागते! जवळ जवळ एक पूड! आता तुम्ही आपापल्या घरी का जात नाहीत?"

कुणीतरी ओरडला:

"स्तारोस्ता कुठं आहे?"

"ऊर्यादनीकला बोलवा!"

सावकाशपणे, अनिच्छेने शेतकरी पांगले.

त्यांचा अपेक्षाभंग झाला होता असे दिसले.

आम्ही घरात गेलो. आक्सीन्याने चहा दिला. एवढचा मऊ आणि प्रेमळपणे वागताना तिला यापूर्वी मी कधीच पाहिले नव्हते. रोमासकडे सहानुभूतीचा कटाक्ष टाकून ती म्हणाली:

"तुम्ही कधीही तक्रार गुदरत नाही, म्हणून तुमच्याशी ते लोक वाट्टेल तसा वात्रटपणा करतात."

"तुम्हाला याचा राग आला नाही?" मी विचारले.

"क्षुल्लक मूर्ख बाबींवर चिडत बसायला माझ्यापाशी वेळ नाही."

माझ्या मनात विचार आला: असे मुळीच विचलित न होता माणसे आपापली कामे करीत राहिली तर! पण मला माझ्या विचारांमध्ये रमायला रोमासने संधीच दिली नाही. कझानहून माझ्यासाठी कोणती पुस्तके आणायची याबद्दल मला तो विचारीत होता. लौकरच कझानला फेरी मारून येण्याचा त्याचा बेत होता.

काही वेळा मला असे भासायचे की, ह्या माणसाचा जेथे आत्मा असेल तेथे घड्याळासारखी एक यंत्रणा बसविलेली असावी. सबंध आयुष्य-भर त्या यंत्रणेची संथ सुरळीत टिक टिक चालू असावी. मला खोखोलचा खूप लळा लागला होता आणि त्याच्याविषयी माझ्या मनात अत्यंत आदराची भावना वसत होती. पण त्याने एखाद्या दिवशी तरी चिडावे, ओरडावे आणि पाय आपटावे, अशी माझी तीव्र इच्छा होती. हा राग त्याने माझ्यावर अथवा इतर कुणावरही काढलेला मला चालला असता. पण तो रागाला अजिबात बळी पडत नव्हता असे दिसत होते. एखाद्याचा मूर्खपणा अथवा दुष्टपणा त्याला राग आणी, तेव्हा आपले राखी डोळे तो उपहासाने आकुंचित करायचा व काहीतरी थंड शेरा मारायचा. त्याचा तो टोमणा अगदी मोजक्या शब्दात असे, साधा असे आणि नेहमी कठोर असे.

एकदा त्याने सूस्लोवला विचारले:

"तुम्ही ढोंगी का वागता? वयानं वडीलधारे असून!"

त्या म्हाताऱ्या शेतकऱ्याचे पिवळसर गाल आणि कपाळ हळूहळू किरमिजी बनले. त्याची हिमशुभ्र दाढीसुद्धा मुळांपाशी गुलाबी बनल्याचा भास झाला.

"अशा वागण्यानं तुमचं मुळीच हित होणार नाही आणि लोकांचा तुमच्याविषयीचा आदर मात्र गमावून बसाल!"

"बरोबर आहे. त्यामुळं भलं होत नाही."

नंतर तो इझोतला म्हणाला होता :

"हा खरा पुढारी आहे. अशा प्रकारचे आपले अधिकारी आपण निवडू शकलो तर खूप छान होईल!"

...रोमास घरापासून दूर असताना मी कारभार कसा चालवायचा त्याचा अत्यंत थोडक्यात आणि स्पष्ट खुलासा रोमासने केला. मला असे भासले की, त्या सकाळी झालेला स्फोटाचा प्रकार तो संपूर्ण विसरून गेला होता. माशीचा चावा विसरावा त्याप्रमाणे!

पान्कोव आत आला. त्याने चुलाण्याची पाहणी करून खिन्नपणे विचारले :

"घाबरलात?"

"कशाला?"

"हे युद्ध आहे."

"आमच्याबरोबर थोडा चहा प्या!"

"माझी बायको माझी वाट पाहतेय."

"कुठं गेला होता?"

"मासे धरायला. इझोतबरोबर."

तो निघून गेला. स्वयंपाकघरातून जाताना तो पुन्हा गंभीरपणे म्हणाला : "हे युद्ध आहे."

खोखोलबरोबर बोलताना पान्कोव नेहमी मोजके शब्द वापरीत असे. जणू महत्त्वाच्या आणि गुंतागुंतीच्या सर्व गोष्टी त्या दोघांनी फार पूर्वीच बोलून टोकल्या होत्या असे वाटे. इवान ग्रोझ्नीच्या (भयंकर इवान – अनु.) कारकीर्दीची रूपरेषा रोमासने सांगितली होती तेव्हा मला आठवते की, इझोत म्हणाला होता :

"पीडा देणारा झार होता!"

"खाटिक होता," कुकूश्किनने पुस्ती जोडली होती. पण पान्कोव मात्र ठामपणे म्हणाला होता :

"त्यानं फारसा शहाणपणा दाखवला नाही. त्यानं मोठ्या सुभेदारांना ठार मारलं आणि त्यांच्या जागी छोट्या जमीनदारांचा आख्खा कळप जोपासला, यात काय साधलं? शिवाय काही परकी लोकांना बाहेरून आणलं! काही अर्थ नाही त्यात. मोठ्या जमीनदारापेक्षा छोटा जमीनदार

महावाईट! माशी म्हणजे लांडगा नव्हे; तुम्ही बंदुकीनं माशीला ठार मारू शकत नाही. पण लांडग्यापेक्षा माशी तुम्हाला जास्त सतावते!"

बादलीभर ओली चिकणमाती घेऊन कुकूश्किन हजर झाला. चुलाण्याच्या तोंडाशी निखळलेल्या विटा लिंपीत तो म्हणाला:

"त्या महामूर्खांना काय वाटतं! स्वतःच्या अंगावरच्या उवा मारता येत नाहीत, पण माणसाला ठार करायचं म्हटलं की जिवाचा आटापिटा करतात! आन्तोनिच, जास्त माल भरून ठेवू नका. त्यापेक्षा जास्त चकरा मारा आणि एका वेळी फारसं सामान आणू नका. काही कळायच्या आत ते घर पेटवून देतील. संकट नक्कीच येणार, कारण "त्या गोष्टीची" तुम्ही व्यवस्था करताहात!"

"ती गोष्ट" म्हणजे फळांची पैदास करणाऱ्यांची सहकारी संस्था होती. खेड्यातील श्रीमंतांच्या दृष्टीने ती अत्यंत अप्रिय गोष्ट होती. पान्कोव, सूस्लोव आणि आणखी दोन-तीन निखळ मनाच्या शेतकऱ्यांच्या साहाय्याने खोखोलने एव्हाना संघटना बांधली होती. बहुतेक लोक रोमासला अनुकूल बनले होते आणि दुकानच्या गिऱ्हाईकांची संख्या बरीच वाढली होती. बारीनोव आणि मिगुनसारखे "कुचकामी" लोक-सुद्धा खोखोलला शक्य ती मदत करीत होते.

मिगुनकडे मी खूप ओढला गेलो होतो. त्याची सुंदर, करुण गाणी माझ्या काळजाला जाऊन भिडत. गाताना मिगुन डोळे मिटून घेई आणि त्याच्या जखमी चेहऱ्याचे झटके थांबत. जेव्हा आकाशात चंद्र नसे अथवा मेघांची खूप दाटी झालेली असे, अशा काळोख्या रात्री त्याचा संचार चालायचा. काहीवेळा संध्याकाळी तो माझ्या कानात कुजबुजायचा:

"वोल्गावर ये!"

वोल्गाच्या किनाऱ्यावर मासे धरण्याची तयारी करण्यात गुंतलेला मिगुन मला आढळायचा. आपल्या होडीच्या नाळेवर आडवे बसून तो आपले काळे, धनुष्याकृती पाय काळया पाण्यात हलवीत रहायचा. अगदी शांतपणे तो म्हणे:

"शिकली-सवरलेली माणसं मला वाईट वागवतात तेव्हा त्यांचं मला फारसं काही वाटत नाही. एक वेळ तो अपमान मी सहन करू शकतो. कारण भल्या माणसाला ठाऊक असलेल्या अनेक गोष्टी मला कधीच माहीत नसतात. पण माझ्यासारख्याच अडाणी शेतकऱ्यांनी जर मला शिवीगाळ सुरू केली तर ती मी कशी सहन करणार? आमच्यात काय

फरक आहे? फक्त ते आपले पैसे रूबलमध्ये मोजतात, तर मी माझे पैसे कोपेकमध्ये मोजतो, एवढंच!"

अशा वेळी मिगुनच्या चेहऱ्याला जोरदार झटके येऊ लागत. त्याची जखमेच्या वणाची भुवई जास्त थरथरू लागे. मच्छीमारीच्या साहित्याची जुळवाजुळव त्याची बोटे चपळपणे करू लागत. त्याचा भरदार आवाज संथपणे उमटत राही:

"मला ते चोर म्हणतात. बरोबर आहे. मी चोरी करतो. पण प्रत्येकजण दरोडेखोरी करूनच जगत नाही का? प्रत्येकजण जास्तीत जास्त प्रमाणात दुसऱ्याला पिळत नाही का? आयुष्य असंच चालतं. देवाचं आपल्यावर प्रेम नाही आणि सैतानाच्या स्वतःच्या तऱ्हा आहेत!"

काळी नदी आमच्या शेजारून सरपटत असायची आणि डोक्यावर काळे ढग सरपटत जायचे. काळोख दाट असल्यामुळे दुसरा तीर आम्हाला नीटसा दिसत नसे. लाटा सावधपणे वाळूला स्पर्श करीत. माझ्या पायां-भोवती लाटांचा गराडा पडत असे. जणू किनाराविहीन, वाहत्या काळो-खात मला खेचून नेण्याचा त्यांचा मनसुबा होता, असे भासायचे.

"माणसाला जगावंच लागतं! होय की नाही?" उसासे टाकीत मिगुन विचारायचा.

किनाऱ्यावरच्या टेकाडावर कुत्र्याचे भयाण भुंकणे ऐकू यायचे. जणू स्वप्नात असल्याप्रमाणे मी स्वतःला प्रश्न विचारी:

"मिगुनसारखं जगायचं? पण – कशासाठी?"

नदीवर विलक्षण शांतता पसरलेली असायची. खूप काळोख आणि भेसूरपणा भरलेला असायचा. त्या उबदार काळोखाला अंत नसायचा.

"ते खोखोलला ठार मारतील. आणि तुलासुद्धा!" मिगुन पुटपुटायचा. अचानक खालच्या आवाजात तो गाणे म्हणू लागे:

माय माझी मायेनं म्हणली,
माय माझी म्हणली:
"अरे माझ्या याशा, लाडक्या याशा बाळा
बाबा शीक निवांत जगायला..."

त्याच्या पापण्या खाली झुकल्या. त्याचा आवाज अधिक भरदार झाला आणि त्यात अधिक कारुण्य दाटले. जाळी नीट करणारी त्याची बोटे किंचित मंदावली.

पण निवांत असा जगलो नाही,
कधीच नाही, कधीच नाही...

मला काहीतरी विचित्र भावना व्हायची. काळ्याकुट्ट पाण्याच्या जोरदार प्रवाहामुळे धरती दुभंगत असल्याचा भास व्हायचा. सूर्य जेथे बुडाला होता तेथे अंधाऱ्या गर्तेत मी कोसळत आहे असे वाटायचे.

जेवढ्या अचानकपणे मिगुनने गाणे सुरू केलेले असायचे तेवढ्याच अचानकपणे तो गाणे थांबवीत असे. किनाऱ्यापासून आपली होडी मुकाट-पणे पाण्यात ढकली आणि अजिबात आवाज न करता अंधारात नाहीसा होई. मी त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे टक लावून पहात चकित मनाने विचार करीत रहायचा:

"अशी माणसं का जगतात?"

माझा आणखी एक मित्र म्हणजे बारीनोव. अत्यंत ढिम्म, आळशी आणि बढाईखोर माणूस. त्याला दुसऱ्यांच्या कुचाळक्या सांगण्याचा फार नाद. अत्यंत अस्वस्थ भटक्या. तो मॉस्कोत राहिला होता आणि त्या शहराबद्दल कमालीच्या तिटकाऱ्याने बोलायचा:

"अगदी सैतानाचं शहर! एवढा गोंधळ! चर्च किती – चौदा हजार आणि सहा! आणि माणसं महा डामरट! अगदी प्रत्येकजण! लूत भरलेल्या घोड्यांप्रमाणं सगळेजण आपली अंगं खाजवतात. शप्पत, सगळ्यांना खरूज झालेली! व्यापारी, सैनिक, नगरवासी – सगळे सगळे शहरभर अंगं कराकरा खाजवीत फिरतात. मात्र एक गोष्ट – त्यांच्या-पाशी झारची तोफ आहे. महाप्रचंड! बंडखोरांवर डागण्यासाठी पहिल्या प्योत्रनं* स्वतः ओतली. तिथं एका बाईनं, मोठ्या घरची होती ती, त्याच्याविरुद्ध बंड केलं. प्रेमापोटी! तो तिच्याबरोबर सात वर्षं राहिला आणि मग तीन मुलांना आणि तिला टाकून गेला. ती चिडली आणि तिनं बंड उभारलं. मग बंधू, त्यानं ही तोफ एकदाच त्या बंडखोरांवर डागली आणि काय? नऊ हजार तीनशे आठ माणसं गारद! तो स्वतः-सुद्धा हादरला या प्रकारानं! फिलारेत नांवाच्या मुख्य धर्माधिकाऱ्याला तो म्हणाला: 'छेः छेः! ह्या तोफेचं तोंड आपण कायमचं बंद करून टाकलं पाहिजे! हे सैतानाचं खेळणं आहे!' म्हणून त्यांनी त्या तोफेचं तोंड बंद केलं!"

---

*पहिला प्योत्र (पीटर) १७-१८ व्या शतकातील रशियन झार.

हा सर्व मूर्खपणा आहे असे मी त्याला सांगितले तेव्हा त्याला अपमान वाटला.

"अरे देवा, तुझा न्याय अजब आहे. ही सगळी गोष्ट मी एका शिकल्या-सवरल्या माणसाकडून ऐकली आणि तू म्हणतोस की..."

"संतभेटींसाठी" तो कीव्हला गेला होता. त्या अनुभवाबद्दल तो म्हणाला:

"ते शहर काहीसं आपल्या ह्या खेड्यासारखंच आहे. असंच नदी-काठच्या उंच टेकाडावर. पण त्या नदीचं नांव मात्र मला आठवत नाही. आपल्या वोल्गासमोर ती नदी म्हणजे डबकं ठरेल! मोठं गुंतागुंतीचं शहर. सगळे वळणा वळणाचे रस्ते आणि वर टेकाडावर जाणारे. आणि माणसं — सगळी खोखोल! मात्र आपल्या मिखायलो आन्तोनोविचसारखी नाही. त्यांची जात वेगळी. अर्धी पोलिश आणि अर्धी तातार. ते लोक बोलत नाहीत. वचवच करतात. महा ओंगळ. केस कधी विंचरत नाहीत. बेडकं खातात आणि एकेक बेडूक दहा पौंड वजनाचा. गाड्या ओढायला ते बैलांना जुंपतात आणि शेतीकामालाही. फार छान बैल आहेत त्यांच्यापाशी. अगदी छोट्यातला छोटा बैल आपल्या बैलाच्या चारपट मोठा. एकेका बैलाचं वजन ८३ पूड. तिथं सत्तावन्न हजार संन्यासी आहेत आणि २७३ धर्माधिकारी... आता सांग! कसा तू वाद घालणार ह्यावर? हे मी सगळं स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलं. तू तिथं कधी होतास? नाही? मग झालं तर! बंधू, मला नेहमी अचूक रहायला आवडतं. ते महत्त्वाचं आहे."

त्याला आकडे आवडत. माझ्यापासून तो बेरीज आणि गुणाकार करायला शिकला. पण भागाकार मात्र त्याला सोसायचा नाही. काठी घेऊन तो वाळूमध्ये मोठमोठ्या संख्या लिहायचा आणि प्रचंड गुणाकार मोठ्या उत्साहाने करायचा. चुका झाल्या म्हणजे तो खूप शरमिंदा होई. पण योग्य आकडे आले म्हणजे लहान मुलाच्या नवलाईने आकड्यांची लांबलचक ओळ पहात उद्‌गार काढी:

"अरे बापरे! ही संख्या बोलतासुद्धा येणार नाही!"

बारीनोव हा वेडाबागडा, फाटक्या कपड्यांमधील, विस्कटलेल्या अवताराचा माणूस होता. पण त्याचा चेहरा मात्र खूप देखणा होता. उल्हासी, कुरळी दाढी आणि लहान मुलाच्या स्मितासारखे उजळलेले निळे डोळे. त्याच्या आणि कुकूश्किनच्या स्वभावामध्ये काहीसे साम्य

होते. आणि बहुधा ह्या साम्यामुळेच ते दोघे एकमेकांपासून दूर रहात.

बारीनोव दोनदा कास्पियन सागरावर मासे धरण्यासाठी गेला होता. त्याविषयी तो खूप वटवट करायचा:

"बंधू, पृथ्वीवर समुद्रासारखी दुसरी चीज नाही! माणूस समुद्रासमोर चिलट ठरतो! नुसतं त्याच्याकडं पहा, म्हणजे आपण कोण आहोत ते समजतं. तिथं आयुष्य किती गोड आहे. समुद्रापाशी सगळ्या प्रकारची माणसं गोळा झाली होती. त्यांच्यात एक धर्माधिकारीसुद्धा होता. बाकीच्यांप्रमाणंच काम करायचा. आणि एक स्वयंपाकीणही होती. कुणा एका वकीलाची रखेली होती म्हणे! आता माणसाला याहून जास्त काय हवं? पण समुद्राचं आकर्षण तिला स्वस्थ राहू देईना. त्याला म्हणाली, 'माझ्या लाडक्या, तू छान आहेस. पण तरीसुद्धा मी चालले!' कारण कुणीही एकदा समुद्र पाहिला, म्हणजे परत परत त्याला समुद्राकडं जावंसं वाटतं! अगदी आकाशासारखी समुद्रावर खूप मोकळी जागा असते. मुळीच गर्दी नाही. मीसुद्धा रहायला परत तिथं जाणार आहे. माझ्याभोवती लोकांची दाटी झालेली मला आवडत नाही. माझी ही खोड आहे. खरं म्हणजे एका आश्रमात मी संन्यासी म्हणून रहायला हवं होतं! पण असा चांगला आश्रम मला ठाऊक नाही..."

बेवारशी कुत्र्याप्रमाणे तो खेडचात वावरायचा. शेतकरी त्याचा तिटकारा करीत. पण मिगुनच्या गाण्यांप्रमाणेच बारीनोवच्या कहाण्या ते आवडीने ऐकत.

"मोठा धूर्त थापाड्या आहे!" ते म्हणत.

त्याच्या काही थापा तर पान्कोवसारख्या व्यवहारी आणि संशयी मनाच्या शेतकऱ्यांनासुद्धा आवडत. एकदा पान्कोव खोखोलला म्हणाला:

"इवान ग्रोझ्नीबद्दल पुस्तकांमध्ये सगळं खरं सांगितलेलं नाही असा बारीनोवचा दावा आहे. पुस्तकांनी खूप काही लपवून ठेवलंय. ग्रोझ्नी नेहमी माणूस म्हणून रहायचा नाही म्हणे! त्याचं गरूडामध्ये रूपांतर व्हायचं! म्हणून त्याच्या गौरवासाठी आपल्या पैशावर गरूडाचा छाप आहे."

जीवनातील वास्तव सत्यांविषयीच्या गंभीर खुलाशांपेक्षा काहीतरी अचाट, अफाट, कल्पनेने शोधून काढलेल्या गोष्टी ऐकण्यात लोकांना अधिक रस वाटतो, असे मला शेकडो वेळा आढळून आले होते.

याविषयी मी जेव्हा खोखोलपाशी बोललो तेव्हा स्मित करून तो म्हणाला होता:

"ही गोष्ट निघून जाईल. मुख्य म्हणजे लोकांनी विचार करायला शिकलं पाहिजे. मग सत्यापाशी पोचण्याच्या मार्गाचा ते स्वतःच विचार करतील. आणि नवनव्या कल्पना रचणाऱ्या बारीनोव, कुकूश्किनसारख्या लोकांना समजून घ्यायला तू शिकलं पाहिजेस. ते कलावंत आहेत, संशोधक आहेत. ख्रिस्तसुद्धा असाच अस्सल माणूस असला पाहिजे. आणि ख्रिस्ताचे काही शोध तेवढे वाईट नव्हते हे तू मान्य करशील."

एका गोष्टीचे मला आश्चर्य वाटले होते की, ही सर्व माणसे देवाविषयी फार क्वचित बोलत, खूप अनिच्छेने बोलत. फक्त म्हातारा सूस्लोव ठाम विश्वासाने वारंवार म्हणायचा:

"ही सारी देवाची इच्छा!"

आणि ह्या शब्दांमध्ये नेहमी मला अतीव निराशा जाणवायची. ह्या लोकांमध्ये मी खूप सुखी होतो. आमच्या संध्याकाळच्या गप्पांमध्ये त्यांच्यापासून मी बरेच काही शिकलो. रोमासने सादर केलेल्या प्रत्येक समस्येने एखाद्या बलाढ्य वृक्षाप्रमाणे आपली मुळे जीवनाच्या नेमक्या आशयात रोवली होती असे मला भासायचे. त्या गाभ्याशी ती मुळे तेवढ्याच बलाढ्य वृक्षाच्या मुळांशी वेढे घालायची. त्या वृक्षाची प्रत्येक फांदी विचाराच्या ठळक फुलांनी संपन्न होती. प्रभावी शब्दांचा पर्णसंभार तिच्यावर फुलला होता. पुस्तकांमधील उत्तेजक अमृत पीत असताना मला जाणवू लागले की, मी निश्चितपणे पुढे चाललो होतो. वाढत्या विश्वासाने मी बोलू लागलो. गालातल्या गालात हसत खोखोल अनेकदा माझे कौतुक करी:

"माक्सीमिच, तुझी चांगली प्रगती होतेय!"

ह्या त्याच्या शब्दांपायी मला कृतकृत्य वाटे.

पान्कोव काही वेळा स्वतःबरोबर बायकोला घेऊन येई. सौम्य चेहऱ्याची ती बाई शहरी थाटाचा पोषाख करीत असे. तिचे निळे डोळे तेजस्वी आणि बुद्धिमान वाटत. खोलीच्या एका कोपऱ्यात ती शांतपणे बसायची. नम्रपणे तिने तोंडाला मुरड घातलेली असे. पण थोड्या वेळानंतर तिचे ओठ विलग होत, डोळे विस्फारीत. एक भित्रे आश्चर्य तिच्या मुद्रेवर उमटत असे. आणि नंतर एखाद्या तिखट शेऱ्यावर कदाचित ती खुदकन हसायची आणि एकदम गोंधळून स्वतःच्या हातांच्या ओंजळीत आपला चेहरा लपवायची. रोमासला डोळा घालीत पान्कोव म्हणायचा:

"तिला समजतं!"

काही सावध पाहुणे खोखोलला भेटायला येत. त्यांना तो माझ्या पोटमाळ्यावरील खोलीत घेऊन जाई आणि त्यांच्याबरोबर तेथे तासचे तास बसे.

आक्सीन्या त्यांच्यासाठी खाण्या-पिण्याचे पदार्थ वर घेऊन जाई. ते सारे तेथेच झोपत. फक्त मला आणि आक्सीन्याला त्यांचे तेथील अस्तित्व माहीत असायचे. रोमासविषयी तिला फार निष्ठा होती. ती त्याची पूजक होती. रात्रीच्या वेळी ह्या पाहुण्यांना पुढच्या मुक्कामी पाठविण्याची व्यवस्था इझोत आणि पान्कोव करीत. एखाद्या येणाऱ्या-जाणाऱ्या वाफेच्या बोटीतून पाहुण्यांची पाठवणी होई. टेकाडावर उभे राहून मी होडीच्या मसूरीसारख्या अस्पष्ट आकाराकडे पहात राही. नदीच्या काळ्या किंवा चांदण्याच्या रुपेरी प्रकाशात न्हालेल्या पात्रातून मार्ग कापीत होडी आगबोटीच्या दिशेने जात असे. तिच्यावरील छोटा कंदील आगबोटीच्या कप्तानाचे लक्ष वेधून घेण्यासाठी हेलकावत असे. आणि ते दृश्य पहात असताना मी त्या महान, गुप्त कार्यात सहभागी होतो ह्या भावनेने माझा ऊर अभिमानाने भरून येई.

मारीया देरेन्कोवा शहरामधून आली होती. पण मला नेहमी शरमिंदी करणारी तिची ती नजर आता जाणवली नाही. आपण सुंदर आहोत अशी सुखद जाणीव आता तिच्या डोळ्यांमधून उमटत होती. आपल्या जोडीला एक उमदा, दाढीवाला तरुण साथीदार आहे ही अभिमानाची भावना तिच्या नजरेतून उमटत होती. तिचा मित्र इतरांशी बोलायचा त्याच संथ, किंचित उपरोधी सुरात तिच्याशीही बोलायचा. पण ती जवळ असली म्हणजे तो वारंवार आपली दाढी कुरवाळायचा. त्याचे डोळे प्रेमळ भावाने उजळायचे. ती खूप आनंदाने किनऱ्या आवाजात बोलायची. फिकट निळ्या रंगाचा पोषाख तिने केला होता आणि आपल्या सोनेरी केसांना तशीच फिकट निळी फीत बांधली होती. तिचे बालिश हात सतत अस्वस्थ होते. जणू काहीतरी शोधून त्यावर झडप घालायला ते उतावीळ झाले होते. कुठलेतरी गाणे ती स्वतःशी गुणगुणत होती आणि आपल्या गुलाबी, उजळ चेहऱ्याला छोट्या हातरुमालाने वारा घालीत होती. तिच्यामध्ये आता मला असे काहीतरी जाणवले, की त्यामुळे एक विरोधी आणि लहरी भावना माझ्यात उत्पन्न झाली व मी अस्वस्थ बनलो. मी तिला टाळण्याचा जास्तीत जास्त प्रयत्न करू लागलो.

जुलैच्या मध्यास इझोत नाहीसा झाला. लोक म्हणाले की तो बुडून

मेला असावा. दोन दिवसांनंतर ह्या तर्काला पुष्टी मिळाली, कारण एका बाजूने चिरडलेली आणि तळाला भोक पडलेली त्याची होडी नदीच्या खालच्या पात्रात सुमारे सात वेर्स्ता अंतरावर कुरणाळ किनाऱ्यावर वाहून आली. इझोत झोपला असावा आणि पाण्याच्या प्रवाहाच्या ओढीबरोबर त्याची होडी वाहात जाऊन खेड्याच्या खालच्या अंगाला पाच वेर्स्तावर नांगरून पडलेल्या पडावांवर जाऊन आपटली असावी, असे अनुमान काढण्यात आले.

हे घडले तेव्हा रोमास कझानमध्ये होता. संध्याकाळी कुकूश्किन दुकानात आला. पोत्यांच्या ढिगावर उदासपणे त्याने फतकल मारले आणि जमिनीकडे टक लावून पहात काही वेळपर्यंत तो गप्प बसून राहिला. शेवटी त्याने विचारले :

"खोखोल परत कधी येणार?"

"मला माहीत नाही."

त्याने आपल्या चेहऱ्यावर हात ठेवला आणि खरचटलेले गाल चोळायला सुरुवात केली. हळू आवाजात तो अश्लील शिव्या पुटपुटू लागला. घशात हाडूक अडकावे तसा अचानक विचित्र डुरकावू लागला.

"काय झालं?"

आपले ओठ चावीत त्याने मान वर करून माझ्याकडे पाहिले. त्याचे डोळे लाल झाले होते आणि त्याची हनुवटी थरथरत होती. एक शब्द बोलणे त्याला शक्य होईना. त्याच्यापाशी वाईट बातमी होती याची मला जाणीव झाली व ती तो केव्हा सांगतो त्याची तणावलेल्या मनःस्थितीत मी वाट पाहू लागलो. सरतेशेवटी, दाराकडे एक ओझरता कटाक्ष टाकून, अडखळत तो कसाबसा बोलला :

"मी तिथपर्यंत होडीतून गेलो होतो. मिगुनबरोबर. आम्ही इझोतची होडी तपासून पाहिली. होडीच्या तळाचं भोक... कुऱ्हाड मारून पाडलेलं आहे. समजलं? कुऱ्हाडीनं होडी फोडलीय! इझोतचा खून झाला. अगदी नक्की!"

मानेला मागे झटका देऊन तो एकापाठोपाठ एक घाणेरड्या शिव्या उच्चारू लागला. त्याला अधूनमधून कोरडे हुंदके येत होते. मग तो शांत झाला आणि त्याने अनेकवेळा क्रूसाची चिन्हे केली. त्याची ती अवस्था पाहणे मोठे कष्टदायक होते. त्याचे सबंध शरीर गदगदत होते. दुःखाने आणि रागाने तो घुसमटला होता. त्याला रडायचे होते, पण

तो रडू शकत नव्हता. कसे रडायचे ते त्याला ठाऊक नव्हते. पुन्हा त्याने मानेला झटका दिला, उडी मारून उठून तो उभा राहिला आणि निघून गेला.

दुसऱ्या संध्याकाळी, नदीत डुंबणाऱ्या पोरांच्या टोळक्याला इझोत सापडला. खेड्याच्या वरच्या अंगाला एक फुटका पडाव पडला होता. तो अर्धा नदीत आणि अर्धा गोटयांच्या किनाऱ्यावर होता. त्याच्या नाळेच्या खालच्या पाण्यात, मोडक्या सुकाणूच्या अवशेषाला इझोतचे लांबोडे शरीर अडकले होते. त्याचे तोंड खाली होते, त्याची कवटी फुटलेली होती आणि रिकामी होती. पाण्याने मेंदू धुवून नेला होता. इझोतवर मागून कुऱ्हाडीचा घाव घालण्यात आला होता आणि त्याच्या डोक्याची मागील बाजूने छकले झाली होती. प्रवाहाने त्याच्या शरीराला हेलकावे दिले होते. त्याचे पाय किनाऱ्याकडे ओढले जात होते आणि हात ताणले होते. त्यामुळे तो पाण्यातून बाहेर पडण्याची धडपड करत होता असा भास होत होता.

सुमारे वीस अथवा त्याहून जास्त शेतकऱ्यांचा एक घोळका नदीपाशी गोळा झाला होता. सारे दुर्मुखले होते आणि विचारात गढलेले दिसत होते. हे सगळे अधिक सधन गावकरी होते. गरीब शेतकरी अजून शेता-तील कामावरून परतले नव्हते. लुच्चा आणि भित्रा स्तारोस्ता हातातील काठी फिरवीत उगाचच गडबड करीत होता. तो सारखा सूं सूं करीत होता व आपल्या गुलाबी सदऱ्याच्या बाहीवर नाक पुसत होता. बांधील अंगाचा दुकानदार कूझ्मिन पाय फेंगाडून आणि आपले ढेरपोट पुढे काढून उभा होता. माझ्याकडे आणि कुकूश्किनकडे तो आळीपाळीने कटाक्ष टाकीत होता. त्याच्या भुवया आकुंचित झाल्या होत्या. पण त्याच्या रंगहीन डोळ्यांमध्ये अश्रू भरले होते. त्याचा देवीच्या वणांचा चेहरा क्षीण आणि गोंधळलेला होता असे मला वाटले.

"छी:, हे फार वाईट काम झालं," स्तारोस्ता विव्हळला. आपल्या फेंगड्या पायांनी तो किनाऱ्यावर धावपळ करीत होता. "छी: छी:, अगदी दुष्टपणा!"

त्याची गुबगुबीत सून नदीकिनारीच्या एका दगडावर बसली होती. पाण्याकडे ती शून्य नजरेने पहात होती आणि कापऱ्या बोटांनी क्रूसचिन्हे करीत होती. तिचे तोंड थरथरत होते. तिचा खालचा जाड आणि लाल ओठ कुत्र्यासारखा किळसवाणेपणाने लोंबत होता. त्यामुळे तिचे

पिवळे दात दिसत होते. उतारावरून गडगडत मुले आली. मुली लगबगीने धावल्या — टेकाडावर रंगाचे चकचकीत ठिपके चमकू लागले. मग पुरुष मंडळी घाईघाईने आली. शेतात काम केल्यामुळे धुळीने माखलेली. सबंध जमावावर एक खालच्या सुरातील सावध कुजबुज ओठंगली होती.

"पीडा होता लेकाचा!"

"कोण — तो?"

"कुकूश्किन पीडा आहे म्हणतोय!"

"इझोतनं कधी कुणाला इजा केली नव्हती!"

"कधी कुणाला इजा केली नव्हती ना?" जमावावर खवळून उठत कुकूश्किन ओरडला. "मग कशासाठी तुम्ही त्याला ठार मारलंत? आँ? अक्करमाशांनो, कशासाठी त्याला ठार मारलंत? आँ?"

अचानक एक बाई वेड्यासारखी हसत किंचाळली. तिच्या जंगली आरोळ्या जमावावर आसूडाप्रमाणे फटकारे मारीत होत्या. शेतकरी एकमेकांवर ओरडू लागले, एकमेकांना शिव्याशाप मोजू लागले, एकमेकांवर गर्जू लागले. कुकूश्किन दुकानदारावर धावून गेला आणि त्याच्या खोलगट गालांवर त्याने एक सणसणीत चपराक लगावली.

"हे घे — पशू कुठला!"

आपल्या मुठींनी रस्ता मोकळा करीत तो त्या घोळक्याच्या धक्काबुक्कीमधून बाहेर पडला आणि जवळ जवळ आनंदाने ओरडून मला म्हणाला:

"पळ इथून! आता इथं मारामारी होणार!"

एव्हाना कुणीतरी त्याला मारले होते. त्याचा ओठ फाटला होता आणि त्यातून रक्त वाहू लागले होते. पण त्याचा चेहरा मात्र समाधानाने उजळलेला होता.

"कूझ्मिनला मी हाणलं तेव्हा पाहिलंस?"

बारीनोव आमच्याकडे धावत आला. पडावापाशी दाट गर्दीने उभ्या असलेल्या लोकांच्या जमावाकडे अधूनमधून मान वळवून तो अस्वस्थ कटाक्ष टाकत होता. तेथील गोंधळात स्तारोस्ताचा पातळ आवाज उंचावला.

"तर मग सिद्ध कर! कशाकडं मी डोळा मिचकावला? सिद्ध कर!"

"इथून मला पसार झालं पाहिजे," आम्ही उतार चढून जाताना बारीनोव पुटपुटला. संध्याकाळची हवा दमट झाली होती आणि वाता-

वरणात दडपण आले होते. त्यामुळे श्वास घेणे मला अवघड बनले होते. सूर्याचा किरमिजी गोळा दाट, निळ्या मेघांमध्ये मावळत होता. आमच्या भोवतालच्या झुडुपांवर लाल चमक पसरली होती. दूर कोठेतरी वीज कडाडली.

इझोतचे मृत शरीर माझ्या डोळ्यांसमोर तरंगत होते. पाण्याच्या हालचालीबरोबर तो हेलकावे खात होता. त्याच्या रिकाम्या कवटीवरील केस प्रवाहामध्ये तरंगताना ताठ उभे राहिल्याप्रमाणे भासत होते. त्याचा हलका आवाज, त्याचे प्रसन्न बोलणे मला आठवत होते.

"प्रत्येकात लहान मुलाचा काहीतरी अंश असतो. आणि त्याला धरून तुम्ही काम केलं पाहिजे. माणसाच्या काळजामधल्या मुलाला धरून! खोखोलचं उदाहरण घे— तो पोलादाचा बनलाय असं तुला वाटेल! पण त्याचा आत्मा लहान बाळासारखा निष्पाप आहे."

माझ्या शेजारून ढांगा टाकीत चाललेला कुकूश्किन रुक्षपणे म्हणाला: "याच पद्धतीनं ते आपणा सर्वांची वाट लावतील. देव स्वर्गात आहे हे खरं—पण हा सारा मूर्खपणा आहे!"

ह्या सर्व गोष्टीनंतर दोन-तीन दिवसांनी, उशीरा रात्रीच्या समयी, खोखोल घरी परतला. कसल्यातरी गोष्टीमुळे त्याला खूपच आनंद झालेला होता व बोलताना नेहमीपेक्षा त्याचा स्वर जास्त प्रेमळ बनला होता. मी त्याला घरात घेताच माझ्या खांद्यावर थाप मारीत तो म्हणाला:

"माक्सीमिच, तुला पुरेशी झोप मिळत नाही."

"इझोतचा खून झाला!"

"क... का SS य?"

त्याच्या गालांवरील स्नायूंच्या जाड गुठळ्या फुगल्या आणि त्याची दाढी थरथरली. जणू त्याच्या छातीवरून खाली कोसळत ती वाहू लागलीय असे मला भासले. आपल्या डोक्यावरील टोपी काढण्याचेही त्याला भान राहिले नाही. खोलीच्या मध्येच थबकून त्याने डोके गदगदा हलविले. त्याचे डोळे किलकिले बनले.

"अच्छा. अज्ञात माणसांनी खून केला? अर्थातच!"

सावकाशपणे तो खिडकीपाशी गेला आणि खाली बसला. थकलेपणाने त्याने पाय सरळ सोडले.

"तरी मी त्याला सारखे इशारे देत होतो... पोलीस आले?"

"काल. स्तानोवोय."

"मग? काय निघालं चौकशीतून?" त्याने विचारले आणि आपल्याच प्रश्नाला उत्तर देत म्हटले: "अर्थातच काही नाही."

मी त्याला सांगितले की, स्तानोवोय कूझ्मिनकडे नेहमीप्रमाणे थांबला होता आणि कूझ्मिनला मारल्याबद्दल कुकूश्किनला पोलीस कोठडीत डांबून ठेवण्याचा त्याने हुकूम दिला होता.

"अच्छा. यावर एखादा काय बोलणार?"

समोवार तापविण्यासाठी मी स्वयंपाकघरात गेलो.

चहा पिताना रोमास म्हणाला:

"आपल्यातल्या उत्तमोत्तम माणसांना लोक अशा तऱ्हेनं ठार मारतात हे दुर्दैव आहे. असं दिसतं की, एखादा माणूस जेवढा जास्त चांगला, तेवढे लोक त्याला जास्त भितात. तो त्यांच्या उपयोगाचा नसतो. त्यांच्या रस्त्यातली तो धोंड ठरतो. मला सैबेरियामध्ये खेचून नेत होते तेव्हा वाटेत एक गुन्हेगार भेटला होता. तो चोर होता असं त्यानं मला सांगितलं. त्यांची पाचजणांची टोळीच होती. आणि एक दिवस असा उजाडला, जेव्हा त्यांच्यातल्या एकानं सुचवलं: 'गड्यांनो, हा चोरीचा धंदा बंद करू या. काय कल्याण आहे त्यात? आपण काही त्यामुळं श्रीमंत बनत नाही!' त्याबद्दल त्यांनी त्याचा गळा आवळून ठार मारलं. दारू पिऊन तो झोपलेला असताना. ज्या माणसानं ही गोष्ट मला सांगितली तो त्या ठार केलेल्या माणसाची अफाट स्तुती करत होता. तो म्हणाला: 'त्यानंतर आणखी तीन खून मी केले. त्यांचं मला दुःख नाही. पण आमच्या साथीदाराबद्दल मात्र अजूनही वाईट वाटतं! फार चांगला साथीदार होता. हुषार, आनंदी, निर्मळ मनाचा.' मी विचारलं: 'मग त्याला ठार का मारलंत? तो तुमचा विश्वासघात करील अशी भीती वाटली?' तुला माहीत आहे–त्या चोराला फार अपमान वाटला माझ्या बोलण्याचा. तो म्हणाला: 'आमच्या साथीदारानं कधीही, कशा-साठीही, आम्हाला धोका दिला नसता! कितीही पैशाची लालूच दाखवली असती तरीसुद्धा! पण, त्याच्या त्या बोलण्यानंतर त्याच्याबरोबर राहणं अवघड वाटायला लागलं होतं! आम्ही सारे पापी होतो आणि आमच्यात तो काहीसा संत ठरला होता. ते बरं वाटत नव्हतं.'"

खोखोल उठला आणि खोलीत येरझाऱ्या घालू लागला. आपला पाईप त्याने दातांमध्ये घट्ट धरला होता आणि हात पाठीशी बांधले होते. त्याची शुभ्र मूर्ती भव्य दिसत होती. त्याचा तातार पद्धतीचा सदरा

त्याच्या टाचांपर्यंत पोहोचत होता. अनवाणी पायांनी तो मंदपणे फिरत होता. शांतपणे, गंभीरपणे तो पुढे बोलू लागला:

"ह्या 'संतां'ची धास्ती, उत्तम लोकांचा समूळ उच्छेद – ह्या गोष्टी मी पुन:पुन्हा पाहिल्या आहेत. 'संता'शी वागण्याच्या लोकांच्या दोन तऱ्हा आहेत. त्याला अडकवण्याचा कंटाळा आला म्हणजे एक तर ते त्याचा या ना त्या पद्धतीनं काटा काढतील; किंवा कधी कधी त्याचा प्रत्येक शब्द ते झेलत राहतील, अनेक अडाण्यांप्रमाणं त्याच्यासमोर पोटांवर सरपटत राहतील. पण त्याच्यापासून शिकणं, त्याची जीवन-पद्धती अनुसरणं – ही अगदी वेगळी बाब. ते कसं करायचं तेच त्यांना माहीत नाही. किंवा तसं करायची कदाचित त्यांची इच्छाच नसेल?"

एव्हाना थंड झालेल्या चहाचा प्याला त्याने टेबलावरून उचलला आणि तो पुढे म्हणाला:

"तसं असणं अगदी शक्य आहे. विचार केला म्हणजे जाणवतं की, प्रचंड प्रयत्नांती लोक आपलं एक आयुष्य उभारतात. त्या आयुष्याची त्यांना सवय होते. आणि मग कुणी एक एकाकी आत्मा बंड करून म्हणतो की त्यांचं आयुष्य बरोबर नाही! बरोबर नाही? अरे, आमच्या-पाशी असलेलं सर्वोत्तम आम्ही ह्या आयुष्यात ओतलंय! सैतान वाट्टोळं करो तुझं! आणि मग माणसं ह्या संतावर, त्या शिक्षकावर प्रहार करतात. आमचा पिच्छा सोड, असं त्याला म्हणतात. पण 'तुमचं आयुष्य बरोबर नाही' असं म्हणणाऱ्यांच्याच बाजूला सत्य असतं. त्यांचीच बाजू सत्याची असते. आणि आयुष्य जर अधिक चांगल्या गोष्टींकडं पुढं जात असेल, तर ते त्यांच्याच प्रयत्नांमुळं!"

फडताळांवरील पुस्तकांकडे बोट दाखवीत तो म्हणाला: "विशेषत: त्यांचा प्रयत्न कारणीभूत असतो. मला पुस्तक लिहायला जमलं तर किती छान होईल! पण मला ते जमत नाही. माझे विचार बोजड आहेत, वेडेबागडे आहेत."

आपल्या हातांवर डोके टेकवून तो टेबलापाशी बसला.

"इझोतची उणीव आपल्याला फार जाणवेल..."

खूप वेळपर्यंत गप्प राहिल्यावर तो पुढे म्हणाला:

"मला वाटतं, आपण आता अंथरूणावर अंग टाकू या."

मी माझ्या पोटमाळ्यावरील खोलीत खिडकीशी जाऊन बसलो. शेतांवर विजा चमकत होत्या. त्या उजेडाने अर्धे आकाश उजळून निघत

होते. तो पारदर्शी लालसर प्रकाश चमकला म्हणजे प्रत्येक वेळी चंद्र घाबरून मागे सरकल्याचा भास होत होता. कुत्री भुंकत होती आणि विव्हळत होती. हे भयाण वृंदगान नसते तर कुठल्यातरी वाळवंटी बेटावर असल्याची भावना झाली असती. दूर मेघगर्जना ऐकू येत होत्या. खिडकीमधून कोंदून टाकणारी उष्ण हवा आत येत होती.

पुन्हा एकदा मला इझोत दिसला. नदीकिनारी लव्हाळ्यांखाली तो पडला होता. त्याचा निळा चेहरा आकाशाकडे वळला होता. पण काचे-सारख्या डोळ्यांची ताठर नजर आत वळली होती. त्याच्या तांबूस सोनेरी दाढीचा गुंता झाला होता. तोंडाचा आश्चर्याने आ वासला होता.

"माक्सीमिच, मुख्य गोष्ट आहे दयाळूपणा! मैत्री! म्हणून मला ईस्टर आवडतो. सगळ्या सणांमध्ये तो खरा मैत्री-सण आहे."

उन्हात त्याची निळी विजार वाळली होती. वोल्गाने स्वच्छ धुतलेल्या त्याच्या निळ्या पायांना ती चिकटली होती. त्याच्या चेहऱ्यावर माशा घोंगावत होत्या. त्याच्या शरीरामधून एक उग्र दुर्गंध येत होता.

जिन्यावर दणदण पावले वाजली. बैठ्या दारातून डोके झुकवून रोमास आत आला. तो माझ्या खाटेवर बसला आणि आपली दाढी कुरवाळायला त्याने हात वर उचलला.

"तुला मला काही सांगायचंय. मी लग्न करतोय!"

"इथं बाईला जगणं सोपं नाही."

तो माझ्याकडे एकाग्र नजरेने पहात राहिला. मी पुढे काय बोलतो याबद्दल कदाचित तो नवल करीत असावा. पण पुढे आणखी काय बोलावे ते मला सुचेना. विजेचा भयाण प्रकाश खोलीत लख्खदिशी चमकून गेला.

"माशा* देरेन्कोवाशी मी लग्न करतोय!"

मला हसू आवरणे जमले नाही. ह्या मुलीला कुणी माशा म्हणून हाक मारील असे यापूर्वी एकदाही माझ्या डोक्यात आले नाही. गंमत आहे. माझ्या माहितीप्रमाणे तिचे वडील अथवा तिचे भाऊ तिला कधीही माशा ह्या नांवाने हाक मारीत नसत.

"हसायला काय झालं?"

"काही नाही."

"तिच्या दृष्टीनं मी खूप वयस्क वाटतो?"

---

*माशा – मारीया ह्या नांवाचे लाडके रशियन रूप – अनु.

"छे: छे: !"

"तू तिच्या प्रेमात होतास असं ती मला सांगत होती!"

"मला वाटतं, तसं होतं!"

"आणि आता? प्रेमातून बाहेर पडलास?"

"होय! तसं मला वाटतं!"

दाढी सोडून तो शांतपणे म्हणाला:

"तुझ्या वयात माणसाच्या मनात अशा कल्पना वारंवार येतात. पण माझ्या वयात ही केवळ कल्पना नाही. ती तन-मनाला झपाटून टाकते. दुसरा विचारच मनाला शिवेनासा होतो."

कडवट स्मित करीत तो पुढे म्हणाला:

"अॅक्टियमची लढाई ऑक्टावियानसपुढे अँटनी हरला, त्याचं कारण क्लिओपात्रा घाबरून आपल्या जहाजातून पळून जाऊ लागली तेव्हा त्यांनं आपला काफला सोडला, सेनापतीची आपली कर्तव्यं तो विसरला आणि तिच्या पाठोपाठ धावला. प्रेमापायी माणसाची काय अवस्था होते पहा!"

तो उठला आणि खांदे ताठ करीत पुन्हा म्हणाला: "कोणत्याही परिस्थितीत मी लग्न करतोय!" एखाद्याने आपल्या इच्छेविरुद्ध वागावे तशी त्याची ती कृती होती.

"केव्हा?"

"शरदाच्या मोसमात. सफरचंदांचा व्यवहार संपला म्हणजे!"

दारामधून जाताना जरूरीपेक्षा जास्त खाली डोके झुकवून तो बाहेर गेला. पांघरूणात शिरताना मी मनाशी विचार केला की, शरदात इथून निघून जाणे इष्ट ठरेल. अँटनीबद्दल तो एवढे का बोलला? मला ते आवडले नाही.

सफरचंदांची पहिले फळे तोडण्याची वेळ लौकरच आली होती. फळे भरपूर आली होती. फांद्या फळभारांनी थेट जमिनीपर्यंत टेकल्या होत्या. फळबागांमध्ये एक उग्र सुगंध दाटला होता. वाऱ्याने खाली पडणारी आणि कीड लागलेली फळे गोळा करण्यासाठी लहान मुले फळबागांमधून धावपळ करीत होती.

ऑगस्टच्या आरंभी रोमास कझानहून परतला तेव्हा एका होडीतून त्याने माल आणला व दुसऱ्या होडीतून रिकाम्या टोपल्या आणल्या. आठवड्याच्या मधल्या वाराचे सकाळचे सुमारे आठ वाजले होते. खोखोलने

नुकतीच आंघोळ उरकली होती, स्वच्छ कपडे परिधान केले होते. चहा प्यायला बसता बसता तो उल्हसितपणे म्हणाला :

"रात्री नदीवर फार प्रसन्न वातावरण होतं..."

अचानक त्याने नाकाने हुंगत अस्वस्थपणे विचारले :

"तुला धुराचा वास येतोय?"

त्याच क्षणाला आक्सीन्या आवारात किंचाळली :

"आग! आग!"

आम्ही बाहेर धावलो. भाजीपाल्याच्या बागेच्या दिशेची शेड पेटली होती. शेडमध्ये आमचे रॉकेल, डांबर, तेल इत्यादींचे साठे होते. स्वच्छ सूर्यप्रकाशात फिकट दिसणाऱ्या आगीच्या पिवळया ज्वाळा छपराच्या दिशेने लपेटताना पाहून क्षणभर आम्ही स्तंभित झालो. मग आक्सीन्या पाण्याची बादली घेऊन आली. खोखोलने आगीच्या फुलांवर पाणी फेकले, बादली खाली टाकली आणि तो म्हणाला :

"याचा काही उपयोग नाही. माक्सीमिच, पिंपं बाहेर काढ. आक्सीन्या, दुकानात पळ!"

लौकरच मी डांबराचं एक पिंप शेडमधून बाहेर काढले आणि आवारातून रस्त्यावर आणून टाकले. नंतर मी रॉकेलचे पिंप उचलले. पण ते ढकलायला आरंभ केला तेव्हा लक्षात आले की, त्याचे बूच निसटले होते आणि रॉकेल बाहेर सांडत होते. मी बूच शोधत होतो तेव्हा आग स्वस्थ बसली नव्हती. फळयांच्या भिंतींच्या फटींमधून तिची शोधक बोटे चाचपडत होती. छप्पर तुटू लागले आणि एक मोठा आवाज माझ्या कानात घुमला. अर्ध्या रिकाम्या पिंपानिशी मी शेडबाहेर पडलो तेव्हा खेडयाच्या सर्व दिशांनी बायका, मुले आमच्याकडे पळत येताना मला दिसली. ती किंचाळत होती, ओरडत होती. खोखोल आणि आक्सीन्या दुकानामधील माल बाहेर आणीत होते व घळीशी त्याचा ढीग लावीत होते. रस्त्याच्या मध्यभागी संपूर्ण काळया कपडयांमधील एक म्हातारी उभी होती. आपल्या मुठी वळवून ती कर्कश्य आवाजात किंचाळत होती :

"अरे ऽ सैतानांनो!"

मी शेडमध्ये परतलो तेव्हा तेथे दाट धूर भरला होता. त्या दाट धुरात काहीतरी कडकड आवाज ऐकू येत होते. छपरावरून शेंदरी फिती लोंबत होत्या. भिंतीच्या जागी फक्त झगमगता लोखंडी कठडा उरला

होता. धुराने मी गुदमरलो होतो, समोरचे काही दिसत नव्हते. तशाच अवस्थेत एक पिंप मी दारापाशी ढकलत आणले. पण दारात ते अडकले व पुढे सरकेना. छपरावरून ठिणग्यांचा पाऊस माझ्यावर कोसळला. माझ्या हाता-तोंडाला चटके बसले. मी मदतीसाठी ओरडलो. खोखोल धावला आणि त्याने मला आवारात खेचून नेले.

"स्फोट व्हायच्या आत पळ!"

तो घरात घुसला. मी त्याच्या पाठोपाठ गेलो. माझी पुस्तके वाचविण्यासाठी पोटमाळ्यावर लगबगीने धावलो. खिडकीमधून सारी पुस्तके मी खाली फेकली तेव्हा टोप्यांची एक पेटी तेथे असल्याचे मला आढळले. खिडकीतून तिला खाली टाकण्याचा मी प्रयत्न केला, पण खिडकी फारच अरुंद होती. ते अर्धा पूड वजन मी उचलले आणि खिडकीची चौकट मोडण्याचा प्रयत्न करू लागलो. तेवढ्यात धुडुम् असा आवाज झाला आणि छपरावर काहीतरी उडाले. रॉकेलच्या पिंपाचा स्फोट झाला होता. छपरावर आग पेटली. अभद्र कडकड आवाज आला. माझ्या खिडकीपलिकडून ज्वालेचा तांबडा लोळ गेला. जाळ थोडासा खोलीत डोकावून गेला. उष्णता असह्य झाली होती. मी जिन्याकडे धावलो. पण खालून धुराचे दाट लोट वर आले आणि आगीचे किरमिजी साप पायरी पायरीवरून वळवळत वर येत होते. लाकडात लोखंडी दात घुसावेत तसा आवाज होत दार कोसळून पडले. माझे भान हरवले. धुराने मी आंधळा झालो होतो, माझा श्वास गुदमरला होता. किती युग-क्षणपर्यंत मी निःस्तब्ध उभा होतो ते सांगता येणार नाही. जिन्यावरील खिडकीमधून लिंबासारखा पिवळा, शेंदरी दाढीचा चेहरा डोकावला आणि नाहीसा झाला. त्याच्या चेहऱ्यावर वेडसर हास्य होते. दुसऱ्याच क्षणी छपरामधून लालभडक आगीचे लोळ उठले.

मला आठवते की, माझ्या डोक्यावरील केस चुरचुर आवाज करीत होते. त्याशिवाय मला दुसरा कोणताही आवाज ऐकू येत नव्हता. माझी अखेर आली असे मन आक्रोशत होते. माझे पाय जणू शिशाचे बनले होते आणि डोळे विलक्षण झोंबत होते. तरी मी माझ्या हातांनी डोळ्यांपुढे आडोसा धरला होता.

स्वसंरक्षणाच्या अंतःप्रेरणेमधून मला सुटकेचा मार्ग सुचला. माझी गादी, उशी, लिंबाच्या सालीचा मोठा गठ्ठा, अशा हाताला येतील त्या वस्तू गोळा केल्या. रोमासचा मेंढकातडी कोट डोक्या-खांद्यावर गुंडाळून

घेतला व ह्या सर्व गोष्टींसकट खिडकीतून खाली उडी ठोकली.

मी डोळे उघडले तेव्हा घळीच्या टोकाशी पडलो असल्याचे माझ्या लक्षात आले. माझ्याशेजारी रोमास बसला होता आणि ओरडून विचारीत होता :

"तू ठीक आहेस ना?"

मी उठलो आणि आमच्या कोसळणाऱ्या घराकडे स्तंभित होऊन पाहू लागलो. त्याच्यावर सर्वत्र चकचकीत लाल पताका लोंबत होत्या आणि त्याच्यासमोरील जमिनीला शेंदरी जिभा चाटीत होत्या. खिडक्यांमधून काळ्या धुराचे लोट उसळत होते. छपरावर पिवळी फुले झुलत होती.

"काय रे? ठीक आहेस ना?" खोखोलने पुन्हा ओरडून विचारले. त्याचा चेहरा काजळीने माखला होता. त्यावरून घामाच्या धारा वाहात होत्या. तो काळे अश्रू ढाळतोय असे त्याच्याकडे पाहणाऱ्याला वाटले असते. अस्वस्थपणे तो डोळयांची उघडझाप करीत होता. त्याच्या दाढीत लिंबाच्या सालीचे तंतू अडकले होते. माझ्या मनात भावनावेग दाटून आला. आनंदाची एक उल्हसित लहर चमकली. आणि मग माझ्या डाव्या पायात भयानक वेदना झाली. मी जमिनीवर कोसळलो आणि खोखोलला म्हणालो :

"माझ्या पायाचा सांधा मोडलाय!"

त्यांनी माझी मांडी चाचपली आणि अचानक जोरात हिसका मारला. एक तीक्ष्ण वेदना झाली. पण त्यानंतर काही मिनिटातच मी किंचित लंगडत चालू लागलो. आनंदित मनाने आमच्या वाचविलेल्या गोष्टी बाऱ्यामध्ये आणून ठेवायला मदत करू लागलो. दातांमध्ये आपला पाईप धरून रोमास आनंदून म्हणाला :

"रॉकेलचा स्फोट झाला आणि ते छपरावर उडालं तेव्हा मी तुला गमावलं अशी माझी खात्री झाली होती. आगीचा खांबच्या खांब वर उसळला आणि सबंध घरानं मग पेट घेतला. मी म्हटलं – माक्सीमिच, आता घेतो निरोप तुमचा!"

नेहमीप्रमाणे तो पुन्हा शांत बनला आणि वाचविलेला माल पद्धतशीरपणे रचून ठेवू लागला. आक्सीन्याही त्याच्याप्रमाणेच काजळीने माखली होती आणि तिचा अवतार विस्कटला होता. त्याने तिला सांगितले :

"तू इथं थांबून ह्या मालावर नजर ठेव. मी आग विझवायला जातो."

घळीवर धुरामधून कागदाचे कपटे फडफडत होते.

"एख्!" रोमास उद्गारला. "माझी लाडकी पुस्तकं! खलास झाली! शरमेची बाब आहे!"

एव्हाना चार घरे पेटली होती. दिवस निवांत होता आणि आगीने आपला वेळ घेतला. ती डावी-उजवीकडे सावकाशपणे पसरत होती. लवचिक पागोरे छपरांवर आणि कूडाच्या कुंपणांवर सोडीत होती. धग-धगत्या चौकटी कोरड्या शाकारलेल्या छपराला विंचरीत होत्या. कुंपणां-वरून आगीची वेडीवाकडी बोटे खाली-वर फिरत होती. डहाळ्या कडाकडा आवाज करीत पेट घेत होत्या. धूरभरल्या वातावरणात ज्वालांचा चिडका फूत्कार घुमत होता. जळत्या लाकडाची मंद, नाजुक कडकड ऐकू येत होती. धुराच्या ढगांमधून रस्त्यामध्ये आणि आवारांमध्ये सोनेरी फुफाटे पडत होते. लोक बेभान होऊन धावपळ करीत होते. प्रत्येक माणूस आपले घर आणि सामान वाचविण्याच्या फिकीरीत होता. सतत एकच किंकाळी घुमत होती:

"पा ऽऽ णी ऽऽऽ!"

पाणी खूप दूर होते. टेकाडाखाली. वोल्गाच्या पात्रात. रोमासने एका माणसाची बकोटी धरली, दुसऱ्याची कॉलर पकडली व वेगाने खेडुतांना एकत्र केले. त्यांचे त्याने दोन गट पाडले आणि आगीच्या दोन टोकांना त्यांना धाडून कुंपणे व देवडी घरे पाडायला सांगितली. गाव-कऱ्यांनी त्याचे हुकूम निमूटपणे पाळले. घरांची ओळ स्वाहा करण्याच्या, सबंध रस्ता गिळून टाकण्याच्या आगीच्या विश्वासपूर्वक प्रयत्नाविरुद्ध आता एक सुजाण संघर्ष सुरू झाला. पण ह्या लढाईत ती माणसे परक्या भावाने गेली. ती सावध वागत होती आणि त्यांच्या मनात यशाची आशा नव्हती असे वाटत होते.

माझ्या उत्तेजित मन:स्थितीत कधी नव्हे एवढे बळ माझ्या अंगी आल्याचे मला भासत होते. रस्त्याच्या कडेला लोकांचा एक छोटा गट उभा असलेला मी पाहिला. ते खेड्यातील श्रीमंत लोक होते. कूझ्मिन आणि स्तारोस्ता त्यांच्यात प्रामुख्याने उठून दिसत होते. आरडाओरड करीत, काठ्या उडवीत, हातवारे करीत ते उभे होते. केवळ बघ्यांची भूमिका बजावीत होते आणि आग विझवायला काडीची मदत करीत

नव्हते. माणसे शेतांमधून येत होती. बेफाम वेगाने घोड्यांवरून दौडत होती. बायका किंचाळत होत्या. मुले धावपळ करीत होती.

दुसऱ्या आवारातील देवड्यांनी पेट घेतला. गोठ्याची भिंत तात्काळ पाडणे आवश्यक होते. तिच्या कडांना एव्हाना ज्वाळेची चकचकीत फीत वेढली होती. आधाराचे खांब तोडायला शेतकऱ्यांनी प्रारंभ केला. पण ठिणग्या आणि निखाऱ्यांचा त्यांच्यावर वर्षाव झाला. पेटलेले सदरे चोळीत ते दूर पळाले.

"घाबरू नका!" खोखोल ओरडला.

पण त्याचा उपयोग झाला नाही. त्याने कुणाचीतरी टोपी खेचली आणि माझ्या डोक्यावर दाबली.

"तू ते टोक धर! मी हे धरतो!"

मी एक खांब तोडला, दुसरा तोडला. भिंत हेलकावू लागली. मी चाचपडत तिचे वरचे टोक धरले. खोखोलने माझे पाय खेचले. सबंध भिंत खाली कोसळली आणि मी तिच्याखाली सापडलो. शेतकऱ्यांनी ती कूडाची भिंत भराभरा रस्त्यावर खेचत नेली.

"भाजलं?" रोमासने विचारले.

त्याच्या कळकळीमुळे मला नवा हुरूप चढला. माझ्या दृष्टीने खूप थोर असलेल्या ह्या माणसापुढे मला काहीतरी करामत करून दाखविण्याची इच्छा होती. त्याची वाहवा मिळविण्यासाठी मी झपाटल्याप्रमाणे काम करू लागलो.

कबूतरांप्रमाणे आमच्या पुस्तकांची पाने धुरात अजून फडफडत होती.

उजव्या बाजूला आग आटोक्यात आली होती. पण डावीकडे मात्र आग जास्त पसरत चालली होती. घरांना एव्हाना आगीची झळ लागली होती. उजवीकडे थोडी माणसे रोमासने ठेवली आणि लाल सापांच्या नव्या लीलांना आळा घालण्यासाठी तो उरलेल्या सर्व शक्तींनिशी धोक्याच्या स्थळी धावला. श्रीमंत शेतकऱ्यांच्या गटाजवळून आम्ही धावत चाललो होतो तेव्हा त्यांपैकी एकाचे दुष्ट उद्गार माझ्या कानी पडले:

"ही मुद्दाम जाळपोळ केलीय!"

कूझ्मिन म्हणाला:

"त्याच्या बाऱ्यावर नजर टाकली पाहिजे!"

हे शब्द माझ्या स्मरणात टोचत राहिले.

उत्तेजक वातावरण, विशेषत: आनंदी उत्तेजक वातावरण वाढते

सामर्थ्य देते हे प्रत्येकाला ठाऊकच आहे. उत्साहाच्या भरात मी भान हरपून काम करीत राहिलो. थकव्याची मला जाणीवच राहिली नाही. शेवटी मी कोसळून पडलो. मला आठवते की मी जमिनीवर बसलो होतो आणि कसल्यातरी गरम गोष्टीला पाठ टेकली होती; तेवढ्यात रोमासने झटदिशी पाण्याची बादली माझ्यावर उपडी केली. आमच्या भोवतालचे शेतकरी कौतुकाने पुटपुटत होते:

"पोरगा भक्कम आहे!"

"तुमचा तो घात करणार नाही!"

रोमासच्या पायांशी मी माझे डोके दाबले आणि अत्यंत शरमून रडलो. माझे ओले केस नीट मागे वळवीत तो म्हणाला:

"आता विश्रांती घे! तू खूप श्रमलास!"

कोळसे मारणाऱ्या कामगारांप्रमाणे काळेकुट्ट बनलेले कुकूश्किन आणि बारीनोव माझे सांत्वन करीत मला घळीपलिकडे घेऊन निघाले:

"शांत हो बंधू! सगळं काही आता संपलंय!"

"तुला एकदम धसका बसला होता!"

भानावर येण्याचा प्रयत्न करीत मी स्वस्थ पडून होतो. तेवढ्यात सुमारे दहा श्रीमंत शेतकरी घळीमध्ये आमच्या बाऱ्याच्या दिशेने येत असलेले मला दिसले. स्तारोस्ता त्या सर्वांच्या पुढे होता. त्याच्या मागून दोन सोतस्की* रोमासच्या दंडांना धरून येत होते. रोमासच्या डोक्यावर टोपी नव्हती. त्याच्या ओल्या सदऱ्याची एक बाही टरकली होती. त्याचा पाईप त्याने आपल्या दातांमध्ये गच्च धरला होता. त्याचा चेहरा गंभीर होता आणि त्याने कपाळाला आठ्या घातल्या होत्या. सैनिक कोस्तिन आपली काठी परजीत बेभान ओरडत होता:

"आगीत फेका त्याला! पाखंडी कुठला!"

"बाऱ्या उघड!" कुणीतरी मागणी केली.

"कुलूप तोडा! किल्ली हरवलीय!" रोमास मोठ्या आवाजात म्हणाला.

मी चटकन उडी मारून उभा राहिलो, जमिनीवरून एक काठी उचलली आणि रोमासच्या एका बाजूला जाऊन उभा राहिलो. त्याचे पहारेकरी दूर झाले. स्तारोस्ता घाबरून कर्कश्य ओरडला:

---

*सोतस्की – निवडून दिलेला खेड्याचा पोलीस – अनु.

"देवाच्या भक्तांनो! तुम्ही कुलूपं तोडू शकत नाही! ते कायद्याच्या विरुद्ध आहे!"

कूझ्मिन माझ्याकडे बोट दाखवीत किंचाळला:

"हा आणखी एक! हा कोण आहे ते मला माहीत करून घ्यायचंय!"

"जरा दमानं घे माक्सीमिच," रोमास मला म्हणाला. "त्यांना असं वाटतंय की, सर्व माल मी बाऱ्यामध्ये लपवून ठेवलाय आणि स्वतःच दुकानाला आग लावून दिली!"

"तुम्हा दोघांचं हे काम होतं!"

"कुलूप तोडा!"

"देवाच्या भक्तांनो..."

"आम्ही जबाबदार राहू! तुम्ही नाही!"

"आम्हाला जाब द्यावा लागेल!"

रोमास हळूच कुजबुजला:

"माझ्या पाठीला पाठ देऊन उभा रहा, म्हणजे ते माझ्यावर मागून हल्ला करू शकणार नाहीत."

त्यांनी कुलूप तोडले. अनेक शेतकऱ्यांनी बाऱ्यात एकदम गर्दी केली आणि जवळ जवळ ताबडतोब ते बाहेर परतले. दरम्यान माझी काठी मी रोमासच्या हाती दिली होती. आणि स्वतः एक नवी काठी उचलली होती.

"तिथं काहीही नाही!"

"काहीच नाही?"

"लबाड साले, हाणा त्यांना!"

कुणीतरी चाचरत म्हणाला:

"आपलं चुकलं..."

पण उत्तरादाखल अनेक आवाज झिंगल्याप्रमाणे ओरडले:

"चुकलं म्हणजे काय म्हणायचंय तुला?"

"फेका त्यांना आगीत!"

"पीडाखोर कुठले!"

"सहकारी संस्था काढतायत म्हणे!"

"चोर! त्यांचा आख्खा जमावच चोर आहे!"

"चूप रहा!" त्या गोंधळाच्या वर स्वर लावून रोमास ओरडला.

"तुम्ही स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलंत: बान्यामध्ये काहीही नाही. आणखी काय हवंय तुम्हाला? सारं काही जळून खाक झालंय! जे आम्ही वाचवलं ते इथं जमा करून ठेवलंय! तुम्ही सारं पाहू शकता. माझा स्वतःचा माल जाळून मला काय फायदा?"

"विम्याचे पैसे!"

आणि पुन्हा सुमारे दहा आवाज जोरजोराने ओरडू लागले:

"कशाची आपण वाट पाहतोय?"

"आपण खूप सहन केलं!"

माझे पाय थरथर कापले. क्षणभर डोळ्यांपुढे अंधारी आली. लालसर धुक्यातून मला जंगली चेहऱ्यांचा जमाव दिसला. त्या चेहऱ्यांवर केसाळ भोके होती; ती ओरडणारी तोंडे होती. त्यांच्यावर प्रहार करण्याची प्रबळ इच्छा मी कशीबशी आवरून धरली होती. आता आम्हाला रिंगण घालीत, उडचा मारीत ते नव्या आरोळ्या ठोकीत होते:

"अरेच्चा! त्यांच्यापाशी लाठ्या आहेत!"

"लाठ्या!"

"माझी दाढी ते उपटणार," खोखोल म्हणाला. त्याच्या आवाजावरून तो हसत होता ते माझ्या लक्षात आले. "माक्सीमिच तुलाही प्रसाद मिळणार! मला वाईट वाटतं त्याबद्दल. पण गोंधळू नको. भानावर रहा!"

"अरे बघा! त्या पोराजवळ कुऱ्हाड आहे!"

खरेच! माझ्या कमरपट्ट्याला सुताराची कुऱ्हाड खोचलेली होती. मी तिच्याबद्दल विसरून गेलो होतो.

"ते घाबरलेले दिसतात," रोमास दबत्या आवाजात म्हणाला. "मात्र त्यांनी दंगा सुरू केला, तर तू कुऱ्हाड वापरू नको!"

माझ्या माहितीचा एक लंगडा, किरकोळ अंगाचा शेतकरी वेडचासारखा थयथय नाचत बेंबीच्या देठापासून ओरडत होता:

"त्यांच्या टप्प्यापासून लांब रहा आणि त्यांना धोंडे मारा! चांगली अद्दल घडवा!"

त्याने विटकरीचा एक तुकडा उचलला आणि जोरात भिरकावला. माझ्या पोटावर तो थाडदिशी आपटला. पण मी त्याला प्रत्युत्तर करण्याच्या आतच घळीच्या वरच्या टोकावरून कुकूश्किनने अचानक त्याच्यावर झेप घेतली. एकमेकांशी झुंजत दोघेही घळीच्या पायथ्याशी गडगडत गेले.

मग पान्कोव तेथे घाईघाईने अवतरला. त्याच्याबरोबर बारीनोव, लोहार आणि दहा-बारा इतर शेतकरी होते. तात्काळ कूझ्मिनने प्रतिष्ठित माघार घेतली.

"मिखायलो आन्तोनोविच, तुम्ही शहाणेसुर्ते आहात. तुम्ही समजू शकता! आगीमुळं शेतकऱ्यांची माथी भडकली!"

"खाली नदीवर चल, माक्सीमिच. थोडा चहा पिऊ," तोंडातून पाईप काढून आपल्या खिशात कोंबीत रोमास म्हणाला. घळीच्या दिशेने तो दाणदाण पावले टाकीत निघाला. आधाराला त्याने काठी धरली होती. त्याच्या पाठोपाठ जात कूझ्मिनने काही बोलण्याचा प्रयत्न केला तेव्हा त्याच्याकडे मानेनेच किंचित तिरपे पाहून रोमास म्हणाला:

"गाढवा! चालता हो!"

आमचे जेथे घर उभे होते तेथे जळत्या निखाऱ्यांचा ढीग आम्हाला आढळला. त्या निखाऱ्यांमध्ये स्वयंपाकघरातील चुलाणा मात्र शाबूत राहिला होता आणि तापलेल्या हवेत त्याच्यामधून फिकट निळसर धुराची रेषा उमटत होती. कोळ्याच्या पायांप्रमाणे लोखंडी खाटेच्या लाल तापलेल्या कांबी चारी दिशांनी पुढे आल्या होत्या. जळून गेलेले फाटकाचे खांब काळ्या पहारेकऱ्यांप्रमाणे ते सारे दृश्य पहात होते. त्यातील एका खांबाच्या माथ्यावर निखाऱ्यांची लाल टोपी होती व तिच्याभोवती पिसासारख्या ज्वाला फडफडत होत्या.

"सगळी पुस्तकं गेली," उसासा टाकीत खोखोल म्हणाला. "फार वाईट झालं!"

डुकराच्या पिलांना हाकलीत न्यावे त्याप्रमाणे धुमसत्या अवशेषांना आवारामधून काठ्यांनी रेटत रेटत चिखलभरल्या रस्त्यावर लहान मुले नेत होती. तेथे फस्स आवाज करीत ते अवशेष विझून जात आणि त्यांच्यामधून तिखट, पांढरट धूर बाहेर पडे. निळ्या डोळ्यांचे, तागासारखे केस डोक्यावर असलेले एक पाच वर्षांचे कारटे उबदार काळ्या डबक्याशी बसले होते आणि पोचा आलेल्या एका बादलीवर लाकडाच्या तुकड्याने बडवीत होते. त्या एकसुरी ठेक्यामध्ये त्या पोराची जणू समाधी लागली होती. ज्यांची घरे आगीच्या भक्ष्यस्थानी पडली होती असे लोक भकास मुद्रांनी फिरत होते आणि आगीतून बचावलेले घरचे सामान गोळा करीत होते. जळक्या सामानाच्या मालकीसाठी रडणाऱ्या बायका एकमेकींना शिव्याशाप मोजीत होत्या आणि भांडत होत्या. फळबागांमधील झाडे

स्तब्ध उभी होती. आगीच्या धगीमुळे काही झाडे करपली होती. त्यामुळे लाल लाल सफरचंदांचे वैपुल्य विशेषत्वाने जाणवत होते.

नदीवर जाऊन आम्ही आंघोळी केल्या. मग तीरावरील चहाच्या दुकानात मुकाटपणे चहा पीत बसलो.

"सफरचंदांच्या बाबतीत मात्र ढेरपोटी मंडळी हरली आहेत," सरतेशेवटी रोमास म्हणाला.

पान्कोव आत आला. तो विचारात गढलेला दिसत होता आणि नेहमीपेक्षा जास्त सौम्य बनला होता.

"कसं काय वाटतंय?" खोखोलने त्याला विचारले.

पान्कोवने खांदे उडविले.

"माझ्या घराचा विमा उतरवलेला होता."

शांतता पसरली होती. आम्ही त्रयस्थांप्रमाणे बसलो होतो आणि एकमेकांना नजरांनी जोखत होतो.

"मिखायलो आन्तोनिच, आता तुम्ही पुढं काय करणार?"

"अजून मी काही ठरवलं नाही."

"तुम्हाला इथून निघून गेलं पाहिजे."

"बघू!"

"माझ्यापाशी एक योजना आहे," पान्कोव म्हणाला. "कुठंतरी बाहेर चला. मग आपण बोलू."

ते दोघे निघून गेले. जाताना दारामध्ये पान्कोव किंचित थांबला आणि माझ्याकडे वळून म्हणाला:

"ए पोरा, तू काही भित्रा नाहीस! तू इथं रहायला हरकत नाही. लोक तुला भिऊन वागतील."

मीसुद्धा चहाच्या दुकानातून बाहेर पडलो आणि नदीतीरावर झुडुपांच्या सावलीत पहुडलो.

सूर्य एव्हाना पश्चिम क्षितिजावर मावळू लागला होता, तरी खूप गरम होत होते. ह्या खेड्यातील माझे संपूर्ण जीवन माझ्या नजरेसमोर उभे राहिले. जणू नदीच्या विशाल सुरळीवर तैलरंगात रंगविलेल्या चित्राप्रमाणे. माझे अंतःकरण जडावले होते. पण थकव्याने माझ्यावर मात केली आणि मी गाढ झोपलो.

"जागा हो!" झोपेतच मी अस्पष्ट आवाज ऐकला. कुणीतरी मला गदागदा हलवीत होते आणि कोठेतरी खेचून नेण्याचा प्रयत्न करीत

होते असे मला जाणवले. "तू मेलास की काय? ऊठ! जागा हो!"

नदीपलिकडील कुरणांवर चंद्र ओठंगला होता. तो लालभडक दिसत होता आणि गाडीच्या चाकाएवढा मोठा होता. माझ्याशेजारी गुडघ्यांवर बसून बारीनोव माझा खांदा गदागदा हलवीत होता.

"चल! खोखोल तुला शोधताहेत. ते काळजीत पडलेत."

उतारावर माझ्या पाठोपाठ येताना तो तक्रारीच्या सुरात म्हणाला:

"कुठंही पडशील तिथं झोपायचं हे काही ठीक नाही! समज, वर टेकाडावर कुणी गेलं असतं, धडपडलं असतं आणि खाली तुझ्या अंगावर दगड कोसळला असता म्हणजे? किंवा त्यांनी मुद्दाम तसा दगड टाकला असता! ती माणसं अशी अर्ध्यावर थांबणारी नव्हेत. बंधू, आमची माणसं मनात आकस धरून राहतात. त्याहून आठवण ठेवायला दुसरं अधिक चांगलं त्यांना काही सापडत नाही!"

झुडुपांमधून कुणीतरी हळूच चालत असल्याची चाहूल लागली. फांद्या थरथरलेल्या मी पाहिल्या.

"सापडला?" मिगुनचा भरदार स्वर आला.

"धडधाकट!" बारीनोव उत्तरला.

काही अंतर आम्ही मुकाट चालत गेलो. मग बारीनोव उसासा टाकून म्हणाला:

"पुन्हा चोरून मासे मारायला जातो. मिगुनसुद्धा – त्याचं आयुष्यही सोपं नाही!"

मी रोमासपुढे उभा राहिलो तेव्हा त्याने कठोर शब्दात माझी हजेरी घेतली.

"एवढा कसा निष्काळजी वागतोस? तुला मार खायची इच्छा झालीय?"

बारीनोव निघून गेल्यानंतर खिन्नपणे, शांत आवाजात रोमास मला म्हणाला:

"पान्कोव तुला काम देऊ इच्छितोय. एक दुकान उघडण्याचा त्याचा बेत आहे. हे काम स्वीकारण्याचा सल्ला मी तुला देत नाही. माझ्यापाशी जे काही उरलं होतं ते मी त्याला विकून टाकलंय आणि मी व्यातकाला जातोय. माझं तिथं बस्तान बसलं म्हणजे तुला बोलावणं धाडीन. तिथं आपण पुन्हा एकत्र येऊ. कबूल?"

"मी विचार करीन."

"छान !"

तो जमिनीवर आडवा झाला. एक-दोनदा त्याने कूस वळविली आणि मग स्तब्ध झाला. मी खिडकीशी बसून वोल्गा पहात राहिलो. पाण्या-वरील चंद्राचे प्रतिबिंब आगीच्या प्रकाशासारखे भासत होते. दूर किनाऱ्या-जवळून वाफोर चालला होता. त्याच्या पंख्यांचे सपकारे जोरात ऐकू येत होते. डोलकाठीवरील तीन कंदील रात्रीच्या अंधारामधून तरंगत जात होते. आकाशातील ताऱ्यांना ते घासून जात होते आणि काही वेळा त्या ताऱ्यांना झाकून टाकीत होते.

"शेतकऱ्यांविरुद्ध धुमसतो आहेस?" झोपाळू आवाजात रोमासने विचारले. "तसं करू नको. ते मूर्ख आहेत. दुसरं काय? दुष्टावा हा मूर्खपणाचा एक प्रकार आहे."

असे शब्द माझे सांत्वन करू शकत नव्हते. माझा कडवटपणा कमी करू शकत नव्हते. माझ्या दुखऱ्या जाणीवेची तीव्रता कमी करू शकत नव्हते. ते केसाळ, पशूंसारख्या खोपड्यांचे चेहरे पुन्हा माझ्या नजरे-समोर तरळले. भयानकरीत्या ते किंचाळत होते:

"त्यांच्या टप्प्यापासून लांब रहा! त्यांना दगड मारा!"

विसरून जाणे इष्ट होते अशा गोष्टी स्मरणातून पुसून टाकण्याची कला त्यावेळी मला अवगत झालेली नव्हती. पुढे मला आढळले की, त्या माणसांमध्ये प्रत्येकात व्यक्तिशः फार थोडा दुष्टावा होता. अनेकांमध्ये तर दुष्टपणाच नव्हता. मुळात ते सुस्वभावी पशू होते. त्यांच्यापैकी कुणीही लहान मुलासारखा निर्व्याज हसू शकला असता. शहाणपणाच्या आणि सुखाच्या शोधांच्या कथा बालसुलभ विश्वासाने ऐकू शकला असता. उदात्त आणि उदार कृत्यांच्या कथा समरसून ऐकू शकला असता. ज्या आयुष्यात माणसाची स्वतःची इच्छा हाच एकमेव कायदा असेल अशा सोप्या आयुष्याविषयीचे स्वप्न वाढीला लावणारी कोणतीही गोष्ट आपल्या अंतःकरणात सामावून घेण्यास ते लोक तयार होते.

पण ही माणसे एकत्र जमली – खेड्यातील सभांना किंवा नदीतीरा-वरील खाणावळीत – म्हणजे स्वतःमधील सर्व चांगले गुण मागे गुंडाळून ठेवीत आणि पाद्र्यांप्रमाणे खोटेपणाचे व ढोंगीपणाचे बुरखे चढवीत. खेड्यातील बलिष्ठांसमोर लाळघोट्या कुत्र्याप्रमाणे वागू लागत. अशा वेळी त्यांना पाहताना मनात केवळ घृणा निर्माण होत असे. किंवा अचानक ह्या माणसांना दुष्टाव्याचे झटके येत. केस पिंजारून आणि

दात विचकून ते लांडग्यांप्रमाणे एकमेकांवर तुटून पडत. अत्यंत क्षुल्लक कारणांवरून जंगलीपणाने मारामाऱ्या करीत. अशा क्षणी ते खूप भीतीदायी वाटत. आदल्याच संध्याकाळी मेंढ्यांच्या कळपाप्रमाणे ज्या चर्चसमोर ते नम्रपणे डोकी झुकवून उभे होते, तेच चर्च आज जमीनदोस्त करतील अशा पिसाटपणे वागत. ह्या माणसांमध्ये कवी होते, गुणी कथानिवेदक होते. पण त्यांना कधी प्रेमाचे चार शब्द ऐकायला मिळाले नव्हते. खेड्यातील थट्टेचा ते विषय बनत. त्यांना दुर्लक्षित ठेवले जाई, त्यांचा तिटकारा करण्यात येई.

ह्या लोकांमध्ये जगत राहणे मला शक्य नव्हते. अगदी अशक्य होते. आणि निरोपाच्या दिवशी रोमासपुढे मी माझ्या मनातील सारी मळमळ ओकून टाकली.

"फार घाईनं काढलेला निष्कर्ष आहे," तो रोषाने म्हणाला.

"पण माझी स्वतःची त्याबाबत खात्री पटली असेल तर मी काय करायचं?"

"चुकीचा निष्कर्ष! अगदी बिनबुडाचा!"

प्रेमळपणे, नेट धरून तो माझ्याशी खूप वेळपर्यंत बोलत राहिला. माझी चूक घडत होती, माझे निष्कर्ष गैरसमजावर आधारलेले होते हे पटवून देण्याचा तो प्रयत्न करीत होता.

"धिक्कार करण्याची घाई करू नको! दोषी ठरवणं हा सर्वांत सोपा मार्ग आहे. आंधळेपणानं त्याचा स्वीकार करू नको. सगळ्या गोष्टी जिव्हारी लावून घेऊ नको. लक्षात ठेव: प्रत्येक गोष्ट निघून जाते. प्रत्येक गोष्टीत सुधारणा घडते. सावकाशपणानं? हो. पण टिकाऊ! स्वतःच्या डोळ्यांनी प्रत्येक गोष्ट पाहण्याचा प्रयत्न कर. तुझ्या हातांनी प्रत्येक गोष्टीला स्पर्श कर. कशालाही भिऊ नको. पण दोषी ठरविण्याची घाई करू नको. अच्छा माझ्या लाडक्या मित्रा, पुन्हा भेटू!"

पंधरा वर्षांनंतर, सेदलेत्समध्ये आमची पुन्हा गाठ पडली. दरम्यानच्या काळात, 'नरोदनोये प्रावो'* पक्षात कार्य केल्याबद्दल रोमासने याकुत्स्क प्रदेशात दहा वर्षे हद्दपारीची आणखी एक शिक्षा भोगली होती.

क्रास्नोविदोवो खेडे सोडून जाताना मला जड उदासपण आले होते. मालक हरवलेल्या कुत्र्याच्या पिलासारखा मी गावातून भटकत होतो.

---

* लोकांचा हक्क – अनु.

बारीनोवबरोबर मी खेड्यापाड्यातून भटकंती केली. श्रीमंत शेतकऱ्यांकडे मजूर म्हणून राबलो: झोडपणी केली, बटाटे खणून काढले, फळबागा साफ केल्या. बारीनोवच्या बाऱ्यात मी रहात होतो.

"अलेक्सेई माक्सीमिच, एकल्या जीवा!" एका पावसाळी रात्री बारीनोव म्हणाला. "उद्या आपण सागरप्रदेशाच्या सफरीला निघू या का? कसं? आपल्याला धरून ठेवण्यासारखं इथं काय आहे? कोण आहे? आपल्यासारखी माणसं इथं कुणाला आवडत नाहीत. इथले लोक एखाद्या दिवशी खूप झिंगले म्हणजे आपलं काय करतील त्याचा काही नेम नाही!" .

बारीनोवने हा प्रस्ताव यापूर्वीही केला होता. तोसुद्धा उदास मनःस्थितीमध्ये होता. त्याचे लांबोडे हात माकडाप्रमाणे लोंबत रहात. जंगलात हरवलेल्या माणसाप्रमाणे निराश नजरेने तो वावरत असे.

खिडकीवर पावसाचे थेंब तडातडा वाजत होते. घळीच्या बाजूने जोरात वाहणारा पाण्याचा लोंढा बाऱ्याचा एक कोपरा निखळवून टाकू लागला होता. उन्हाळी मोसमातील त्या शेवटच्या वादळी पावसामधील वीज कडाडली आणि तिचा मंदसर प्रकाश आकाशभर लकाकला. बारीनोवने शांतपणे पुन्हा विचारले: "निघायचं आपण? उद्या?"

आम्ही निघालो.

शारदीय रात्रीत वोल्गावरून प्रवास करण्यात एक अवर्णनीय आनंद होता. पडावाच्या नाळेशी सुकाणूवाल्याजवळ मी बसलो होतो. हा सुकाणूवाला प्रचंड डोक्याचा केसाळ राक्षस होता. दाणदाण पाय आपटीत तो डेकवर वावरायचा. घशातून चमत्कारिक आवाज काढायचा.

किनाराहीन पाणी डामरासारखे चिकचिकीत भासत होते. पडावाच्या कडांना हलकेच थपडा मारीत रेशमासारखे झुळझुळू वाहात होते. नदीवर काळे शारदीय मेघ ओठंगले होते. मंद सरकणाऱ्या अंधाराविना दुसरे कसलेही अस्तित्व जाणवत नव्हते. अंधाराने किनाऱ्यांना पुसून टाकले होते. सारी पृथ्वी अंधारात विरघळून गेली होती. धुरात आणि पाण्यात विलीन झाली होती. पाणी अखंडपणे, अभंगपणे कुठल्यातरी निःस्तब्ध आणि रिकाम्या पोकळीकडे वाहात होते. तेथे सूर्य नव्हता, चंद्र नव्हता आणि तारेही नव्हते.

समोरील दमट अंधारात एक अदृश्य वाफोर सुस्कारे टाकीत होता. त्याचे पंखे पाण्यावर सपकारे मारीत होते. तीन दिवे त्याची प्रगती दाखवीत होते. पैकी दोन पाण्यालगत होते आणि तिसरा उंचावर होता. चार जवळचे दिवे सोनेरी कार्प माशाप्रमाणे ढगांच्या जरा खालून तरंगत होते. त्यांपैकी एक दिवा आमच्या पडावाच्या शिडावरील कंदील होता.

एखाद्या थंडगार आणि तेलकट बुडबुड्यामध्ये मी बंदिवान झालो होतो असे मला भासत होते. एका तिरप्या उतारावरून तो सावकाश खाली घसरत होता आणि त्याच्याबरोबर मीही घसरत होतो: आत अडकलेल्या माशीप्रमाणे! मला असे भासत होते की, हळूहळू सर्व गती संपूर्ण थांबणार होती आणि निःस्तब्धतेचा तो क्षण जवळ आला होता. मग तो वाफोर घरघरायचा थांबला असता; चिकट पाण्यामध्ये पंखे मारणे त्याने थांबविले असते. झाडावरील पानांप्रमाणे सगळे आवाज गळून पडले असते; खडूच्या अक्षरांप्रमाणे पुसून गेले असते. गतिहीनतेच्या आणि शांततेच्या सार्वभौम मिठीत मी सापडलो असतो.

आणि फाटक्या मेंढकातडी कोटातील व केसाळ टोपीमधील तो प्रचंड माणूस सुकाणूपाशी फेऱ्या मारायचा थांबला असता. त्या मोहिनीमध्ये स्तब्ध उभा राहिला असता. त्याचे चमत्कारिक ओरडणे थांबले असते.

मी त्याला विचारले:

"तुमचं नांव काय?"

"तुला काय करायचंय?" निर्विकारपणे तो म्हणाला.

हा माणूस अस्वलासारखा अजागळ होता. आदल्या संध्याकाळी कझान सोडताना मावळत्या सूर्यप्रकाशात त्याचा चेहरा मी निरखून पाहिला होता. आंधळा, डोळे नसलेला, दाट केसांचे जंगल वाढलेला एक मोठा पुंजका भासला होता. सुकाणूशी आपली जागा घेऊन त्याने एका लाकडी पळीमध्ये वोदकाची बाटली रिकामी केली होती व पाण्याप्रमाणे घटाघटा पिऊन नंतर एक सफरचंद फस्त केले होते. आणि पडावाला धक्का बसून गती मिळाली तेव्हा ह्या माणसाने सुकाणू पकडले होते, सूर्याच्या लाल थाळीकडे एक कटाक्ष टाकला होता आणि मानेला मागे झटका देत खंबीर आवाजात म्हटले होते:

"देव आशीर्वाद देतोय!"

आमचा पडाव म्हणजे वाफोर ओढीत असलेल्या चार पडावांपैकी एक होता. नीझ्नी-नोवगोरदच्या जत्रेहून तो खाली अस्त्राखानकडे चालला

होता. लोखंडी पत्रे, साखरेच्या गोण्या आणि कसलीतरी अवजड खोकी, असा माल पर्शियाला चालला होता. बारीनोवने त्या खोक्यांवर आपल्या बुटांच्या टोकांनी टकटक वाजवून पाहिले, त्यांना हुंगले व थोडा वेळ विचार करून तो म्हणाला :

"नक्कीच बंदुका आहेत. इझेव्स्क कारखान्यामधल्या!"

पण तेवढ्यात सुकाणूवाल्याने बारीनोवच्या कुशीत मुठीने ढोसत विचारले :

"तुला काय करायचंय त्याच्याशी?"

"मी आपला विचार करत होतो..."

"खोपडी फोडून घ्यायची इच्छा आहे?"

उतारूवाहू बोटीमधून जाण्यासाठी पुरेसे पैसे आमच्यापाशी नव्हते, म्हणून आम्ही ह्या पडावामधून मोठ्या "मेहरबानीने" प्रवास करीत होतो. आणि इतरांप्रमाणे आम्हीही "पहाऱ्याची पाळी" करीत होतो तरी पडावावरील प्रत्येकजण आम्हाला भिकारी समजत होता.

"आणि तू माणसांबद्दल बोलतोस!" बारीनोव म्हणाला. "आयुष्य सोपं आहे. जर सर्वांत वर गेलात तर लगाम तुमच्या हाती! नाही गेलात तर चाबूक तुमच्या पाठी!"

रात्र एवढी दाट होती की, इतर पडाव मी पाहू शकत नव्हतो. केवळ त्यांच्या डोलकाठ्यांवरचे कंदील धुरकट ढगांपाशी दिसत होते. ढगांना तेलाचा वास येत होता.

सुकाणूवाल्याचे उदास मौन मला त्रासदायक वाटू लागले. पडावावरील अधिकाऱ्याने माझी सुकाणूपाशी पाठवणी केली होती. ह्या पशूबरोबर उभे राहून टेहळणी करायची आणि त्याला गरज भासेल तेव्हा मदत करायची, असे माझे काम होते. पुढील दिवे जेव्हा वळणावर हेलकावा खात तेव्हा शांतपणे तो ओरडायचा : "हुश्शार! गच्च पकड!"

मी उडी मारून धावायचा आणि सुकाणू फिरवायला त्याला मदत करायचा.

"झालं!" तो गुरगुरायचा.

मी पुन्हा डेकवर जाऊन बसायचा. त्याच्याशी संभाषण सुरू करण्याचा माझा प्रत्येक प्रयत्न फसला होता. "तुला काय करायचंय?" ह्या त्याच्या तिरसट प्रश्नाने माझा पुढचा सर्व उत्साहच मावळायचा.

एवढ्या कसल्या विचारांमध्ये तो गुंगला होता? कामा नदीचे

पिवळे पाणी वोल्गाच्या पोलादी फितीशी संगम पावते ते ठिकाण आम्ही ओलांडले तेव्हा उत्तरेकडे आपले तोंड वळवून तो पुटपुटला :

"गाळ !"

"कोण ?"

उत्तर नाही.

दूर कोठेतरी, रात्रीच्या असीम पोकळीत, कुत्री भुंकत होती, केकाटत होती. अंधाराने अजूनही चिरडून न टाकलेले जीवनाचे काही अवशेष राहिल्याची आठवण करून देत होती. ते अवशेष अप्राप्य भासत होते, नकोसे वाटत होते.

"कुचकामी कुत्री इथं बाळगतात," सुकाणूवाला अचानक बोलला.

"इथं म्हणजे ?"

"सगळीकडं! माझं जे मूळ ठिकाण आहे तिथं तुला अस्सल कुत्रे पहायला मिळतील !"

"कुठं आहे ते ठिकाण ?"

"वोलग्दा !"

आणि आता शब्द बाहेर पडू लागले. पोते फाडल्यानंतर बटाटे घरंगळू लागतात त्याप्रमाणे. शुष्क, बोजड शब्द !

"तुझ्याबरोबर तो कोण आहे ? तुझा काका ? मला तर तो मूर्ख वाटतो ! माझा एक काका आहे—फार हुषार ! दुष्ट ! आणि श्रीमंत ! त्याच्या मालकीचा सिम्बिर्स्कमध्ये धक्का आहे. शिवाय एक खाणावळ !"

मोठ्या कष्टाने, सावकाशपणे शब्द चघळीत तो बोलत होता. मग पुन्हा गप्प राहून समोरच्या वाफोराच्या डोलकाठीवरील कंदिलाकडे टक लावून पाहू लागला. अंधाराच्या जाळ्यातील सोनेरी कोळ्याप्रमाणे तो कंदील भासत होता. मला सुकाणूवाल्याचे डोळे दिसत नव्हते.

"पकड ! .. तुला वाचता येतं ? कायदे कोण करतं हे कदाचित तुला ठाऊक असेल ?"

उत्तराची वाट न पाहता तो पुढे बोलू लागला : "माणसं वेगवेगळं सांगतात. कुणी म्हणतं—झार. कुणी म्हणतं— मुख्य धर्माधिकारी. तर कुणी म्हणतं—सेनेट. पण मला जर नक्की समजलं की, कोण कायदे करतं, तर मी त्याला सरळ भेटायला जाईन. आणि म्हणीन : तू असे कायदे कर की, त्यामुळं मी कुणाच्या अंगावर धावून जाऊ शकणार नाही ! नुसता हातसुद्धा उगारू शकणार नाही. कायदा कसा लोखंडा-

सारखा पाहिजे. कुलूप आणि किल्लीसारखा. माझ्या काळजाला कुलूप लावून टाक, म्हणजे बास्स! म्हणजे माझा मीच मला जबाबदार राहीन पण ह्या पद्धतीनं मला उत्तर देता येत नाही. खरंच नाही!"

तो स्वतःशीच पुटपुटत होता. त्याचा आवाज खाली खाली जात होता. त्याचे बोलणे जास्त जास्त असंबद्ध होऊ लागले होते आणि आपली हाताची मूठ तो सुकाणूवर जोरजोराने आपटत होता.

वाफोरावरून कर्ण्याद्वारे काहीतरी ओरडून सांगण्यात आले. आणि आधाशी रात्रीने आता गिळून टाकलेल्या कुत्र्यांच्या भुंकण्या-ओरडण्याप्रमाणेच नीरस मानवी आवाज अस्थायी भासू लागले. वाफोराच्या दिव्यांची तेलकट पिवळी प्रतिबिंबे त्याच्या नजीकच्या काळया पाण्यावर तरंगली आणि त्यात बुडाली. काळोख तोडण्यास ते दिवे असमर्थ ठरले. डोक्यावर चिखलाच्या नदीच्या प्रवाहाप्रमाणे चिकचिकीत आणि अवजड काळे, फुगीर ढग वाहात जात होते. अंधाराच्या स्तब्ध चरांमध्ये आम्ही खोल खोल घसरत चाललो होतो.

सुकाणूवाला दुर्मुखलेपणाने कुरकुरला:

"मला काय होतंय? माझं काळीज गच्च गुंतून पडतंय..."

बेफिकीरीच्या भावनेने मला झपाटले. बेफिकीरी आणि थंडगार, उदास निराशा. मला फक्त झोप हवी होती!

ढगांमधून धडपड करीत चोरपावलांनी पहाट आली. सूर्यप्रकाशाविना. शुष्क आणि नपुसक पाण्याला तिने शिसवी रंगाचा मुलामा चढविला. नदीकिनारे दिसू लागले. पिवळट पडत जाणाऱ्या झुडुपांच्या रांगा आणि गंजलेल्या लोखंडाच्या रंगाचे बुंधे असलेले काळया फांद्यांचे देवदार. खेडयातील घरांची ओळ. दगडातून कोरल्याप्रमाणे दिसणारी एका शेतकऱ्याची आकृती. एक सागरपक्षी जवळून फडफडत गेला.

सुकाणूवाला आणि मी कामातून मोकळे झालो. ताडपत्रीच्या तंबूत शिरून मी झोपलो. पण लौकरच — किंवा तसे मला भासले — मोठमोठ्या आरोळ्यांनी आणि दणादणा वाजणाऱ्या पावलांनी मला जाग आणली. माझ्या आडोशामधून मी डोकावून बाहेर पाहिले. तीन खलाशांनी त्या सुकाणूवाल्याला केबिनच्या भिंतीशी दाबून धरले होते व एकाच वेळी ते ओरडत होते:

"पेत्रूखा, टाक खाली!"

"देवा, सोडव रे बाबा! ही वेळ लौकरच टळो!"

"उचलू नकोस! खबरदार!"

हाताची घडी करून तो उभा होता. त्याच्या खांद्यांच्या मांसात त्याची बोटे रुतली होती. डेकवरील कसल्यातरी एका गाठोड्याला त्याने एका पायाखाली दाबले होते. तो कसलाही प्रतिकार करीत नव्हता. फक्त प्रत्येक खलाशाकडे आपले डोळे आळीपाळीने फिरवीत होता आणि घोगऱ्या आवाजात विनवीत होता:

"मला पापापासून दूर जाऊं दे!"

तो अनवाणी होता, त्याच्या डोक्यावर टोपी नव्हती. फक्त सदरा-विजार त्याच्या अंगात होते. त्याच्या निग्रही, फुगीर कपाळावर विस्कटलेल्या केसांचा काळा पुंजका पसरला होता. त्या केसांच्या झिपऱ्यांमधून त्याचे चिचुंद्रीसारखे बारीक, लालभडक डोळे दिसत होते. त्या डोळ्यांमध्ये भीती होती, याचना होती.

"तू बुडशील!" खलाशी म्हणाले.

"मी? कधीच नाही! बंधूनो, मला जाऊं द्या. मी जर गेलो नाही, तर त्याला ठार मारीन! सिम्बिर्स्कं पोचलो रे पोचलो की, मी त्याला..."

"विचार सोड!"

"अरे बंधूंनो..."

हात पसरीत तो गुडघ्यांवर खाली टेकला. शेवटी त्याचे हात केबिनच्या भिंतीच्या दोन्ही कडांना स्पर्शले. क्रूसावर चढविलेल्या माणसासारखा तो दिसत होता. पुन्हा त्याने विनवणी केली:

"जाऊं दे मला पापापासून लांब!"

त्याचा आवाज विलक्षण भरदार होता. त्यात हृदयस्पर्शी आवाहन होते. त्याचे पसरलेले बाहू सुकाणूंएवढे लांब भासत होते आणि पुढे पसरलेले त्याच्या हाताचे पंजे थरथर कापत होते. दाढीच्या जंजाळामधील त्याचा अस्वली चेहरासुद्धा थरथर कापत होता. त्याचे चिचुंद्रीसारखे पिचके डोळे विस्फारले होते. त्यांच्या छोट्या काळ्या बाहुल्या विस्फारल्या होत्या. कुणा अदृश्य हाताने जणू त्याचा गळा पकडला होता आणि त्याचा गळा दाबून त्याला तो मारू पहात होता, असा भास होत होता.

माणसे शांतपणे त्याच्या वाटेतून दूर झाली. तो कसाबसा सरळ उभा राहिला आणि त्याने आपले गाठोडे उचलले.

"उपकार केलेत माझ्यावर!" तो म्हणाला.

डेक पार करून त्याने सहज चपळतेने बाजूला उडी मारली. त्याची ती चपळता मला अपेक्षित नव्हती. मीसुद्धा कडेला धावलो. तोपावेतो पेत्रूखाने आपले ओले डोके झटकले होते, त्यावर टोपीप्रमाणे गाठोडे ठेवले होते आणि रेताड किनाऱ्याकडे तो झपाझपा हात मारीत पोहत चालला होता. त्याच्या स्वागतासाठी किनाऱ्यावरील झुडुपे वाऱ्याने झुकली आणि पाण्यामध्ये त्यांनी आपल्या पिवळ्या पानांची उधळण केली :

माणसे म्हणाली :

"सरतेशेवटी त्यानं स्वतःला जिंकलं!"

मी विचारले :

"तो वेडा झाला काय?"

"वेडा? मुळीच नाही! तो आपल्या आत्म्याचं रक्षण करतोय!"

एव्हाना पेत्रूखा उथळ पाण्यात पोहोचला होता. छातीभर पाण्यात क्षणभर तो उभा राहिला आणि डोक्यावरील गाठोडे त्याने हलविले.

खलाशी ओरडले : "अच्छा ऽ! राम राम!"

कुणीतरी विचारले : "त्याच्या परवान्याच्या कागदाशिवाय तो काय करील?"

एका तांबडकेशा, फेंगडचा पायांच्या खलाशाने चवीने मला खुलासा केला :

"सिम्बिर्स्कमध्ये त्याचा एक काका आहे. त्या काकानं ह्याला संपूर्ण लुबाडलं. म्हणून त्या काकाला ठार करण्याचा ह्यानं निश्चय केला होता. आता त्यानं स्वतःला वाचवलं आणि हातून पाप घडण्याआधी तो त्यापासून लांब पळाला. तसा पशू आहे, पण प्रेमळ मनाचा! भला माणूस!"

एव्हाना तो "भला माणूस" वाळूच्या अरुंद पट्ट्यावरून वरच्या दिशेने ढांगा टाकीत चालला होता. लौकरच तो झुडुपांमध्ये नाहीसा झाला.

ते खलाशी फार चांगल्या स्वभावाचे निघाले. माझ्याप्रमाणेच ते सगळे वोल्गातीरी राहणारे होते. संध्याकाळपर्यंत मी त्यांच्यात चांगलाच मिसळून गेलो. पण दुसऱ्या दिवशी मात्र त्यांचे तुसडे, संशयी कटाक्ष माझ्या ध्यानात आले. मी तात्काळ जाणले की, बारीनोवने आपली जीभ सैल सोडली असणार आणि खलाशांना काहीतरी गोष्ट रचून सांगितली असणार!

"तू गप्पा मारत बसला होतास?"

त्याने आपले डोके खाजविले आणि शरमून कबूल केले. त्याच्या बायको डोळ्यांमध्ये मात्र स्मित चमकत होते.

"अं... थोडासा बोललो!"

"तुला जीभ आवरून ठेवायला मी सांगितलं होतं ना?"

"पण मी तसंच केलं होतं. त्याचं काय झालं... आम्ही पत्ते खेळणार होतो. पण पत्त्यांचा डावच गेला. त्या सुकाणूवाल्यापाशी होता. मग आम्हाला कंटाळा आला. म्हणून मी बोलायला लागलो..."

काही प्रश्न केल्यानंतर बारीनोवच्या तोंडून मला समजले की, निव्वळ वेळ घालविण्यासाठी त्याने एक झकास कथा रचली होती. त्या कथेत सरतेशेवटी, प्राचीन व्हायकिंग लोकांप्रमाणे, मी आणि खोखोल हातात कुऱ्हाडी घेऊन गावकऱ्यांविरुद्ध लढलो होतो.

त्याच्यावर रागावून काही उपयोग नव्हता. त्याच्या दृष्टीने सत्य हे केवळ वास्तवाच्या साम्राज्यापलिकडे अस्तित्वात होते. एके दिवशी, कामाच्या शोधात फिरता फिरता, विश्रांतीसाठी आम्ही एका घळीच्या टोकाशी बसलो होतो; तेव्हा तो प्रेमळपणे पण ठामपणे मला म्हणाला होता:

"सत्य – तुमच्या अंतःकरणाचं समाधान करण्यासाठी तुमचं सत्य तुम्हीच निवडलं पाहिजे! ते बघ: ह्या घळीपलिकडं कळप चरतोय, एक कुत्रा आहे आणि गुराखी आहे. पण काय उपयोग? आपल्या काळजांना ऊब आणण्यासाठी त्यातून तुला-मला काय मिळणार? माझ्या मित्रा, गोष्टी जशा आहेत तशा पाहण्याचा तू प्रयत्न करतोस. वाईट माणसं – हे सत्य आहे. आणि चांगली माणसं? कुठं आहेत ती? ती चांगली माणसं वाट पाहताहेत – त्यांचा कुणी शोध घेईल म्हणून! त्या तिथं!"

सिम्बिर्स्कला आम्ही पोहोचलो तेव्हा अत्यंत वाईट रीतीने खलाशांनी आम्हाला पडावावरून खाली उतरविले.

"आम्हाला तुमच्यासारखी माणसं नकोत!" ते म्हणाले.

त्यांनी आम्हाला होडकीमधून धक्क्यापर्यंत आणून सोडले. आमचे कपडे वाळवीत काही वेळपर्यंत आम्ही किनाऱ्यावरच बसून राहिलो. आम्हा दोघांपाशी मिळून सदतीस कोपेक होते.

मग चहाच्या दुकानात आम्ही चहा प्यायलो.

"आता आपण काय करायचं?"

मुळीच न डगमगता बारीनोव उत्तरला:

"काय करायचं? पुढं जात रहायचं!"

एका उतारूवाहू बोटीवरून चोरटेपणाने फुकट प्रवास करीत आम्ही सामारापर्यंत पोहोचलो. सामारा येथे एका पडावावर आम्ही काम मिळविले. त्याच्यामधून, काहीही विशेष घटना न घडता, सात दिवसांमध्ये आम्ही कास्पियन सागराच्या किनारी पोहोचलो. तेथे काबानकूल-बै नामक एका घाणेरड्या काल्मीक मच्छीमार संघात आम्हाला काम मिळाले.

१९२३

## वाचकांना विनंती

'प्रगती प्रकाशना'ला या पुस्तकाच्या अनुवादाबाबत व रचनेबाबत आपले मत जाणून घ्यायला आनंद वाटेल. आपल्या इतर सूचनांचाही अवश्य विचार केला जाईल. कृपया पुढील पत्त्यावर पत्रव्यवहार करा: प्रगती प्रकाशन, १७, झुबोव्स्की बुलेवार्द, मॉस्को, सोविएत संघ.

